# दक्षणेंतील मुसलमानी राज्यांचा इतिहास.

## भाग १ ला.

# बाहामिनी उर्फ ब्राह्मणी राज्याचा इतिहास.




हा ग्रंथ

**बाळाजी प्रभाकर मोडक,**

कोल्हापूर येथील राजाराम कालेजांतील
पदार्थविज्ञानशास्त्राचे गुरू,

यांनीं

**फेरिस्ता या इतिहासकाराच्या ग्रंथाच्या आधारें रचिला.**

मार्च १८९१.



किंमत दोन रुपये.

# दक्षणेंतील ब्राम्हणी (बाहामिनी) राजांची कारकीर्द.

इसवी सन १३४७ ते १५२६ प.

| राजांचीं नांवें. | इसवी सन. |
|---|---|
| अल्लाउद्दीन हसनशाहा कांगो ब्राम्हणी (बाहामिनी). ... ... ... ... ... ... ... | १३४७ पासून १३५८ पर्यंत. |
| महंमदशाहा बाहामिनी ... ... ... ... ... | १३५८ ,, १३७५ ,, |
| मुजाईतशाहा बाहामिनी... ... ... ... ... | १३७५ ,, १३७८ ,, |
| दाऊदशाहा बाहामिनी ... ... ... ... ... | १३७८. |
| महंमूदशाहा बाहामिनी.. ... ... ... ... | १३७८ ,, १३९७ ,, |
| घैसासउद्दीनशाहा बाहामिनी... ... ... ... | १३९७. |
| शमसुद्दीनशाहा बाहामिनी ... ... ... ... | १३९७. |
| फेरोजशाहा बाहामिनी ... ... ... ... | १३९७ ,, १४२२ ,, |
| अहंमदशाहा वली बाहामिनी.. ... ... ... | १४२२ ,, १४३५ ,, |
| अल्लाउद्दीनशाहा बाहामिनी ... ... ... ... | १४३५ ,, १४५७ ,, |
| हुमायूनशाहा झालिम बाहामिनी ... ... ... | १४५७ ,, १४६१ ,, |
| निजामशाहा बाहामिनी... ... ... ... ... | १४६१ ,, १४६३ ,, |
| महंमदशाहा (दुसरा) बाहामिनी... ... ... | १४६३ ,, १४८२ ,, |
| महंमूदशाहा (दुसरा) बाहामिनी... ... ... | १४८२ ,, १५१८ ,, |
| अहंमदशाहा (दुसरा) बाहामिनी... ... ... | १५१८ ,, १५२० ,, |
| अल्लाउद्दीनशाहा (दुसरा) बाहामिनी ... ... | १५२० ,, १५२१ ,, |
| वलीउल्लाशाहा बाहामिनी. ... ... ... ... | १५२१ ,, १५२४ ,, |
| कलीमउल्लाशाहा बाहामिनी... ... ... ... | १५२४ ,, १५२६ ,, |

# प्रस्तावना.

कोल्हापूर व कर्नाटक प्रांतांतील राज्यें व संस्थानें यांचा इतिहास लिहिण्याचें मनांत आणिलें तेव्हां या प्रांतीं मुसलमानांचा अम्मल स्थापन होण्यापूर्वी कोण कोणते हिंदु राजे राज्य करीत होते, याविषयीं माहिती द्यावी, असें मनांत येऊन सन १८७६ सालीं सदर पुस्तकाचा पहिला भाग प्रसिद्ध केला. त्यांत त्या वेळेपर्यंत प्रसिद्ध झालेले शिलालेख व ताम्रपट यांच्या आधारें माहिती जमवून प्रसिद्ध केली होती, व त्यानंतर अल्लाउद्दिनाची दक्षणेवर स्वारी होऊन मुसलमानी अंम्मल कसा स्थापन झाला, व तदनंतर बाहामिनी (ब्राम्हणी) हें मुसलमानी राज्य स्थापन होऊन कसें लयास गेलें, याविषयीं संक्षिप्त हकीकत दिली होती. पुढें ब्राम्हणी (बाहामिनी) राज्य मोडून विजापूर, अहंमदनगर, गोवळकोंडें वगैरे जीं पांच मुसलमानी राज्यें स्थापन झालीं त्यांचाही संक्षिप्त इतिहास देऊन शेवटीं कोल्हापुरचें राज्य व कर्नाटकांतील संस्थानें यांचा इतिहास द्यावा, असा विचार होता. परंतु दक्षणेंत मराठ्यांचा अंमल बसण्यापूर्वी जीं मुसलमानी राज्यें झालीं, तीं फार महत्वाचीं असून त्यांच्या कारकीर्दीत फार घडामोडी झाल्या, व दक्षणचें स्वरूप पालटून गेलें. यास्तव दक्षणचा इतिहास स्वतंत्रपणें प्रसिद्ध करावा, असा विचार मनांत आणून कोल्हापूर राज्याच्या इतिहासाचा एक भाग, व कर्नाटकांतील संस्थानांचा इतिहास असे वेगळे प्रसिद्ध केले. कोल्हापूर इतिहासाचा उत्तरभागही हल्लीं छापीत आहे, व तोही लौकरच प्रसिद्ध होईल.

नंतर प्रोफेसर भांडारकर यांनीं सन १८८२ सालीं दक्षणचा प्राचीन इतिहास ग्याझिटिअरकरितां लिहून प्रसिद्ध केला. त्याचेंच भाषांतर करून आपल्या दक्षणच्या इतिहासास जोडावें, असें मनांत होतें. परंतु त्याचें भाषांतर विद्यारवात्यानें स्वतंत्रपणें करवून प्रसिद्ध केलें, याकरितां प्राचीन इतिहास जोडण्याचें मुळींच टाकून फक्त मराठ्यांचा अंमल बसण्यापूर्वी जीं मुसलमानी राज्यें झालीं, त्यांचाच इतिहास मात्र प्रसिद्ध करावयाचा असा निश्चय केला.

या राज्यांचा इतिहास फक्त मुसलमान इतिहासकारांनींच लिहिले

ला आहे, परंतु त्यांचे ग्रंथही फारसे उपलब्ध नाहींत. हे ग्रंथ नाहींसे होण्यास त्यानंतरची मराठेशाही व मराठ्यांचा यवनांविषयीं तिटकारा हीं बऱ्याच अंशीं कारण झालीं असावीं असें वाटतें. कसेंही असलें तरी दक्षणेंत फारसी ग्रंथांचा कोठें मोठा संग्रह झालेला आढळांत आला नाहीं, व हल्लींही कोठें असल्याचें ऐकण्यांत नाहीं. विजापूर शहरीं कांहीं ग्रंथ असल्याचें ऐकतों, परंतु तेही कोणास उपलब्ध होत नाहींत. मराठेशाहींत दरबारीं पारसनवीस हे कामगार मुद्दाम फारसी भाषेंतील पत्रव्यवहार चालविण्याकरितां ठेविलेले असत. ते फारसी पुस्तकांचा बराच संग्रह करून अध्ययन करीत. परंतु हळू हळू त्यांचेंही मान कमी होत जाऊन इकडील प्रांतीं फारसी भाषेच्या ज्ञानाचा व ग्रंथांचा लय होत चालला. फारसी शिकणें झाल्यास ती भाषा शिकविण्यास शिक्षकही मिळण्याची मुष्किल पडते. ग्रंथ तर फारच दुर्मिळ आणि फेरिस्तासारखा एखादा फारसी ग्रंथ मिळविला, तर तो वाचून समजणारा क्वचितच आढळतो. यामुळें अस्सल फारसी ग्रंथांवरून हा इतिहास लिहिण्याचा मुळींच नाद सोडून केवळ इंग्रजींत व मराठींत झालेलीं त्यांचीं जीं भाषांतरें त्यांवरूनच हा इतिहास लिहिण्याचा निश्चय केला.

फेरिस्ताच्या इतिहासाचीं मात्र इंग्रजींत दोन भाषांतरें प्रसिद्ध झालेलीं आहेत. (१) स्काट साहेबाचें, (२) ब्रिगसाहेबाचें. हीं दोन्हीं भाषांतरें अक्षरशः केलेलीं नसून कांहींशीं संक्षिप्त आहेत. यांत ब्रिगसाहेबाचें भाषांतर बरेंच चांगलें असून त्यांत मूळग्रंथकाराची बहुतेक माहिती आणण्याचा यत्न केलेला आहे. त्याच्याच आधारें किंबहुना त्याचेंच भाषांतर करून हल्लीं हा बाहामिनी (ब्राम्हणी) राज्याचा इतिहास प्रसिद्ध केला आहे. केवळ इंग्रजीचें भाषांतर करून हा इतिहास तयार केला असल्यानें फारसी नांवें वगैरे लिहिण्यांत पुष्कळ चुका होण्याचा संभव आहे. व तशा ज्या ठिकाणीं झाल्या असतील, त्यांबद्दल वाचक माफी करतील अशी आशा आहे. अशा चुका ज्यांच्या पाहण्यांत येतील, त्यांनीं त्या कळविण्याची मेहेरबानी करावी, अशी त्यांस माझी मनःपूर्वक विनंति आहे.

या राज्यानंतर विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडें, बेदर आणि वऱ्हाड हीं जीं पांच राज्यें झालीं, त्यांपैकीं पहिल्या दोहोंचा इतिहास मात्र

फेरिस्तानें आपल्या मरणकाळपर्यंत दिलेला आहे. परंतु बाकी तिहींचा फारच त्रोटक लिहिला आहे. विजापूर व अहंमदनगर या शहरीं तेथील आदिलशाही व निजामशाही या घराण्याचे इतिहास मिळतील, अशी आशा होती. परंतु तीही सफल झाली नाहीं. पारसनवीस यांचे घरीं 'बुसातिने सलातीन' या नांवाच्या विजापूरच्या इतिहासाचें मराठी भाषांतर मिळालें. यांत मात्र विजापुरच्या आदिलशाही घराण्याच्या स्थापनेपासून अखेरपर्यंत इतिहास आहे. व त्यांत विजापुरच्या अखेर कारकीर्दींत मराठे कसे प्रबळ होत गेले. याचेंही दिग्दर्शन बरेंच आढळतें. हा इतिहास व फेरिस्ताचा इतिहास या दोहोंच्या आधारें विजापुरच्या आदिलशाही घराण्याचा इतिहास ३।४ वर्षांमागेंच प्रसिद्ध केला आहे. व त्याची नवीन चांगली आवृत्ति काढण्याचाही विचार आहे.

अहंमदनगरचा इतिहास फेरिस्तावरूनच तयार केला असून फेरिस्ताच्या मरणानंतरची माहिती मोंगलांच्या इतिहासांतून घेतली आहे. दुसऱ्या एका ग्रंथकारानें लिहिलेल्या गोवळकोंड्याच्या फारसी इतिहासाचें भाषांतर आपल्या पुस्तकांत छापलें आहे, त्यावरून गोवळकोंड्याचा इतिहास तयार केला आहे. वऱ्हाड व बेदर या राज्यांचे इतिहास फेरिस्तावरून तांत्रिकच दिले आहेत. या चारही राज्यांचे इतिहास तयार असून लौकरच छापण्याचें काम चालू आहे. याच भागांत दक्षणहिंदुस्थानांत विजयानगरास जें मोठें हिंदूचें राज्य होतें, व ज्याचा अम्मल कर्नाटकांत बऱ्याच प्रांतीं होता, व ज्याशीं मुसलमानी राजांचें सतत युद्ध चाललें होतें, त्या प्रसिद्ध हिंदुराज्याचाही संक्षिप्त इतिहास दिला आहे.

**डक्कन** या हिंदुस्थानी शब्दाचा मराठी शब्द **दक्षण** याचेंच मुख्यत्वें अवलंबन केलें आहे, व **डक्कन** या देशास **दक्षणदेश** असें सर्वत्र म्हटलें आहे. उत्तरहिंदुस्थानांत इकडच्या लोकांस दक्षणी लोक व इकडच्या चिजांस दक्षणी चिजा असें म्हणण्याची रुढि आहे.

या काळाचा इतिहास फार महत्वाचा आहे. दक्षणेंत ज्या मोठमोठ्या मुसलमानांच्या इमारती: दरगे, देवस्थानें किंवा मशिदी आढळतात, तीं सर्व या काळांतीलच होत. दक्षणेंत जीं मोठमोठीं मुसलमानांचीं घराणीं आहेत, तीं याच काळांत उदयास आलीं. याच काळांत इकडे मुसलमानांची कायम वस्ति होऊन पुढें वाढत गेली. व याच वेळीं ह-

जारों हिंदु यवन झाले. आणि मुसलमानी कारकीर्दींत मराठे उदयास आले. या राजाच्या कारकीर्दींत मराठ्यांस लष्करांत स्वारांच्या व शिपायांच्या नोकऱ्या मिळूं लागून हळू हळू पुढें सरसावले; आणि पुढें जी त्यांनीं तरवार गाजवून आपलें आधिपत्य स्थापन केलें, त्याची तयारी याच काळांत झाली. हें पुस्तक जरी शिळेवर छापिलें आहे, तरी उत्तम लेखकाकडून साधारण टाइपा इतकें बारीक लिहवून उत्तम कागदावर सुरेख रीतीनें छापविलें आहे. यास्तव हा ग्रंथ लोकांच्या आश्रयास पात्र होईल, अशी उमेद आहे.

कोल्हापूर, तारीख २० माहे फेब्रुवारीं सन १८११ इसवी.

बा॰ प्र॰ मोडक.

# अनुक्रमणिका.

## दक्षणेंतील मुसलमानी राज्यांचा इतिहास.

## भाग १ ला.

### दक्षणेंत मुसलमानी अम्मल स्थापन झाल्यापासून ब्राम्हणी (बाहामिनी) राज्याच्या अखेरीपर्यंत.

अनुक्रमणिका.

# दक्षणेंतील मुसलमानी राज्याचा इतिहास.

## भाग १ ला.

### दक्षण मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यापासून ब्राम्हणी (बाहामिनी) राज्याच्या अखेरीपर्यंत.

### अल्लाउद्दिनाच्या स्वारीपासून ब्राम्हणी (बाहामिनी) राज्याची स्थापना होईपर्यंत.

इसवी सन १२९४ ते १३४७.

उपोद्घात — अल्लाउद्दिनाची दक्षणेवर स्वारी.— तो वऱ्हाड घेतो.— देवगडचें वर्णन.— देवगडावर स्वारी व रामदेवाचा पराभव.— दुसरी हकीकत.— काफरची स्वारी.— देवलदेवी.— मुसलमानाशीं रामदेवाचा तह.— बल्लाळ राजावर स्वारी.— मुसलमान देवगडास ठाणें बसवितात.— हरपाळदेवाचें बंड.— महंमद दौलताबाद राजधानी करितो.— महंमदाच्या राज्यांतील बंडें.— दक्षणेंत ब्राम्हणी (बाहामिनी) राज्याची स्थापना.— बाहामिनी राज्य मोडून विजापूर, गोवळकोंडें, अहंमदनगर, वऱ्हाड व बेदर अशीं पांच राज्यें होतात.— विजयानगरचें हिंदुराज्य.

---

उपोद्घात.

इसवी सन १२९४ मध्यें मुसलमानांनीं दक्षणेवर प्रथम स्वारी केली. त्यानंतर हळू हळू थोडासा खेरीजकरून बहुतेक प्रदेश मुसलमानांच्या ताब्यांत गेला. तो पुढें मराठ्यांनीं परत घेईपर्यंत त्यांजकडेसच होता. या काळाविषयीं जरी हिंदूंनीं लिहिलेले इतिहास नाहींत, तथापि केवळ शिलालेख व ताम्रपट यांवरच अवलंबून राहावें ला-

गत नाहीं. कारण या काळाविषयीं मुसलमान इतिहासकारांनीं लिहिलेले अनेक इतिहास उपलब्ध आहेत. मुसलमान इतिहासकारांत अग्रगण्य जो फेरिस्ता नामक इतिहासकार त्याणें या काळाविषयीं साद्यंत हकीकत दिली आहे; त्याच्या आधारेंच मुख्यत्वें पुढील इतिहास दिला आहे.

जलालुद्दिन खिलजी दिल्लीस राज्य करीत असतां इ. स. १२९४ मध्यें त्याचा पुतण्या अल्लाउद्दीन हा ८००० स्वार घेऊन दक्षणेवर स्वारी करण्यास निघाला. त्यास वाटेंत कित्येक सरदार फौजेनिशीं मिळाले. त्यावेळीं दक्षणेंत मुख्यत्वें महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतीं देवगडचा राजा रामदेवराव जाधव हा राज्य करीत होता. देवगडावर स्वारी करून यादवांचें संपत्तिमान् राज्य हस्तगत करावें हा अल्लाउद्दिनाचा हेतु होता. तो सागर व जबलपूर या मार्गानें वऱ्हाडांत एलिचपूर शहरीं आला. त्यावेळीं वऱ्हाडांत यादवांच्या पदरचा सरदार अंमल करीत होता. त्यानें अल्लाउद्दिनास अडथळा केला. अल्लाउद्दिनाची व त्या सरदाराची एलिचपुराजवळ मोठी लढाई झाली. त्या लढाईत हिंदु मोठ्या निकरानें लढले व पुष्कळ मुसलमान लढाईंत पडले; परंतु अखेर मुसलमानांस जय प्राप्त होऊन त्यांच्या हातीं वऱ्हाडप्रांत गेला. आपल्या सैन्यास विश्रांति देण्याकरितां कांहीं मुक्काम करून नंतर अल्लानें थेट देवगडावर चाल केली. देवगडचा किल्ला एका उंच टेंकडीवर असून हस्तगत करण्यास मोठा दुर्धर अशी प्रसिद्धि होती. आज पाहिलें तरी याच्या तटबंदीचा पहाड सुमारें १८० फूट उभा लंबाकृति अगदीं कापून काढलेला आहे. किल्याच्या सभोंवता रुंद व खोल खंदक आहे. किल्यांत जाण्यास पहाडाच्या गर्भांतून व खंदकाच्या खालून एक वांकडा तिकडा फेऱ्याचा रस्ता केलेला आहे. हें प्रचंड काम बहुधा शेजारच्या वेरूळच्या लेण्याच्या वेळीं झालें असावें. परंतु मुसलमान इतिहासकार म्हणतात कीं, महंमद तघलखानें देवगडास "दवलताबाद" हें नांव देऊन ती आपली राजधानी केली, तेव्हां त्याणें यास दुर्धर स्वरूप दिलें. अशा प्रतीचा किल्ला त्यावेळीं सर्व हिंदुस्थानांत दुसरा नव्हता. किल्यावर चढण्यास कोठून वाट नाहीं. टेंकडी उंच, कडा खो-

अल्लाउद्दिनाची दक्षणेवर स्वारी.

तो वऱ्हाड घेतो.

देवगडचें वर्णन.

ळ सभोंवार रुंद व खोल खंदक अशा तऱ्हेचा देवगडचा किल्ला हो-ता. त्या किल्याखालीं देवगड शहर होतें. त्याच्या सभोंवारही तट बांधण्याचें काम चालू होतें. परंतु तें पुरें झालें नसल्यामुळें शहर हस्तगत होण्याजोगें होतें.

दक्षणेच्या सरहद्दीवर येऊन पोहोंचतांच कूचदरकूच करून देवगडाकडे अल्लाउद्दिनानें आपला मोर्चा फिरविला. वाटेंत कांहीं दिवस मुकाम करून व धान्य वगैरे सामग्री पुष्कळ घेऊन थेट देवगडाकडे व-ळला. हें वर्तमान रामदेवरावास कळलें तेव्हां तो व त्याचा मुलगा शंकरदेव हे तेथें नव्हते. रामदेव पु-ष्कळ सैन्य जमवून देवगडास परत आला, आणि मुसलमानी सैन्य व शहर यांच्या मध्यें ठाणें देऊन अल्लाउद्दिनाशीं मोठ्या निकरानें व शौर्यानें लढला. परंतु शेवटीं पराभव पावला, व त्याचे लोक पुष्कळ घायाळ झाले.

देवगडावरील स्वारी व रामदेवाचा पराभव.

अल्लाउद्दीन हा करामणिकपुराहून शिकारीच्या मिषानें निघाला. व बाहेर असें प्रसिद्ध केलें कीं, आपण आपला चुलता दिल्लीचा बादशाहा यास त्याच्या त्रासानें कंटाळून सोडिलें व तेलंगणांतील राजमहेंद्रीच्या राजाकडे चाकरीस राहण्यासाठीं जात आहें. असें सांगून त्यानें स्वस्थपणानें पुष्कळ लहान लहान राजांच्या मुलखांतून प्रवास केला, आणि या रीतीनें द्वेषभाव टाळला. या प्रमाणें दोन महिने प्रवास केल्यावर विशेष हरकत न होतां तो एलिचपुरास येऊन पोहोंचला, व तेथून त्याणें एकाएकीं रामदेव राजाची राजधानी जी देवगड तिकडे कुच केलें. तो तेथें पोहोंचला तेव्हां रामदेव शहरांतच होता, परंतु त्याची बायको व मुलगा हीं कांहीं अंतरावर यात्रेस गेलीं होतीं.

दुसरी हकीकत.

अल्लाउद्दीन समीप आलेला पाहून रामदेव फार भयाभीत झाला. तथापि त्याणें तीन चार हजार शहरचे लोक जमा करून शहरापासून चार मैलांवर येऊन शत्रूशीं लढाई केली. परंतु तींत त्याचा पराभव झाला; व त्यास किल्ल्यांत जाऊन आश्रा घ्यावा लागला. त्यावेळीं किल्याभोंवतीं खंदक नव्हता. तेव्हां असें झालें कीं, रामदेवाचे ताब्यांतील कांहीं व्यापारी लोकांनीं विक्रीकरितां मीठ आणि-

लें होतें. त्याचीं पोतीं मुसलमान नजीक आलेले पाहातांच किल्याचे नदाचे भिंतीजवळ टाकून ते पळून गेले. तीं पोतीं धान्याचीं आहेत असें समजून वेढा पडल्यास आपल्या निर्वाहाच्या उपयोगीं पडतील असें म्हणून आपल्या पायदळांतील लोकांकडून किल्यांचे आंत राजानें नेवविलीं. अल्लाउद्दीन यानें शहरास असा वेढा दिला कीं, आंतील लोकांस आपली सुटका करून घेण्यास संधि मिळाली नाहीं; व त्यामुळें अल्लाउद्दीन यास तेथील व्यापारी लोकांकडून करादाखल मोठ मोठ्या खंडण्या घेतां आल्या. त्याणें रामदेवाचे हत्ती व कित्येक हजार घोडेही धरिले.

असें चाललें असतां अल्लाउद्दीन याणें असें प्रसिद्ध केलें कीं, आपण आणलेलें सैन्य दिल्लीच्या बादशाहाकडून जे वीस हजार घोडेस्वार इकडे जरूरीनें येत आहेत त्यांपैकीं पुढें पाठविलेली आघाडीची ही टोळी आहे. हें वर्तमान ऐकतांच दक्षणेंतील सर्व लोकांस भीति उत्पन्न झाली; आणि सर्व राजे एकत्र मिळून याशीं टक्कर मारण्याचा विचार न करितां जो तो आपापल्या राज्यावर हल्ला न यावा म्हणून प्रयत्न करूं लागला. अल्लाउद्दीन यानें तें शहर लुटलें, व आंतील व्यापारी, ब्राम्हण व मुख्य रहिवाशी यांस कैद केलें; आणि आपआपली मालमत्ता व जिनगी दाखविण्यासाठीं त्यांचे हाल केले. व शेवटीं किल्याभोंवती वेढाही दिला.

आपणास लौकरच शत्रूच्या स्वाधीन होणें भाग पडेल, व दिल्लीच्या बादशाहाचा हेतु सर्व दक्षणदेश जिंकण्याचा आहे, असें पाहून जास्त सैन्य येण्यापूर्वींच तह करावा, हा उत्तम मार्ग आहे, असें रामदेवास वाटलें, व त्याणें अल्लाउद्दीन यास असें पत्र लिहिलें: "तुम्हीं या देशावर जी स्वारी केली, ती अविचाराची व उतावीळपणाची होती. परंतु तुमच्या सुदैवानें हें शहर तुम्हांस असंरक्षित सांपडलें आणि त्यामुळें तुम्हांस पाहिजे तिकडे फिरण्यास मोकळीक मिळाली. तथापि दक्षणेंतील राजांजवळ असंख्य सैन्य आहे, व तें एकत्र होऊन तुम्हांला वेढा घालतील तर तुमच्यापैकीं एकासही येथून जिवंत जाऊं देणार नाहींत. आतां येथून तुम्हांस त्रास न होतां परत जातां येईल, अशीही कल्पना के-

तहाचें बोलणें.

ली तरी माळवा, खानदेश व गोंडवण येथील प्रत्येक राजापाशीं ४०।५० हजार सैन्य आहे, व हे तुमच्या वाटेवर आहेत. तर ते तुम्हांला सुरक्षितपणें जाऊं देणार नाहींत, म्हणून कांहीं नियमित खंडणी घेऊन तुम्हीं लौकरच परत जावें, हें योग्य दिसतें. ही खंडणी व तुम्हांस जी येथें लूट मिळाली आहे ती रकम मिळून तुमच्या स्वारीचा खर्च भागेल."

यावरून अल्लाउद्दीन याणें ५० मण सोनें व बऱ्याच मोठ्या किमतीचें जवाहीर घेतलें, व पूर्वी धरलेले राजाचे हत्तीही ठेवून घेतले; आणि त्याणें राजाच्या कैद केलेल्या लोकांस सोडून दिलें, आणि पंधरावे दिवशीं सकाळीं शहर सोडून जाण्याचें कबूल केलें. परंतु तो परत जाण्याची तयारी करीत असतां रामदेवाचा वडील मुलगा **शंकरदेव** मुसलमान लोकांची फौज येतांच आपल्या आईसह फौज जमा करण्याकरितां गेला होता. तो पुष्कळ सैन्य घेऊन शहरानजीक कांहीं मैलांच्या अंतरावर आला. रामदेवानें त्यास निरोप पाठविला कीं, शत्रूशीं तह झाला आहे. सबब ठरल्याप्रमाणें मुकाट्यानें अमलांत येऊं द्यावें. मुसलमान लोक हे लढाऊ आहेत. सबब त्यांच्याशीं युद्ध करण्यापेक्षां तह करणें हें बरें आहे. सबब त्यांना अगदीं दुखवूंनये. तथापि त्या तरुण राजपुत्रानें आपलें सैन्य शत्रूच्या सैन्याच्या तिप्पट आहे, व वेळोवेळीं आपल्यास दुसऱ्या राजांची मदत मिळण्याजोगी आहे असें मनांत आणून वडिलांची आज्ञा मोडून अल्लाउद्दीन यास त्यानें असा निरोप पाठविला कीं, जर तुम्हांस आपल्या प्राणाची इच्छा असेल तर जी तुम्हांस लूट मिळाली आहे ती परत देऊन मुकाट्यानें घरची वाट धरावी, व सुदैवानें सुटका झाली या गोष्टीचा आनंद मानावा. हें पत्र वाचतांच अल्लाउद्दीन हा क्रोधानें संतप्त झाला, आणि निरोप घेऊन येणारे लोकांचीं तोंडें काळीं करून त्यांस डेऱ्याबाहेर हांकून दिलें, व किल्यांतून आपणावर हल्ला येऊं नये म्हणून एका सरदारास एक हजार स्वारांनिशीं किल्याला वेढा देण्यासाठीं ठेवून बाकीच्या फौजेनिशीं रामदेवाच्या मुलावर हल्ला करण्यासाठीं निघाला.

शंकरदेवाशीं लढाई.

हिंदूलोकही युद्ध करण्यास तयारच होते. दोन्हीं सैन्यांची जी चकमक झडली तींत मुसलमान लोकांचें सैन्य हिंदूच्या सैन्याहून क-

मी असल्यामुळें सर्व बाजूनें मागें सरलें. किल्याच्या वेढ्यासाठीं ठेवलेल्या सरदारास हें वर्तमान कळतांच तो आपलें ठाणें सोडण्यास हुकूम नव्हता तरी आपलेकडील एक हजार स्वारांनिशी त्वरेनें लढाईच्या जागीं गेला. त्यामुळें त्या दिवशींच्या लढाईचा परिणाम निराळ्या प्रकारचाच झाला. घोड्यांच्या पायांनीं धुरळा इतका उठला कीं त्यामुळें हिंदूलोकांस नवें सैन्य किती येत आहे याचा अजमास करितां आला नाहीं. त्यांना असें वाटलें कीं, दिल्लीहून जी फौज मागाहून येणार होती तीच दाखल झाली, व त्यामुळें एका क्षणांत सर्व सैन्याची भीतीनें दाणादाण व फुटाफूट होऊन हिंदू लोक चारी दिशांनीं पळत सुटले. शत्रूचा पाठलाग करणें हें यासमयीं अल्लाउद्दिनास उचित न वाटल्यामुळें तो माघारी परतला, आणि पुनः किल्यासभोंवतीं तळ देऊन त्यानें लढाईंत राजाचे जे कित्येक नातलग कैद केले होते, ते किल्यावरच्या लोकांस दाखविले.

अशा संकटावस्थेंत रामदेवास कलबुर्गे, तेलंगण, माळवा आणि खानदेश येथील राजांकडून कांहीं तरी कुमक मिळेल, अशी आशा होती. सबब त्याणें त्या राजांस फौजेची कुमक पाठविण्याविषयीं निरोप पाठविला. परंतु संकटाचें मुख्यत्वें जें मोठें कारण तें त्यास ह्या वेळपर्यंत कळलें नव्हतें. धान्याची सामग्री सरली, व जीं पोतीं धान्याचीं म्हणून पूर्वीं किल्यांत आणिलेलीं होतीं, त्यांत धान्य नसून मीठ भरलेलें आहे, असें आतां कळून आलें. रामदेवानें ही गोष्ट फौजेंतील लोकांस कळवूंनये, म्हणून हुकूम दिला, आणि अल्लाउद्दिनाबरोबर त्याणें दुसऱ्या तहाचें बोलणें लाविलें. रामदेवानें वकिलाबरोबर असा निरोप पाठविला कीं, हल्लीं झालेल्या तंट्यांत माझें आंग नाहीं हें तुम्हांस माहीत आहेच. जर माझ्या मुलानें अविचारानें व मूर्खपणानें आपणामधील तहाच्या शर्ती मोडिल्या तर त्याची जबाबदारी मजवर ठेवणें योग्य नाहीं. रामदेवानें आंतून आपल्या वकिलास आणखीं असेंही सांगितलें कीं, वेढा लांबविण्यापेक्षां कोणत्याही शर्ती कबूल कराव्या.

अल्लाउद्दिनास रामदेवाच्या काळजीचें खरें कारण समजलें म्हणून तहाचें काम लांबणीवर पाडण्यासाठीं रोज नवें नवें अडचणीचें बो-

लणें लाविलें. परंतु रामदेवाच्या सैन्याची उपासमर होऊं लागल्यामुळें राजानें खालील शर्तीवर दुसरा तह केला. त्या शर्ती ह्या कीं; " अल्लाउद्दीन देश सोडून जातांच त्यास ६०० मण मोत्यें, दोन मण हिरे माणकें वगैरे जवाहीर, एक हजार मण रुपें व चार हजार रेशमाचे गठ्ठे द्यावे. या खेरीज आणखीही पुष्कळ मौल्यवान् जिन्नस देण्याचा करार होता, अशी यादी आहे. परंतु तें खरें दिसत नाहीं. या शिवाय अल्लाउद्दीन याच्या ताब्यांत एलिचपूर व त्याखालील प्रदेश द्यावा, व तेथें अल्लाउद्दीन याची फौज तेथील वसूल जमा करून करामाणिकपुरास पाठविण्याकरितां राहावी, व तिजला कांहीं त्रास पोंहोंचूनये." अशी शर्त होती.

अल्लाउद्दिनाशीं तह.

अल्लाउद्दीन याणें राजाच्या कैद केलेल्या सर्व लोकांस मोकळें केलें, आणि देवगडास पोंहोंचल्यापासून पंचविसाव्या दिवशीं तो मिळालेल्या लुटीसह मोठ्या थाटानें परत जाण्यासाठीं शहराचे बाहेर पडला. तो इतक्या बेफिकीरपणानें परत चालला कीं, त्याणें माळवा, गोंडवण, खानदेश या बलाढ्य राजांच्या प्रदेशांतून आपले मुकाम नेमिले. जरी शत्रूचें सैन्य सभोंवतीं होतें, तरी अल्लाउद्दीन याची चांगली व्यवस्था, नियमितपणा, कैद व त्याच्या सैन्यांतील लोकांनीं दाखविलेलें धैर्य या गोष्टींमुळें शत्रूनीं हल्ले केले, तरी त्यापासून कांहीं नुकसान न होतां उलट त्याणें केलेल्या महत्कृत्यास जास्तच शोभा आली. खरोखर आपल्यास असें म्हणतां येईल कीं, इतिहासांत ज्या मोठमोठ्या पराक्रमांचें वर्णन आढळतें, त्या पराक्रमांत या स्वारीची गणना करण्यास हरकत नाहीं. कारण या स्वारींत अल्लाउद्दिनास देवगडापर्यंत सुमारें ७०० मैल प्रवास करावा लागला. यापैकीं बहुतेक रस्ता विंध्याचल पर्वतांतून व त्यांतील निबिड अरण्यांतून गेला होता. मार्गांतील बिकट व अरुंद वाटा, रस्त्यामध्यें शिधासामग्री व दाणापाणी मिळण्याची पंचाईत, पहाडी लोकांचा उपद्रव, आणि रस्त्यांविषयीं व प्रांताविषयीं गैर माहिती, या गोष्टी मनांत आणितां एवढीशी लहान फौज या मार्गानें आणून व दक्षणेसारख्या विस्तृत प्रदेशांत जय संपादून नव्याच रस्त्यानें माघारें जाणें हें मोठें अचाट व धाडसाचें कृत्य त्याणें केलें, असें कोणीही कबूल करील.

अल्लाउद्दिनाचें गमन.

रामदेवाकडून वेळच्या वेळीं खंडणी पोहोंचेनाशी झाली. शके १२२८ सालीं (सन १३०६) तीन वर्षांची बाकी तुंबली होती. म्हणून मालिक काफर याजपाशीं एक लक्ष स्वार देऊन तीन सालची बाकी वसूल करण्याकरितां देवगडास दिल्लीच्या बादशाहानें यास रवाना केलें. अल्लाउद्दिनाची बायको कवलादेवी+ हिनें काफरास दुसरें असें एक काम सांगितलें कीं, आपला पहिला नवरा गुजराथचा राजा कर्णराज या पासून उत्पन्न झालेली माझी पहिली कन्या देवलदेवी हिला दिल्लीस घेऊन यावें. देवगडचा शंकरदेव हा देवलदेवीच्या अत्यंत लावण्यास भुलून तिच्याशीं लग्न करण्याचें त्याच्या मनांत होतें. परंतु ती रजपुताच्या पोटची व शंकरदेव हा मराठा म्हणून तिचा बाप त्यास देण्यास राजी होईना. परंतु तिला दिल्लीस नेण्यास हेर आले आहेत, हें वर्तमान कळतांच मुसलमानापेक्षां मराठा बरा. अशी मनांत गांठ घालून कर्णराजानें शंकरदेवास देण्याचा निश्चय केला. आणि त्याचा भाऊ भीमदेव याच्या बरोबर कांहीं लोक देऊन देवलदेवीस तिच्या १३ व्या वर्षी देवगडास रवाना केलें. इकडे काफरानें अलूफखान नामक सरदाराबरोबर सैन्य देऊन ही कामगिरी बजाविण्याकरितां गुजराथेंत पाठविलें. अलूफखानानें गुजराथच्या कर्णरायावर स्वारी करून त्याचा कित्येक लढायांत पराभव केला. इतक्यांत त्यास वर्तमान समजलें कीं, देवलदेवीस शंकरदेवास देण्याच्या बेतानें शंकरदेवाचा भाऊ भीमदेव याजबरोबर देवगडास पाठविलें, व आपणही तिकडे गेला. तेव्हां खानही त्याचा माग काढीत देवगडाकडे निघाला. पुष्कळ दिवस फिरला. परंतु त्यांचा मागमूस कोठें लागेना. तेव्हां निराश होऊन फौजेस विसावा देण्याकरितां एके ठिकाणीं जंगलांत त्यानें दोन दिवस मुकाम केला. त्यावेळीं त्याच्या लोकांपैकीं सुमारें ३०० लोकांची एक टोळी वेरूळचीं लेणीं पाहावयास गेली होती. त्यांच्या दृष्टीस एक स्वारांची लहानशी टोळी पड-

काफरची स्वारी इ.स. १३०६.

---

+ कवलादेवी ही गुजराथच्या रायकर्ण राजाची पत्नी होती. अल्लाचा भाऊ अलूफखान यानें गुजराथेवर स्वारीकरून गुजराथ घेतली. तेव्हां कवलादेवीस मुसलमानांनीं दिल्लीस नेलें. व तेथें अल्लाउद्दीन सिंहासनारूढ जाहल्यावर तिशीं त्यानें लग्न केलें होतें.

ली. ही शंकरदेवाची असेल, असें समजून तिजवर छापा घालण्याची त्यांणीं तयारी केली. जवळ जातात तों भीमदेव देवलदेवीस आपल्या बंधूकडे नेत आहे असें उमगलें. त्या उभयतांच्या चकमकींत देवलदेवीच्या घोड्यास तीर लागून तो घायाळ झाला, व ती खालीं आली. त्या सरसें तिला धरून त्यांणीं अलफखानाकडे नेलें. खान तिजसहवर्तमान काफराकडे आला, आणि तेथून देवलदेवीस घेऊन दिल्लीस गेला. तेथें दिल्लीच्या बादशाहाचा मुलगा खरीजखान याशीं तिचें लग्न बादशाहानें केलें.

रामदेव शरण येऊन दिल्लीस जातो, व तह करितो. सन १३०९.

काफरानें देवगडास वेढा दिलाच होता. त्यानें आसपासचा बहुतेक मुलूख काबीज केला. तेव्हां निरूपाय होऊन रामदेव शरण आला, आणि तहाचीं कलमें ठरविण्याकरितां काफराबरोबर दिल्लीस निघाला. दिल्लीच्या दरबारीं त्याचा सन्मानपूर्वक आदरसत्कार होऊन नियमानें खंडणी देण्याच्या करारावर त्याचें राज्य त्यास परत दिलें. याशिवाय राजाधिराज हा किताब व कांहीं परगणे देऊन रामदेवास आपला मांडलिक राजा बादशाहानें बनविला. गुजराथेंतील नवसरी परगणा त्याच्या जातीच्या तैनातीस देऊन १,००० टक्के त्याच्या दिल्लीस येण्याच्या खर्चाबद्दल दिले. रामदेवानें दिल्लिपतीचें सार्वभौमत्व कबूल केलें, आणि आपल्या हयातींत दिल्लीस खंडणी पाठविण्यास त्यानें कधीं अंतर केलें नाहीं. वरंगूळ प्रांतावर स्वारी करण्यास जात असतां मार्गांत शके १२३१ (सन १३०९) मध्यें मलिक काफर हा देवगडास उतरला होता. त्याचा रामदेवानें आदरसत्कार केला, व फौजेची सरबराई उत्कृष्ट ठेविली. काफर वरंगूळ देश जिंकून व तेथच्या राजाकडून खंडणी घेऊन दिल्लीस परत गेला. रामदेव याच सालीं निवर्तला. पुढील सालीं (सन १३१०) द्वारसमुद्राच्या बल्लाळ राजांस जिंकण्याकरितां काफर जात असतां त्याणें देवगडास मुकाम केला होता. त्यावेळीं शंकरदेवानें आपल्या बापाप्रमाणें त्याची सरबराई ठेविली नाहीं. यामुळें मुसलमानांनीं पैठणास एक कंपू ठेवून ते पुढें गेले, आणि त्यांणीं बल्लाळांचा अगदीं मोड करून त्यांचा देश जिंकिला, आणि अतिशय लूट घेऊन मुसलमान प-

बल्लाळ राजावर स्वारी. सन १३१०.

रत गेले. फेरिस्ता इतिहासकारानें असें लिहिलें आहे कीं, त्यावेळीं ३१२ हत्ति २०,००० घोडे आणि ९६,००० मण सोनें मुसलमानानीं नेलें.

शंकरदेव वेळच्या वेळीं खंडणी देईना तेव्हां मलिक काफर पुनः चवथ्या वेळीं दक्षणेंत मोठें सैन्य घेऊन येऊन त्याणें शंकरदेवास पकडून ठार केलें, आणि त्याचा मुलूख डंबळापासून रायचुरापर्यंत लुटून फस्त केला; आणि यादवांचें राज्य खालसा करून देवगडास मुसलमानानीं आपलें दक्षणेंतील मुख्य ठाणें बसविलें.

मुसलमान देवगडास ठाणें बसवितात. सन १३१२.

अल्लाउद्दिनाच्या राज्याच्या अखेरीस दिल्लीच्या दरबारीं आपसांत कलह लागले. यामुळें दक्षणेंतील राजांनीं बंडें केलीं; त्यांत मुख्य **हरपाळदेव रामदेवाचा** जांवई हा होता. त्याणें दक्षणेंतील सर्व सरदारांस चेतवून मुसलमानांच्या सुभेदारांस हांकून लाविलें, आणि यादवांचा बहुतेक मुलूख हस्तगत करून घेतला. परंतु हिंदूंच्या हातीं हा प्रदेश फार दिवस राहिला नाहीं. **मुबारिक खिलजी** दिल्लीच्या तक्तावर असतांच स्वतः मोठें सैन्य घेऊन दक्षणेंत आला. देवगडास तो येऊन पोहोंचला न पोहोंचला इतक्यांत त्यानें हल्ला करण्याची सुध्दां वाट न पाहतां हरपाळदेव व त्याचे स्नेही सरदार पळून गेले. हरपाळ देवास मुसलमानांनीं पकडून त्याचे फार हाल करून त्यास जिवें मारिलें. यापुढें यादव राजांच्या नांवचा एकही लेख सांपडत नाहीं.

हरपाळदेवाचें बंड. सन १३१८.

या वेळेपासून मुसलमानांचा अंमल दक्षणेंत पूर्णपणें बसला. पुढें सन १३३८ सालीं महंमद तघलख याणें देवगडास **दवलताबाद** हें नांव देवून तीच आपली राजधानी करण्याच्या इराद्यानें दवलताबादच्या किल्ल्यास तिहेरी तट बांधून तिहेरी खंदक खणले. दिल्लीच्या लोकांस घरेंदारें उठवून दवलताबादेस जाण्याचा महंमदानें हुकूम केला. त्यांत लोकांचे फार हाल झाले, आणि महंमदाचा बेत पूर्णपणें तडीस गेला नाहीं. तथापि दवलताबाद शहर, तेथील मोठा दुर्धर किल्ला व महंमदानें बांधलेल्या कबरी व देवळें, आणि प्राचीन इमारती वगैरे अद्याप पाहण्यासारख्या आहेत.

महंमद दौलताबाद राजधानी करितो.

यानंतर महंमद तघलखाच्या जुलमी व क्रूरवर्तनास त्रासून दक्षणेंतील मुसलमानांनीं व सरदारांनीं बंड केलें, आणि ब्राम्हणी (बाहामिनी) या स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना झाली. याची हकीकत पुढील प्रकरणांत आली आहे. हें ब्राम्हणी राज्य दक्षणेंत सुमारें पावणेदोनशें वर्षें होतें. पुढें तें मोडून त्याचीं अहंमदनगर, विजापूर, गोवळकोंडें, बेदर आणि वऱ्हाड अशीं पांच पृथक् राज्यें झालीं, व तीं मोंगल बादशाहांनीं जिंकीपर्यंत तशींच होतीं. ब्राम्हणी राज्य स्थापन होण्याच्या पूर्वीं कांहीं वर्षें दक्षणहिंदुस्थानांत विजयानगरास एक हिंदू राज्य स्थापन झालें होतें. तेथचे राजे ब्राम्हणी राजांस फार भारी असून दक्षणेंतील बऱ्याच प्रदेशावर ते अंमल करीत होते.

---

# ब्राम्हणी (बाहामिनी) राजांची वंशावळी.



- (१) अल्लाउद्दीन हसन कांगो ब्राम्हणी (बाहामिनी).
  - (४) दाऊद.
    - (८) फेरोज.
      - हसन.
    - महंमदसंजर
      - महंमद
    - (९) अहंमद
      - (१०) अल्लाउद्दीन. (दुसरा.)
        - येह्यारखान.
          - अहंमद
        - (११) हुमायून.
          - (१२) निजाम.
          - (१३) महंमद (दुसरा.)
            - (१४) महंमुद (दुसरा.)
              - (१७) वलीउल्ला.
              - (१५) अहंमद (दुसरा.)
                - (१८) कलीमउल्ला.
              - (१६) अल्लाउद्दीन (तिसरा.)
        - हसन.
      - महंसुद
      - दाऊद.
      - कन्या.
  - (२) महंमद (पहिला.)
    - (३) सुजाईद
  - (५) महंसुद (पहिला.)
    - (६) ग्यासुद्दीन.
    - (७) शमसुद्दीन.

# दक्षिणेंतील ब्राम्हणी (बाह्मनी) घराण्याचा इतिहास.

—:०*०:—

## अल्लाउद्दीन हसनशाहा कांगो ब्राम्हणी.

इ० सन १३४७ ते १३५८.

—:०*०:—

याची मूळपीठिका.—दक्षणेंतील मुसलमानी अमलाची स्थिति.—दिल्लीचा बादशाहा महंमद तघलख यास त्यानें दक्षणेंत नेमलेल्या परमुलखी अधिकाऱ्यांचा बंड करण्याचा बेत आहे असा संशय येणें.—दक्षणेंतील हिंदूराजांस सामील करून घेऊन ते बंड करण्याचा बेत करितात.—ते दवलताबाद घेतात.—दिल्लीचा बादशाहा येतो, व बंडवाल्यांवर स्वारी करितो.—परंतु महंमदास लौकरच दिल्लीस जावें लागतें.—दक्षणेंतील सरदार स्वतंत्र होतात.—ते इस्माएलास सुलतान करितात.—दक्षणेंतील सरदारांपैकीं मुख्य जाफरखान हा दिल्लीच्या कामगारांकडून बेदर आणि कंधारी घेतो, आणि दौलताबादेस जातो.—इस्माएल राज्याधिकार सोडितो, आणि जाफरखान त्याच्या जागीं दक्षणचा सुलतान होतो, व अल्लाउद्दीन हसन कांगो ब्राम्हणी असें नामाभिधान धारण करितो.—तो सैफुद्दीन घोरीस वजिरी देतो, व कलबुर्गी शहर आपली राजधानी करितो.—इस्माएल पुनः राज्यप्राप्ती विषयीं उद्योग करितो.—तो कैद होतो, व ठार मारिला जातो.—त्याचे सरंजाम व त्याचा किताब त्याच्या मुलास मिळतात.—हसन कांगो दक्षणचे चार सुभे करितो.—(१) दाभोळ, कलबुर्गी, रायचूर, आणि मुदगल. (२) चौल, जुन्नर, दौलताबाद आणि पैठण (३) माहूर, रामगड आणि वऱ्हाड (४) बेदर, कौलास आणि इंदूर.—सुलतान क्षीण होऊन मृत्यु पावतो.

---

**हसन हा दिल्लीचा** राहणारा असून तेथील **कांगो** या नांवाच्या ब्राम्हण जोशाच्या घरीं नोकरीस होता. या ब्राम्हणावर शाहाजादा **महंमद तघलख** याची पूर्ण मेहेरबानी होती. हसन याची इमानी नोकरी व चां-

गलें वर्तन पाहून एक बैलाची जोडी व उदरनिर्वाहार्थ कष्टमशागत करण्यास थोडीशी जमीन त्या ब्राम्हणानें त्यास दिली. एके दिवशीं तो शेत नांगरीत असतां नांगर एका घट्ट पदार्थास अडकला. नांगर कशास अडकला याचा तपास करितां सोन्याच्या नाण्यांनीं भरलेल्या हांड्यास लावलेली सांखळी आहे, असें त्यास समजलें. तो हांडा लागलाच त्यानें आपल्या धन्याकडे नेऊन हजर केला. तेव्हां त्यानें हसनाच्या इमानीपणाविषयीं फार तारीफ केली, आणि ती गोष्ट त्यानें शाहाजादा **महंमद तघलख** यास सांगितली. त्यानें ती हकीकत आपला बाप जो दिल्लीचा बादशाहा त्यास कळविली. त्यावरून बादशाहानें हसनास हुजूर बोलावून १०० स्वारांची सरदारी दिली.

मुळपीठिका.

आणखीं असेंही सांगतात कीं, त्या ब्राम्हणानें हसनाची जन्मपत्रिका करून त्याचे ग्रह पाहिले. त्यावरून त्यानें भविष्य केलें कीं, हसन मोठ्या योग्यतेस चढेल व त्यावर ईश्वराची मोठी कृपा होईल. हसनाकडून ब्राम्हणानें असें वचन घेतलें कीं, राज्याधिकार प्राप्त झाल्यावर **कांगो** हें उपनांव धारण करीन, आणि आपणास फडणविशीचें काम देईन. **शेख निजाम उद्दीन आउल्ला** या फकीरानेंही हसनाविषयीं असेंच भविष्य केलें होतें. यामुळें त्यास संधि सांपडतांच तो दक्षणेंत गेला, व तेथेंच त्यानें स्वतंत्र राज्य स्थापिलें.

मुसलमानांनीं देवगडच्या यादव राजांस जिंकून दक्षणेंत अम्मल बसविला, हें वर सांगितलेंच आहे. **महंमद तघलख** दिल्लीच्या गादीवर बसला तेव्हां बहुतेक दक्षण देश मुसलमानांच्या ताब्यांत होता. दक्षणेस **कृष्णा** व **तुंगभद्रा** या नद्यांपर्यंत, पश्चिमेस मलबार किनाऱ्यापर्यंत, आणि पूर्वभागीं **रायचूर, मुदगल कलबुर्गी, बेदर** आणि **विजापूर** इत्यादि शहरें इतका प्रदेश मुसलमानांच्या अमलाखालीं होता.

दक्षणेंतील मुसलमानी अमलाची स्थिति.

**महंमद तघलखानें** तक्तावर बसल्यावर आपला पूर्वीचा गुरु **कतलघखान** यास **अलम् उल्मुल्क** असा किताब देऊन दौलताबादच्या सुभेदारीवर नेमिलें, व त्याच वेळीं ज्या दुसऱ्या सरदारांची त्याजबराबर दक्षणेंत जाण्याची मर्जी होती, त्यांस जाण्याची परवानगी दिली. त्यावरून हसन त्यावेळीं दक्षणेंत आला, व त्यास **महंमदानें रायबाग** परगण्यां-

तील कुची शहर सरंजामांत दिलें.

**महंमद तघलख** हा मोठा जुलमी, क्रूर, खुनशी व लहरी होता. यामुळें त्याची प्रजा व त्याचे सरदार हवालदील असत. या कारणानें त्याच्या अखेरीस त्याच्या राज्यांत चहूंकडे बंडें होऊन जिकडे तिकडे धांदल उडाली. निरनिराळ्या सुभ्यांवर जे अधिकारी होते, त्यांनीं बंडें केलीं. तीं मोडण्याकरितां **महंमदानें** स्वतः कंबर बांधिली. परंतु आज त्यानें गुजराथेंतील बंड मोडिलें, तर उद्यां पंजाबांत किंवा माळव्यांत बंड व्हावें. असा जिकडे तिकडे गोंधळ झाला. त्यासमयीं महंमद तघलख गुजराथेंतील बंड मोडण्याकरितां स्वतः गेला, आणि त्यानें गुजराथच्या बंडखोरांचा पराभव केला. पराभव पावल्यावर कित्येक दक्षणेंत आश्रय घेण्यासाठीं आले. **कतलघखान** आणि त्याचे कामगार यांनीं त्यांस धरून **महंमदाकडे** पाठवावयाचें; तसें न करितां उलटा त्यांस आश्रय दिला. हें वर्तमान महंमदास कळतांच दक्षणेंतील सर्व कामगारांस काढून दुसऱ्या प्रांतीं पाठवावें. या हेतूनें **अहंमदलचीनखानाबरोबर** **अलम् उल्मुल्कास** असा हुकूम पाठविला कीं, दक्षणेंतील सर्व कामगारांस गुजराथेंत पाठवावें. त्याप्रमाणें सुभेदारानें सर्वांस दौलताबादेस बोलाविलें. कांहीं दिवसांनतर सर्व जमले, आणि अहंमदलचीनखानाबरोबर गुजराथेंत निघाले. बादशाहापाशीं आपलें वजन खर्च करून त्यांस माफी करण्याविषयीं खटपट करीन, अशा थापा देऊन दक्षणी कामगारांकडून कांहीं लांच व बक्षिसें उपटावीं असा अहंमदलचीनखानाचा इरादा होता. परंतु या विषयीं त्याची निराशा होतांच तो त्यांची निर्भत्सना करून आपल्या नोकरांपाशीं असें उघडपणें बोलूं लागला कीं, गुजराथच्या बंडखोर सरदारांस आश्रय दिल्याबद्दल आणि सरकारच्या हुकुमाप्रमाणें हुजूर येण्यास इतकी दिरंगाई केल्याबद्दल त्यांस देहांन्त शासनच योग्य आहे, हें ऐकून दक्षणच्या कामगारांच्या मनांत भीति उत्पन्न झाली. व सरहद्दीवर येऊन पोंहोंचतांच त्यांनीं बंड करण्याचा संकल्प केला. त्यांनीं विचार केला कीं, महंमद अगदीं क्षुल्लक अपराधाबद्दल देखील अपराध्यांची चौकशी न करतां देहांत दंड करितो. यास्तव बकरीं खाटि-

महंमद तघलख यास दक्षणेंत नेमिलेल्या कामगारांचा बंड करण्याचा बेत आहे असा संशय येतो.

कांच्या स्वाधीन होतात, त्याप्रमाणें मुकाट्यानें आपण होऊन स्वाधीन होण्यापेक्षां दक्षणेंतच शिरजोरपणानें राहावें, व आपला बचाव करण्याचा यत्न करावा हें चांगलें.

असा निश्चय करून ते अहंमदलचीनास सोडून मागें फिरले. त्यांस हरकत करण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु त्या यत्नांत त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. बादशाहाच्या वर्तनास त्रासलेले शेंकडों लोक त्यांस येऊन मिळूं लागले. आणि दौलताबादेस येऊन पोहोंचतात, तों त्यांजवळ मोठी फौज जमली. दक्षणेंतील हिंदूराजेही महंमदाच्या जुलमी अमलानें गांजले गेले होते. त्यांस हें बंड झालेलें ऐकून मोठा आनंद झाला. कित्येक तर त्यास लागलेच येऊन मिळाले. जे कित्येक दूरदर्शी होते, त्यांणीं गुप्तपणें बंडवाल्यांस द्रव्यसामुग्री देऊन सहाय्य दिलें.

दक्षणेंतील हिंदूराजांस सामील करून घेऊन सरदार बंड करितात.

महंमदाचा जांवई इमाद उल्मुल्क हा वऱ्हाड व खानदेश या प्रांतांचा सुभेदार होता. तो एलिचपूर येथें राहात असे. त्याची फौज त्यास दररोज सोडून जाऊं लागली. तेव्हां त्यास भीति पडली कीं, कदाचित् आपणासही आपले कामगार दक्षणी बंडवाल्यांच्या स्वाधीन करतील. याकरितां शिकारीस जाण्याचें मिष करून कुटुंबासुद्धां एलिचपुराहून नंदूरबारास तो गेला. तो जातांच वऱ्हाडच्या कामगारांनीं सरकारी खजिना लुटला, आणि दौलताबादेस जाऊन बंडवाल्यांस मिळाले. या किल्यावरील लोकांनींही बंडवाल्यांची मोठी जमात पाहून किल्ला त्यांच्या हवालीं केला. याप्रमाणें जो दक्षणदेश जिंकण्यास कित्येक स्वाऱ्या कराव्या लागल्या, व सहस्त्रावधि लोकांचे बळी पडले तो दिल्लीपतीच्या हातांतून जातो, अशीं चिन्हें थोडक्याच महिन्यांत दिसूं लागलीं.

ते दौलताबाद घेतात.

दौलताबाद हस्तगत झाल्यावर आपल्या कृत्यास साजरें करण्याकरितां एकास मुख्य अधिकारी नेमण्याचा बंडवाल्यांनीं निश्चय केला. एक हजार स्वारांचा सरदार एइमाएलखान या नांवाचा प्रतिष्ठित अफगाण सरदार होता, व त्याचा भाऊ मलिक मूघ माळवा प्रांतांतील दिल्लीच्या फौजेचा सेनापति होता.

नासिरउद्दिनास सुलतान करितात.

याचेंही कदाचित् आपणास सहाय्य मिळेल या आशेनें बंडवाले सरदार यांनीं एस्माएलखानास नासिरउद्दिन हा किताब देऊन आपला सुलतान केला. या नूतन सुलतानानें सर्व सरदारांस किताब व सरंजाम दिले. याच समयीं हसन यास जाफरखान हा किताब मिळाला. आणि त्याच्या व त्याच्या फौजेच्या खर्चासाठीं कांहीं प्रांतही त्यास मिळाले.

हें बंड आपण स्वतः गेल्याशिवाय मोडणार नाहीं, असें जाणून महंमद तघलख गुजराथेंतून दक्षणेंत स्वतः फौजेसह आला. त्यास मार्गांतच इमाद्‌उल्‌मुल्क ताब्रिझी आणि मलिक मुघ मा- महंमद तघळख्याचा सुभेदार असे येऊन मिळाले. तो दौलताबा- ख बंडवाल्यांदेजवळ येऊन पोंचला. तों त्यानें येऊन पाहिलें कीं, वर स्वारी करितो. ज्या मैदानावर अल्लाउद्दिनानें देवगडचा रामदेवराव जाधव या राजाचा पराभव केला, त्याच मैदानावर ३०,००० स्वारांसहवर्तमान बंडवाले लढाईस सज्ज झालेले आहेत. बंडवाले सरदार मोठ्या नेटानें व शौर्यानें लढले, आणि त्यांनीं दिल्लीच्या फौजेची डाळ शिजूं दिली नाहीं. महंमदाच्या दोन टोळ्यांचा अगदीं पराभव करून त्यांस चारी दिशांनीं पळविलें. महंमदही पळून जाण्याच्या तयारींत होता, इतक्यांत एक गोष्ट घडली; त्यानें सर्व मान फिरलें; आणि जणूं काय बंडवाल्यांस त्यांच्या राजद्रोही वर्तनाबद्दल ईश्वरीशासनच झालें, असें दिसलें. बंडवाल्या मुख्य सरदारांपैकीं खानजहान या नांवाच्या एका सरदारास मर्मस्थानीं तिराची जखम लागून तो घोड्यावरून खालीं पडला, आणि त्याबरोबर त्याच्या पथकाचे ६,००० लोक रणांतून पळाले. त्या बरोबर नवा सुलतान नासिरउद्दिन याचा निशाणवाला भयाभीत झाला, व त्याच्या हातांतून निशाण पडलें. हें पाहून आपणास आपल्या मुख्यानें सोडिलें, असें बंडवाल्यांस वाटलें व ते मागें हटले. इतक्यांत रात्र पडली, आणि दोहोंकडील फौजा आपापल्या गोटास गेल्या. नासिरउद्दिन यानें जाफरखान व दुसरे सरदार यांस बोलावून सर्वानुमतें असें ठरविलें कीं, तूर्त दुसरी लढाई देणें फायदेकारक होणार नाहीं. यास्तव किल्याच्या बंदोबस्तास पुरे इतकी फौज घेऊन नासिरउद्दिनानें दौलताबादच्या किल्यांत राहावें, आणि बाकी सरदारांनीं आपापल्या जाहागिरी संभाळून महंमदाच्या फौजेस घांस, दाण्यास कुमक मिळूं देऊं नये. असा वि-

चार ठरल्यावर बंडवाले रातोरात जिकडे तिकडे गेले, आणि उजाडल्यावर महंमद पाहतो तों बंडवाल्यांच्या फौजेचा मागमूसही राहिला नाहीं. तेव्हां महंमदानें स्वतः दौलताबादेस वेढा दिला, आणि **इमाद उल्मुल्क तब्रिझी** यास जाफरखानावर पाठविलें. कांहीं दिवस गेल्यावर किल्यावरील लोक निराश होऊन किल्ला स्वाधीन करण्याचे लागास आले होते. इतक्यांत दिल्लीस बंड झाल्याची बातमी येऊन थडकली. **काणीतुर्की** या नांवाच्या गुलामानें महंमदाच्या जुलमास त्रासलेल्या लोकांस हातांखालीं घेऊन राजधानींत कहर उसळून सुभ्यांचीही तीच अवस्था करण्याचा घाट घातला आहे, आणि गुजराथेकडे तो येण्यास निघाला आहे; असें वर्तमान येतांच, दौलताबाद येथील फौज आपल्या एका सरदाराच्या स्वाधीन करून हें नवें बंड मोडण्यासाठीं महंमद दिल्लीस जाण्यास निघाला. या गोष्टीनें दक्षणेंतील सरदारांस उमेद आली. त्यांनीं चौंहोंकडील फौज जमवून दौलताबादेजवळ जी दिल्लीची फौज होती तिजवर हल्ला केला, आणि त्यांचा पराभव करून त्यांस राजाच्या मागोमाग दिल्लीची वाट धरण्यास लाविलें. ती फौज दिल्लीकडे जात असतां त्यांच्या मागें दक्षणेंतील फौज लागली; आणि त्यांचे हाल वनवास करीत त्यांचा नर्मदेपर्यंत पिच्छा पुरविला. या प्रसंगीं दिल्लीवाल्यांचे रोकड लादलेले हत्ती आणि पुष्कळ सामानसुमान दक्षणीफौजेस मिळालें.

महंमद दिल्लीस परत जातो.

**इमाद उल्मुल्क तब्रिझी** बेदरास होता. त्यावर जाफरखान यानें पंधरा हजार स्वारांनिशी स्वारी केली, परंतु शत्रूची फौज जास्त दिसल्यामुळें लढाई करण्यास त्यास धैर्य होईना. शेवटीं जेव्हां तेलंगणच्या राजाकडून १५,००० पायदळ आणि नासिरुद्दिनाकडून ५,००० स्वार अशी कुमक आली, तेव्हां जाफरखानानें इमादावर हल्ला केला. लढाई सकाळपासून संध्याकाळपर्यंत झाली. त्यांत जाफरखानाचीच सरशी होत गेली. अखेर इमाद लढाईंत पडला, आणि त्याच्या सैन्याची दाणादाण होऊन तें पळून गेलें. त्यापैकीं कांहीं लोकांनीं बेदरच्या किल्यांत आश्रय घेतला, कित्येक कंधारीच्या किल्यावर पळाले, आणि कांहीं मोंड्या क-

जाफरखान बेदर व कंधारी हे किल्ले घेतो.

+ दक्षणेंतील कंधार आणि इराणांतील कंदाहार हीं दोन वेगळीं शहरें आहेत, हें वाचकांनीं समजावें.

स्थानें माळव्यांत गेले.

**बेदर व कंधारी** हे किल्ले घेण्यासाठीं मागें **सैफ उद्दिन घोरी** यास ठेवून जाफरखान दौलताबादेस गेला. त्यास नासिरउद्दीन सामोरा गेला, आणि मोठ्या समारंभानें व सन्मानानें त्यास शहरांत आणिलें. अशा उमद्या सरदारापुढें आपलें तेज पडणार नाहीं, व सर्व सरदारांचें व फौजेचें जास्त लक्ष याकडे आहे; असें पाहून नासिरउद्दिनानें सर्व उमरावांस दरबारीं बोलाविलें; आणि त्यांस सांगितलें कीं, "माझ्या सारखा वयातीत मनुष्य या एवढ्या प्रचंड राज्याचा भार वाहण्यास समर्थ नाहीं, यास्तव तुम्हीं राज्यपद दुसऱ्यास द्यावें. या पदास **जाफरखानच** सर्व प्रकारें योग्य आहे, असें मला वाटतें." त्यानें ही सर्वांच्या मनातीलच गोष्ट बोलून दाखविली. या गोष्टीस सर्वांनीं रुकार दिला, आणि सुमुहूर्त पाहून हिजरी सन ७४८ सालीं रबिलाखर महिन्याच्या २४ वे तारखेस (इ. स. १३४७ तारीख १२ आगस्ट) जाफरखानाच्या माथ्यावर राजछत्र उभारून त्यास तक्तावर बसविलें. जाफरखानानें **अल्लाउद्दिन हसन** असा किताब धारण केला. त्याच्या नांवानें खुतबा वाचूं लागले, व नाणीही पाडिलीं. हसनानें आपली राजधानी **कलबुर्गें** शहर केलें, आणि त्यास **हसनाबाद** असें नांव ठेविलें.

जाफरखान दौलताबादेस जातो. इस्माएल तक्त सोडतो व जाफरखान तक्तावर बसतो. तारीख १२ आगस्ट सन १३४७.

**अल्लाउद्दिन हसन** यास राज्यपद प्राप्त झाल्यावर तो राज्याचें काम चांगल्या रीतीनें पाहूं लागला, आणि त्याचें राज्य दिवसेंदिवस वाढत चाललें. थोड्याच काळांत **भीमानदीपासून अडोनी**+च्या किल्यापर्यंत आणि चौल बंदरापासून बेदर शहरापर्यंत सर्व प्रदेश याच्या अमलाखालीं आला. ज्या निजामउद्दीन अवलियानें यास राज्यपद प्राप्त होईल. म्हणून भविष्य केलें होतें, त्याच्या नांवानें हसनानें सिंहासनारूढ होतांच २०० शेर सोनें आणि ५०० शेर रुपें धर्मार्थ वांटिलें. प्रामाणीकपणा व व्यवहार चातुर्य यांविषयीं ज्याची फार प्रसिद्धि होती, असा जो मल्लिक-

तो सैफउद्दीन घोरीस वजिरी देतो. व कांगो ब्राम्हणी हें नांव धारण करितो.

---

+ याचें शुद्ध नांव अदवानी आहे; व हेंच नांव मद्रास सरकारच्या रिपोर्टांत आढळतें.

**सैफउद्दीन** यास आपली वजिरी दिली. ज्या नासिरउद्दिनानें तरव्त रिकामें केलें, व ज्यानें आपले मूळचें इश्माएल हें नांव धारण केलें, त्यास **अमीर उलूउमराव** असा किताब दिला. आपला पूर्वीचा ब्राम्हण धनी यास दिलेलें वचन न विसरतां त्यानें आपल्या नांवास **कांगोब्राम्हणी** असा किताब जोडिला, आणि त्या ब्राम्हणास खजिनदारीचें काम दिलें. तेव्हां तो महंमदतघलखाची नोकरी सोडून दिल्लीहून दक्षणेंत आला. **अल्लाउद्दीन हसनकांगो ब्राम्हणी** या नांवाचा सर्व सरकारी कागदपत्रांत उपयोग होऊं लागला, आणि राजमुद्रेवरही **कांगोब्राम्हणी** हीं अक्षरें कोरविलीं.

हसनानें कांगो ब्राम्हणास नोकरी दिली, ही गोष्ट मोठ्या महत्वाची असें **फेरिस्तास** वाटलें. त्याविषयीं त्यानें असें लिहिलें आहे. फेरिस्ता यानें ज्या काळीं इतिहास लिहिला, त्या वेळीं सर्व साधारण असा समज होता कीं, मुसलमान राजांच्या पदरीं ब्राम्हणानें नोकरी पत्करल्याचें हें पहिलेंच उदाहरण होतें. या पूर्वी ब्राम्हण लोक सरकार चाकरी न करितां वेदपठणांत किंवा इतर धार्मिक कृत्यांत आपला काळ घालवीत. राजसेवा करण्यांत सदाचारानें आयुष्य घालवितां येत नाहीं, असें समजून कशीही निकृष्टावस्था प्राप्त झाली तरी ब्राम्हण सेवापाशांत कधीं सांपडत नसत. वैद्य, ज्योतिषी, शास्त्री किंवा पुराणीक या नात्यानें श्रीमान व अधिकारी यांच्या आश्रयानें कधीं कधीं असत, परंतु मोठ्या देणग्यांच्या किंवा अधिकाराच्या लोभानें सेवारूप शृंखला धारण करण्यास कधींही कबूल होत नसत. कांगो ब्राम्हणानें ही नोकरी पत्करल्यापासून दक्षणचे सर्व राजे जमाबंदीच्या व हिशेबी कामावर ब्राम्हणांसच नेमूं लागले.

अल्लाउद्दिनानें कांहीं सुनीतीनें व कांहीं मणगटाच्या जोरानें महं-

---

+ या व दुसऱ्या कित्येक ठिकाणीं फेरिस्तानें जें लिहिलें आहे, त्यावरून हिंदू लोकांच्या खऱ्या स्थितीविषयीं त्यास फार अज्ञान होतें, असें दिसतें. दक्षणेंत मुसलमानांचा अम्मल बसण्याच्या अगोदर फार प्राचीन काळापासून ब्राम्हण लोकांकडेच गांवचे व सरकारी हिशेब ठेवण्याचीं कामें होतीं, व तेच मुख्यत्वें विद्या शिकत असत. हें फेरिस्ता यास समजलें नव्हतें.

मद तघलखाच्या कारकीर्दीच्या अखेरीस पूर्वी दिल्लीपतीच्या ताब्यांत जेवढा दक्षणेंतील मुलूख होता, तेवढा जिंकिला. सामोपचाराच्या मार्गानेंच बेदर व कंधारी या किल्यांवरील दिल्लीसरकारच्या कामगारांस वश करून ते दोन्ही किल्ले हस्तगत केले. **वरंगूळच्या** राजाशीं दोस्तीचा तह करून त्याजकडून **कौलास** व त्याखालील प्रांत घेतला.

इसवी सन १३५१ सालीं महंमद तघलख मरण पावला. तेणेंकरून दिल्लीहून धाड येण्याची भीति राहिली नाहीं; यामुळें यापुढें राज्याची अंतर्गतस्थिति सुधारण्याकडे हसनानें विशेष लक्ष दिले. याच सालीं अल्लाउद्दिनाचा ज्येष्ठपुत्र **महंमद** याचें मलिक सैफ उद्दिन घोरी याच्या मुलीशीं लग्न झालें. याप्रसंगीं किनखापी, मखमाली, व साटिनचे मिळून १,००० पोषाख, आरबी व इराणी १,००० घोडे व रत्नजडित २०० कटारी व जंब्ये, त्यानें आपल्या पदरच्या सरदारांस वांटिले. लोकांकरितां नानाप्रकारच्या कर्मणुकी सज्ज केल्या होत्या. रस्तोरस्तीं पालें उभारून तेथून मेवा मिठाई रस्त्यांतील लोकांस उधळीत होते. या प्रमाणें लग्नोत्सव सतत एक वर्ष चालला. अखेरीस पदरच्या अमीर उमरावानीं व कामगारांनीं शाहास जवाहीर, रोकड व उमद्या जिनसा नजर केल्या, व उत्साह समाप्त झाला.

शाहाजादा महंमद याचें लग्न.

या संबंधामुळें मलिक सैफ उद्दिन घोरी दरबारांत सर्व दुसऱ्या उमरावांच्या वर बसूं लागला. ही गोष्ट मुख्यत्वें अमीर उल्‌उमरावास रुचली नाहीं. या गोष्टीनें आपला अपमान होतो, अशी त्यानें तक्रार केली. त्यावरून त्यास असा जबाब मिळाला कीं, लष्करी अधिकाऱ्यांच्या वर मुलकी अधिकाऱ्यांस जागा देण्याची रीति सर्व राज्यांत आहे. जरी बाह्यात्कारें आपली समजूत झाल्यासारखें त्याणें दाखविलें; तरी दुसऱ्या असंतुष्ट लोकांस हाताखालीं घेऊन अल्लाउद्दिनास पदच्यूत करून ज्या सिंहासनाचा पूर्वी त्याग केला, त्याच सिंहासनीं पुनः चढावें, अशी त्यानें गुप्तपणें मसलत चालविली. परंतु त्यास ईश्वरी सहाय्य नसल्यामुळें जे कित्येक या मसलतीस पूर्वी सहाय्य झाले, ते सर्व पश्चाताप पावून पुढें फुटले. त्यांनीं अमीर उल् उमरावाच्या दुष्ट बेताची खबर योग्य वेळीं अल्लाउद्दिनास दिली. दरबारच्या मुख्य कामगारांस बोलावून स

इस्माएल पुनः राज्यप्राप्तीविषयीं उद्योग करितो.

वींच्या समक्ष इस्माएलास त्याच्या विश्वासघातकी व राजद्रोही वर्तनाबद्दल दोष दिला. त्यानें आणा शपथा घेऊन सर्व नाकबूल केलें, तेव्हां ज्यांनीं ही खबर सांगितली, त्यांस त्याच्या पुढें आणून उभें केलें. पुढें जे इश्माएलाच्या दुष्टकृत्यास सामील होते, त्यांनीं इश्माएलाचा अपराध शाबीद करण्याजोगा पुरावा हजर केल्यास माफी मिळेल, असा जाहीरनामा लाविला. त्यावरून पुष्कळांनीं पुरावा हजर करून इश्माएलाचा अपराध शाबीत केला. तेव्हां त्यास देहान्त शासन केले; परंतु त्याच्या आप्तवर्गास व अनुयायांस बिलकुल उपद्रव दिला नाहीं. त्याची जिनगी वगैरेही जप्त केली नाहीं, इतकेंच नाही, तर त्याचा मुलगा बहादूरखान यास त्याच्या बापाचें अमीर उल् उमराव हें पदही दिलें. याने व याच्या दुसऱ्या दयामिश्रित त्याची वर्तनानें अल्लाउद्दिनाची कीर्ति वाढत चालली, व त्याच्या अधिकारास अधिकाधिक तेज येत चाललें. तेलंगणच्या राजानें खंडणी वगैरे देण्याचें टाकिलें, तरी त्यानें आरंभीं सहाय दिलें होतें; तें स्मरून त्यानें त्याजवर सक्ती केली नाहीं. या उदार वर्तनामुळें जी खंडणी पूर्वीं दिल्लीस पाठवीत असे, ती अल्लाउद्दिनास आपणच होऊन तो देऊं लागला.

इश्माएल ठार मारला जातो, व त्याचा किताब त्याच्या मुलास मिळतो.

मलिक सैफ उद्दिन याच्या सल्ल्यावरून कर्नाटकच्या[+] राजांस जिंकण्याकरितां अल्लानें मोठी फौज पाठविली. तिकडून त्याचे सरदार विजयी होऊन त्यांनीं तिकडील अनेक राजांकडून खंडण्या व शिवाय २०० हत्ती व १,००० नायकिणी घेऊन परत आले. दिल्लीसरकारच्या दौर्बल्यामुळें गुजराथेंत तेथील बंडखोर सरदारांनीं धांदलपट्टी चालविली होती, यामुळें गुजराथच्या प्राचीन राजांचा मुखत्यार प्रेमराय यानें गुजराथेवर स्वारी करण्यास अल्लाउद्दिनास बोलाविलें. हसनानें सन १३५४ सालीं शाबान महिन्यांत तयारी करून बिनी बाहेर काढिली. आघाडीस शाहाजादा महंमद यास २०,००० स्वारांसह पुढें पाठविलें, आणि आपण मागून लहान लहान मुक्काम करीत निघाला,

आगष्ट स. न १३५७ इ.

+ कोल्हापूर आणि बेदर यांमध्यें एक रेषा काढली तर तिच्या दक्षणेस ज्या मुलखांत कानडी भाषा बोलतात. त्यास कर्नाटक हें नांव फेरिस्तानें दिलें आहे.

शाहाजादा **नवसरीस** पोंचला, तेव्हां तेथें त्यास फार शिकार आढळली. त्यानें आपल्या बापास ही खबर कळविली. तो शिकारीचा मोठा शोकी होता. मुलाचें पत्र पावतांच तो मोठ्या त्वरेनें नवसरीस आला, व एक महिनाभर त्यानें शिकारींत घालविला. महिना लोटल्यावर त्यास ज्वर येऊं लागला. ज्वरांश असतां दांडगा व्यायाम न करणें, आणि जडान्न सेवन न करणें इत्यादि गोष्टींविषयीं सावधगिरी न घेतल्यामुळें तो रोग इतका बळावत चालला कीं, त्यास कलबुर्ग्यास परत यावें लागलें. राजधानीस परत आल्यावर काजी, मुल्ले व फकीर वगैरेंस बोलावून त्यांसमक्ष त्यानें अशी शपथ घेतली कीं, पुनरपि कुराणांत ज्या गोष्टी वर्ज धरिल्या आहेत, त्या कधीं करणार नाहीं.

याच समयीं त्यानें आपल्या राज्याचे चार सुभे केले. कलबुर्ग्यापासून पश्चिमेस दाभोळपर्यंत, आणि दक्षिणेस रायचूर व मुदगलपर्यंत एक सुभा करून त्यावर **मलिक सैफ उद्दीन घोरी** यास सुभेदार नेमिलें. चौल बंदर, जुन्नर, दौलताबाद, बीड आणि पैठण या परगण्यांचा एक सुभा करून आपला बंधू अमीरअल्ली याचा मुलगा **महंमदखान** यास सुभेदार नेमिलें. उत्तरेस माहूर, रामगड व वऱ्हाडचा कांहीं भाग यांचा एक सुभा करून त्यावर **सफदरखान शिस्तानी** यास नेमिलें. बेदर, इंदूर, कौलास आणि तेलंगणांतील प्रांत यावर मलिक सैफ उद्दिन घोरी याचा मुलगा **अझीम हुमायून** यास नेमिलें.

तो राज्याच्या व्यवस्थेकरितां चार विभाग करितो.

सुलतान पुढें सहा महिने तसाच आजारी होता, व त्याची शक्ति क्षीण होत चालली. तरी तो दररोज दोन वेळ कचेरींत येऊन मुलकी व न्यायाचें काम करी, आणि गरीब दुबळ्यांची दाद घेत असे. खुनी कैद्यांशिवाय इतर सर्व कैद्यांस सोडून देण्याविषयीं त्यानें हुकूम दिला. खुनी कैद्यांस कलबुर्ग्यास आणून त्यांची समक्ष चौकशी केली, आणि सात शिवाय बाकीच्यांस सोडिलें. सात असामीस आपला मुलगा महंमद याच्या स्वाधीन केलें, आणि आपल्या पश्चात् योग्य दिसेल त्या प्रमाणें तजवीज कर, असें सांगितलें. औषधांपासून गुण

---

+ [illegible] तापीच्या कांठीं.

येत नाहीं, असें पाहून सर्व हकीमांस निरोप दिला, आणि सर्व मानवी दुःखांपासून मुक्त करणारा जो मृत्यु त्याची शांतपणें मार्गप्रतिक्षा करूं लागला. या अवस्थेंत असतां त्याचा कनिष्ठ पुत्र महमूद आपल्या गुरूबरोबर वाचीत असतां त्यास कोणतें पुस्तक वाचीत आहेस, म्हणून विचारिलें. तेव्हां त्यानें सादीचें बुस्तान वाचीत आहें असें उत्तर दिलें; व त्या दिवशींच्या धड्याचें सार असें आहे, म्हणून पुढील वाक्य त्यानें म्हटलें. "मी असें ऐकलें आहे कीं, दिव्य व दरदी पुरूष जो जमशीद त्यानें एका झऱ्याच्या संगमरवरी पाषाणावर असे शब्द कोरविले होते. माझ्या सारख्या पुष्कळ पुरुषांनीं हा झरा पाहिला, व त्यांचे नेत्र कायमचे मिटले गेले. चातुर्यानें व पराक्रमानें मी हें सर्व जग जिंकिलें, परंतु मृत्यूस जिंकण्याचें सामर्थ्य माझ्या आंगीं नाहीं.

हें ऐकून सुलतानानें सुस्कारा टाकिला, आणि आपले मुलगे दाऊद आणि महंमद यांस आपले पुढें बोलावून त्यांस सांगितलें कीं, माझा हा तुम्हांस शेवटलाच उपदेश आहे. राज्य चिरायू व्हावें अशी तुमची इच्छा असेल तर एकमेकांशीं न भांडतां सलूख्यानें वागा. महंमद हा माझ्या मागून तख्तावर बसेल. त्याशीं नम्रतेनें व एकनिष्ठेनें वागणें हेंच तुझें कर्तव्य आहे, असें समज. येणेंकरून इहलोकीं व परलोकीं तुला सुख प्राप्त होईल. नंतर त्यानें आपल्या खजानिसास बोलावून उभयतांपाशीं तत्क्षणीं गरीबांस वाटण्याकरितां द्रव्य दिलें. त्या प्रमाणें धर्म करून आलों असें सांगतांच "ईश्वराचा जयजयकार असो." असे शब्द उच्चारून त्याणें प्राण सोडिला. अल्लाउद्दिन तख्तावर बसल्यावर ११ वर्षें २ महिने ७ दिवसांनीं हिजरी सन ७५९ रबिलावल तारीख १ रोजीं (इसवी सन १३५८ आगस्ट तारीख १०) आपल्या वयाच्या ६७ वे वर्षीं मरण पावला.

शहाचा मृत्यू. ता० १० आगस्ट सन १३५८ इ०

अल्लाउद्दिनास एका प्रसंगीं कोणी विचारलें कीं, तुझ्या जवळ मोठा द्रव्यसंचय नसतां व मोठें सैन्य नसतां तूं राज्यपद कसें मिळविलेंस? तेव्हां त्यानें असें उत्तर दिलें कीं, दोस्तांवर दया व कृपा करून, शत्रूंशीं उदार वर्तन ठेवून व सर्व मानवीमाण्यांशीं मो-

च्या सभ्यतेनें व थोरमनानें वागून मी राज्य संपादन करूं शकलों. कित्येक ग्रंथकारांनीं असें लिहिलें आहे कीं, इराणाच्या प्राचीन राजांपैकीं **बाहमन** नांवाच्या राजाच्या वंशांत अल्लाउद्दिनाची उत्पत्ति झाली होती. यास अनुसरून तयार केलेला ब्राम्हणी राजांचा वंशवृक्ष अहमदनगर येथें उपलब्ध आहे. परंतु याविषयीं **फेरिस्ता**नें आपलें मत असें निश्चयात्मक दिलें आहे कीं, अल्लाउद्दिनास राज्य प्राप्त झाल्यावर स्तुतिपाठकांनीं किंवा कवींनीं ही वंशावळ बनविली असावी. हसन इतक्या अप्रसिद्ध कुळांत जन्मला होता कीं, त्याचा मूळ वंश बरोबर रीतीनें समजण्याजोगा नव्हता. आपला मूळचा धनी जो कांगो ब्राम्हण त्याचा मान देण्यासाठींच त्यानें **कांगो ब्राम्हणी** असें उपपद धारण केलें यांत संशय नाहीं. ग्राम्य मुसलमानांत **ब्राम्हण** याचा उच्चार बाहामन करितात, व यावेशास फारशींत **बाहामिनी** असें म्हणतात.

# प्रकरण ३.

# महंमदशाहा बाहामिनी.

## (पहिला.)

इसवी सन १३५८—१३७५.

दरबारच्या वैभवाचें वर्णन.—— शाहा चौकोनी आकाराचें नाणें पाडितो.——हिंदू लोक त्याचा उपयोग करीत नाहींत, व तसलें नाणें वितळवितात.—— याबद्दल कित्येक हिंदूंस देहांत शिक्षा होते.—— विजयानगर आणि वरंगूळ येथील राजे महंमदशाहाशीं लढाई करितात.—— हिंदूंचा पराभव होतो.—— शाहा वेलंपट्टनास जातो.—— तेथील राजाशीं त्याचें क्रूरवर्तन.—— शाहाची फौज मागें हटत असतां तिची कत्तल होते व शाहा जखमी होतो.—— वरंगूळच्या राजानें शाहास शरण येऊन तह केला.—— या प्रसंगींच त्यानें शाहास प्रसिद्ध तक्तफेरोज म्हणजे अस्मानी सिंहासन नजर केलें.—— गाणें बजावण्याच्या लहरींत गवयांच्या बिदागीबद्दल विजयानगरच्या खजिन्यावर शाहा वरात देतो, व यामुळें लढाई होते.—— विजयानगरचा राजा मुद्गलचा किल्ला घेतो, आणि तेथील सर्व सैन्याची कत्तल करितो.—— महंमद एक लाख हिंदूंस मारण्याची प्रतिज्ञा करितो.——हिंदूंचा पराभव होऊन पहिल्याच लढाईंत ७०,००० हिंदु लोकांस मुसलमान ठार मारितात.—— त्यांच्या राजास राजधानींत मुसलमान कोंडतात.—— गवयांस राजा वरातीप्रमाणें बिदागी देतो, आणि तह होतो.—— दौलताबादेस बहिरामखान बंड करितो.—— त्याचा पैठणास पराभव होतो, आणि अखेरीस तो गुजराथेंत पळून जातो.—— महंमदशाहाच्या मुल्की कारभारांचें वर्णन.—— त्याचा मृत्यु.

---

दरबारच्या वैभवाचें वर्णन.

महंमदशाहा तक्तावर बसल्यानंतर त्यानें प्रथमतः दरबारचें वैभव बरेंच वाढविलें. तक्तावरील छतास रत्नजडित सोन्याचा एक गोल टांगिला, आणि त्यावर मौल्यवान् रत्नांचा एक पक्षी बसविला. व याच पक्ष्याच्या डोळ्यांत विजयानगरच्या राजानें माजी शाहास नजर केलेला अतिमौल्यवान माणिक बसविला. आपल्या परिवाराची संख्याही त्यानें वाढविली. सरदार व कामगार यांचे ४ वर्ग करून प्रत्येक वर्गाकडे नियमित कामें सांगितलीं, आणि दरबा-

रीं केव्हां हजर राहावयाचें त्या वेळाही ठरविल्या. बारदारांचें एक पथक भरिलें. फौजेची हजिरी घेणें आणि जे लोक भेटीस येतील त्यांस शाहास भेटविणें, हीं कामें त्याजकडे सांगितलीं. सरदार व बडे लोक यांच्या मुलांपैकीं मुलें निवडून असल्या २०० तरण्याज्वानांची एक शिलेदारांची+ नवी टोळी दरबारीं ठेविली. त्यांचें काम शाहाचें चिलखत व हत्यारें नेण्याचें असे. ४,००० लोकांचें रक्षक सैन्य ठेवून त्यावर मोठ्या दर्जाच्या एका सरदारास नेमिलें, व त्यास मीरमोबत हा किताब दिला शाहाच्या महालांत ५० शिलेदार आणि १,००० रक्षक फौज दररोज हजर असे. शुक्रवार खेरीज करून दररोज सकाळीं शाहा दरबारांत येई, आणि दोनप्रहरच्या निमाजाची वेळ झाली, असें मुआझिन (डांगोऱ्या) कळवीपर्यंत काम करीत बसे; आणि नंतर कचेरी बरखास्त होई. तक्तावर बसण्यापूर्वीं आपल्या बापाच्या सन्मानार्थ तक्तास साष्टांग नमस्कार घालून नंतर तक्तावर चढे. तक्त रुप्याचें असून त्यावर सुंदर छत होतें, आणि तें उंची बैठकीवर ठेविलेलें असे. भेटीच्या दिवाणखान्यापुढील चौकास मखमाली पडदे लाविलेले असत. प्रांतांच्या प्रत्येक सुभेदारांस त्यानें तर[illegible]दार हें नांव दिलें. मलिक सैफउद्दिन घोरी या सरदारास शाहापुढें बसण्याचा मान मिळत होता, परंतु हा हक्क सोडून देण्याविषयीं शाहानें त्यास सांगितल्यावरून तोही दुसऱ्या सरदारांप्रमाणें शाहापुढें उभा राहूं लागला. नियमित वेळीं रोज ५ वेळां नौबत* किंवा चौघडा वाजे आणि शाहाच्या भेटीस जे लोक येत त्यांस गुडघे टेंकून जमिनीस कपाळ लावून मुजरा* करावा लागे. ब्राम्हणी राज्य मोड-

---

+ याच शाहाच्या कारकीर्दींत शिलेदार या शब्दाचा प्रथम उपयोग करूं लागले. व हल्लीं हा शब्द दक्षणेंत फार साधारण झाला आहे. शिलेदार स्वारासच म्हणतात; परंतु शिलेदाराचा घोडा स्वतःचा असतो, व तो स्वारींत जातो तेव्हां बरोबर एक दोन नोकर असतात.

* बत् या फारशी शब्दाचा अर्थ वाद्य असा आहे, आणि नौ याचा अर्थ नऊ असा आहे. आरंभीं नौबत नऊ निरनिराळ्या वाद्यांची होती. पुढें प्रत्येक जातीचीं अनेक वाद्यें ही त्यांत सामील करूं लागले.

* मुजरा करण्याची ही रीति आतां हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं बंद (पुढें चालू.)

त्यावर दक्षणेंतील दुसऱ्या कित्येक शाहांनीं छत्र धारण केलें, आणि खुतबाही आपल्या नांवानें पढवूं लागले. परंतु गोंवळकोंड्याच्या कुतुबशाहा शिवाय दक्षणेंतील दुसऱ्या कोणी मुसलमान बादशाहानें सोन्याचें नाणें आपल्या नांवानें पाडिलें नाहीं. आणि दररोज ५ वेळ नौबत वाजविण्याचीही वहिवाट सुरू केली नाहीं.

शाहा चौकोनी आकाराचें नाणें पाडितो.

बाहामिनी शाहाचीं नाणीं चौकोनी असून भिन्न भिन्न किमतीचीं होतीं. त्यांच्या एका बाजूवर मुसलमानी धर्माचें तत्व आणि आशाबांचीं (पहिल्या चार खलिपांचीं) नांवें असत. दुसऱ्या बाजूवर शाहाचा किताब आणि नाणें पाडल्याचें वर्ष असे.

हिंदु लोक त्या नाण्याचा उपयोग करीत नाहींत, व तें नाणें वितळवितात.

विजयानगर आणि तेलंगण येथील राजांच्या चिथावणीवरून हिंदु सावकारांच्या हातीं जीं असलीं नाणी पडत, तीं सर्व ते वितळवीत. यांत त्यांचा हेतु असा असे कीं, दक्षणेंत हिंदूंनीं पाडलेलीं नाणी मात्र चालू राहावीं. हा अपराध वारंवार होऊं लागला; तेव्हां शाहास कोप येऊन त्यानें असें कृत्य करणाऱ्या पुष्कळ लोकांस देहांत शासन दिले, आणि टांकसाळीच्या व सराफखान्याच्या कामावर कांहीं सुनी लोकांस मात्र ठेविलें. दक्षणेंत जे दिल्लीचे रहिवाशी पूर्वी वसाहत करण्यास आले होते, त्यांचे सुनी हे वंशज होते. यानंतर मुसलमानी राज्यांत बाहामिनी शाहाचेंच नाणें चालू झालें. हें घराणें लयास गेल्यावर मात्र हिंदू राजांचीं नाणीं चालूं लागलीं.

विजयानगर आणि वरंगूळ येथील राजांशीं लढाई.

महंमदशाहा राज्य करूं लागल्यावर थोड्याच दिवसांनीं त्याच्या बापानें हिसकावून घेतलेले आपले प्रांत विजयानगर आणि तेलंगण येथील राजे परत मागूं लागले. आणि परत न दिले तर स्वारी करूं, इतकेंच नाहीं तर दिल्लीच्या बादशाहाच्या सैन्याची धाडही तुमच्या मुलखावर आणूं. या समयीं पदरच्या सरदारांपैकीं कांहीं सरदारांवर शाहाचा पूर्ण भरंवसा नव्हता, आणि त्याची आई मलिका जहान ही मक्का, मदीना आणि करवला या ठिका-

झाली आहे. व ही पद्धत करून तार्तर लोकांनीं या देशांत आणिली असावी.

णीं यात्रेस निघाली, तेव्हां फार खर्च झाल्यामुळें खजिन्यांत शिल्लक नव्हती. यास्तव तयारी करण्यास काळ मिळावा, म्हणून हिंदूराजांकडील वकिलांस १८ महिनेपर्यंत शाहानें दरबारीं ठेवून घेतलें. आणि बोलणें करण्यास म्हणून आपले वकील त्यांच्या दरबारीं पाठविले. या काळांत ज्या सरदारांविषयीं शाहास अंदेशा आला होता, त्यांस कामावरून दूर करून त्यांच्या जागीं आपल्या भरंवशाच्या सरदारांस नेमिलें, आणि आईही यात्रेहून परत आली. तेव्हां लढाई करण्याचा निश्चय करून शाहानें सोनें, जवाहीर व दक्षणेंतील अति मौल्यवान कपडे लादून आपल्या उत्तम हत्तीपैकीं कांहीं हत्ती द्यावे, असें उलट हिंदूराजांकडे शाहानें मागणें केलें. त्याबरोबर तेलंगणच्या राजानें आपला पुत्र **विनायकदेव** याजबरोबर सैन्य देऊन **कौलास** हा प्रांत परत घेण्याकरितां रवाना केलें, आणि त्याच्या मदतीस विजयानगरच्या राजानें मोठी फौज पाठविली. **बहादूरखान** मोठें मुसलमानी सैन्य घेऊन हिंदूफौजेच्या तोंडावर गेला, आणि त्यांचा पराभव करून मुलूख लुटीत थेट वरंगुळापर्यंत गेला. तेव्हां हिंदूराजांस २५ हत्ती, पुष्कळ मौल्यवान् रत्नें व मोठी नक्त खंडणी देणें भाग पडलें; तेव्हां **बहादूरखानानें** हत्ती व खंडणी कलबुर्ग्यास शाहाकडे नजर पाठविली.

हिजेरी सन ७७३ च्या अखेरीस दूरच्या प्रांतांतून कांहीं कारवान लोक घोडे विकण्यास घेऊन आले. परंतु ते घोडे शाहानें नापसंत करून हे घोडे आपल्या लायख नाहींत, असें त्यांस सांगितलें. तेव्हां कारवानांनीं शाहास असें कळविलें कीं, आपल्याजवळ याहून फार उत्तम घोडे होते, व ते आम्हीं आपणाकरितांच मुद्दाम आणिले होते. असें सांगत असतांही **वेलंपट्टण** येथें **विनायक देवानें** जबरीनें कमी किमतीस ते आमच्यांकडून घेतले. महंमदशाहाच्या मनांत विनायकदेवाविषयीं पूर्वींच डवचन होतें. अपमान केल्याचें हें नवीन उदाहरण कानीं पडतांच सूड घेण्याचा त्यानें निश्चय केला. आणि **मलिक सेफ उद्दीन घोरी** याजकडे राज्यकारभार सोंपवून सुलतानपूर येथें सैन्य जमविलें, आणि १० दिवस राहून सैन्याची नीट शिस्तवार व्यवस्था केली. या ठिकाणीं असतां **महंमद जिराज उद्दीन जुनेदी** या सर्वमान्य साधूनें यश यावें म्हणून निमाज पढून आशीर्वाद दिला. आणि अकराव्या दिवशीं लहान लहान मुक्काम करीत तेलंगणावर

शाहा वेलंपट्टनास जातो.

स्वारी करण्यास निघाला. कल्याणांस येऊन पोंचल्यावर आपल्या पदरच्या एका खुषमस्कऱ्यास विनोदानें विचारिलें कीं, आपण वेलंपट्टनास+ किती दिवसांनीं पोंचूं? तेव्हां त्यानें स्पष्ट असें उत्तर दिलें कीं, हल्लींच्या मानानें स्वारी चालल्यास कदाचित् १२ महिने तरी पुरतील किंवा नाहींत, याची शंका वाटते. हें ऐकून शाहास आवेश आला, आणि लागलेंच ४००० स्वारांचें एक ल्हानसें पथक घेऊन अशा त्वरेनें निघाला कीं, एका आठवड्यांत वेलंपट्टनाजवळ जाऊन पोंचला. नंतर आपल्यापैकीं कांहीं कसलेल्या लोकांस आंगावर फाटक्या तुटक्या चिंध्या घालून कारवानाच्या वेषानें आपणास मार्गांत चोरांनीं लुटलें आहे, असें सांगत शहरांत जाण्यास हुकूम केला. यांत त्याचा हेतु असा होता कीं, येणेंकरून वेशीवरच्या रखवालदारांचें लक्ष चोर पकडण्याकडे जावें. हे शिपाई शहरांत शिरतांच वेशीवरील रखवालदारांनीं त्यांस कोण कोठले म्हणून विचारिलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, आम्ही व्यापारी असून या शहरानजीकच चोरांच्या एका मोठ्या टोळीनें लुटलें. म्हणून सुभेदारापाशीं दाद मागण्यास आलों आहोंत. इतक्यांत महंमदशाहा १००० स्वार घेऊन निघाला, आणि रखवालदार वेशी बंद करूं लागले तेव्हां शाहाच्या स्वारांनीं त्यांस अटकाव केला. आणि शाहा शहरांत शिरला. आणि दया माया न करितां शहरच्या लोकांस ठार मारण्यास आरंभ केला. असा शत्रु येण्याचें ध्यानीं मनीं नसल्यामुळें विनायकदेव एका मेजवानींत गुंतला होता. त्यास ही

+ बुखांतील नांव जशाचें तसेंच ठेविलें आहे. परंतु या गांवाचें स्थळ कोठें आढळत नाहीं. वेलमकोंडा किंवा बेलमन्कोंडा ही २०० वर्षांनंतर एका बलाढ्य राजाची राजधानी होती, असें आढळतें. यास्तव वेलमकोंडा हेंच खरें नांव असावें असें वाटतें. पट्टण (शहर) आणि कोंडा (पहाड) हे प्रत्यय अनेक वेळां एकाच अर्थीं स्थळांस लावितात. हें शहर-पाहाडी होतें, म्हणून यास बेलमकोंडा हें नांव असावें; परंतु वेलंपट्टन हें नांव मुसलमानांनीं यासच दिलें आहे, असें मानण्यास एक मात्र अडचण येते. वर कौलास आणि कल्याण हीं जीं शहरें सांगितलीं आहेत. तीं कलबुर्ग्याहून बेलमन्कोंड्यास जाण्याच्या जवळच्या रस्त्यावर नाहींत.

भयंकर खबर कळतांच तो घाई घाईनें किल्यावर पळाला. परंतु शाहानें विलंब न करितां त्यावरही हल्ला केला. तेव्हां थोडेंसें उगाच तोंड देऊन विनायक देव मागील एका चोरदारानें किल्यांतून निसटला, परंतु शहरामध्यें शाहाच्या लोकांनीं त्यास कैद केलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं कलबुर्ग्यास कारखान येत असतां त्यांचे घोडे कां हिसकावून घेतले? असें शाहानें त्यास विचारिलें. विनायकदेवानें त्यास उद्धट उत्तर दिलें. तेव्हां शाहानें पूर्वी त्यास जिवदान द्यावें असा निश्चय केला होता, तरी हें उत्तर ऐकतांच किल्यानजीकच एक लांकडाचा ढीग होता, तो पेटविण्यास शाहानें हुकूम दिला. नंतर विनायकदेवाची जीभ कापून त्यास मंजनीकावर बसविलें, आणि किल्याच्या तटावरून त्यास विस्तवाच्या ढिगांत फेकून दिलें. तेथें तो तात्काळ मरण पावला. या प्रमाणें यश संपादन केल्यावर शाहानें त्या शहरीं १५ दिवस मुक्काम केला. इतक्यांत त्याचें सर्व सैन्य येऊन मिळालें. तेव्हां वेशीबाहेरच त्यांची छावणी दिली; आणि आपण झाले श्रमाचा परिहार करण्याकरितां विश्रांति घेण्यास राहिला, आणि ऐषआरामांत निमग्न झाला. विनायकदेवाचा सर्व खजिना हस्तगत करून आणि शहरच्या लोकांकडून मोठी खंडणी घेऊन शाहा वेलंपट्टणाहून आपल्या राजधानीस परत जाण्यास निघाला, परंतु तेलंगी लोकांची आतां मोठी फौज जमली होती. त्यांनीं यास चोहोंकडून गराडा घालून शाहा कूच करीत असतां त्यास उपद्रव देऊं लागले. यामुळें शाहा इतका त्रासला कीं, सोनें व जवाहीर शिवाय करून तंबू, डेरे, राहुट्या व बरोबर आणिलेली लूट वगैरे सर्व जाळून टाकण्यास त्यानें हुकूम दिला. या प्रमाणें स्वारी सडी झाल्यावर उजाडल्यापासून अस्तमानपर्यंत जुटीनें जाण्याची शिस्त धरिली. आणि रात्रीं कदाचित् छापा येईल या भीतीस्तव मुक्कामाच्या ठिकाणीं फार सावधगिरीनें राहूं लागला. आणि मार्गांतील खेड्यांतून रोजच्या रोज धान्य सामुग्री मिळेल, अशा भरंवशावर या प्रमाणें कूच केलें. इतकी सावधगिरी केली तरी शत्रूनीं याच्या लोकांपेकीं इतक्यांस मारिलें कीं, ४,००० लोकांपेकीं फक्त १५०० लोक परत आले. शाहास बाहूवर जखम लागली, आणि कोलास येथें त्यास तवि-

तेथील राजाशीं त्याचें क्रूरवर्तन.

शाहाची फौज मागें हटत असतां तिची कत्तल होते. व शाहा जखमी होतो.

यन बिघडल्यामुळें मुक्काम करावा लागला. इतक्यांत सुदैवानें मलिक सैफ उद्दीन घोरी बहुतेक सैन्यासह घेऊन मिळाला. यामुळें तेलंगी-लोकांची कत्तल करून त्यांस त्यांच्या मुलखांत हांकून दिलें, आणि त्यांचीं कित्येक ठाणीं घेऊन शाहा कलबुर्ग्यास परत आला.

आपल्या चिरंजिवाचा वध झाल्याचें ऐकून तेलंगणच्या राजास फार कोप आला, आणि त्यानें दिल्लीचा बादशाहा फेरोज तघलख यास पत्र लिहून त्याची ताबेदारी पत्करिल्याचें त्यास कळविलें. आणखी त्यानें बादशाहास असें लिहिलें कीं, दक्षणेंतील शाहाचा प्रांत परत घेण्याकरितां बादशाहा फौज पाठवील तर त्या फौजेसह आपण लढूं. आणि बादशाहास मोठी खंडणीही देऊं. त्याच प्रमाणें त्याचा दोस्त विजयानगरचा राजा यानेंही बादशाहास लिहिलें. परंतु फेरोज तघलख घरगुती कलहांत फार गुंतला होता; यामुळें त्यास त्यांच्या अर्जाकडे लक्ष देण्यास किंवा सहाय्य करण्यास सवड झाली नाहीं.

हिंदू राजांनीं या प्रमाणें दिल्लीच्या बादशाहाकडे बोलणें चालविल्याचें ऐकून व दिल्लीदरबारची निर्बलता मनांत आणून सर्व तेलंगण प्रांत सर करण्याचा महंमद शाहानें संकल्प केला. पुनरपि महंमद सैफ उद्दीन याजवर राज्यांतील अंतर्गत कारभार सोंपवून शाहानें कौलास या ठिकाणीं कूच केलें. तेथून अझीम हुमायून यास बेदरचें सैन्य देऊन गोंवळकोंड्यास रवाना केलें. सफदरखानास सैन्य देऊन वरंगुळावर पाठविलें, आणि आपण स्वतः नियमित मुक्काम करीत वरंगुळाकडे निघाला. दिल्लीहून कुमक मिळण्याची निराशा झाली, तेव्हां तेलंगणच्या राजानें मुसलमानी फौजेशीं लढाई करण्याचें रहित केलें, आणि पहाडांत आश्रय घेऊन आपल्या कांहीं सरदारांस बहादूरखानाकडे+ (कौलासचा सुभेदार) पाठविलें. आणि शाहाकडे तह्राविषयीं मध्यस्थी करण्याकरितां विनंति केली. शाहानें प्रथमतः तह करण्याचें नाकबूल केलें. तेव्हां वरंगूळच्या राजानें आपल्या चिरंजिवांपैकीं एकास शाहाच्या छावणींत पाठवून आपण शरण आलों आहों असें कळविलें. तेव्हां सरदारांच्या अत्याग्रहास्तव शाहाच्या दर्ज्यास आ-

---

+ बहादूरखान यास पूर्वी वरंगुळच्या राजाकडे वकिलीच्या कामावर नेमिलें होतें.

वरंगूळच्या राजाशीं तह.

णि मरातबास योग्य अशीं जीं कलमें बहादूरखान ठरवील, तीं मान्य करण्याचें महंमदशाहानें कबूल केलें. तीं कलमें अशीं ठरलीं:- वरंगूळच्या राजानें ३०० हत्ती, २०० मौल्यवान घोडे आणि ३३,००,००० रुपये इतकी खंडणी द्यावी, आणि गोंवळकोंड्याचा पहाडी किल्ला त्याखालील मुलखासह कायमचा हवालीं करावा. मुसलमानांची फौज तेलंगणच्या मुलखांत जवळ जवळ दोन वर्षें राहून प्रांताची फार खराबी केल्यामुळें राजा फार टेंकीस आला होता. म्हणून हीं कलमें मान्य केल्याशिवाय सुटकेचा दुसरा मार्ग त्यास दिसला नाहीं. हा ठराव कायम झाल्यावर आणखीं असें ठरलें कीं, महंमदशाहानें फौज घेऊन मागें जावें, आणि बहादूरखानानें कौलास येथें राहून तहाची अम्मलबजावणी करावी. गोंवळकोंड्यावर अझीम हुमायुनास नेमून महंमदशाहा राजधानीकडे परतला. आणि बेदर येथें पोंचल्यावर सैन्यास निरोप देऊन तीन महिने तेथें राहिला.

तक्त फेरोज (अस्मानी तक्त) शाहास वरंगूळचा राजा नजर करितो.

राजाचे वकील कौलास येथें आले. तेव्हां बहादूरखानानें त्यांस शाहास भेटविलें, आणि त्यांनीं तहाप्रमाणें सर्व ऐवज नजर केला. त्यावेळीं शाहानेंही त्यांस उंची पोषाख दिले, आणि शिवाय राजाकरितां कांहीं उत्तम घोडे व जवाहीर उलट नजर केलें. यानंतर कांहीं दिवसांनीं राजाकडील वकिलांनीं येऊन बहादूरखानास असें कळविलें कीं, तेलंगणच्या राज्याच्या हद्दी कायम ठेवून आपले वंशज वरंगूळच्या राज्यावर पुनः कधीं स्वारी करून उपद्रव देणार नाहींत, अशा तहावर बादशाहा सही करितील तर आमचे यजमान सार्वभौम राजांस जवळ बाळगण्यास योग्य अशी एक चीज नजर करितील. बहादूरखानानें राजाचे म्हणणें शाहास कळविलें. तेव्हां कोणती चीज नजर करणार हें समजण्याविषयीं शाहास उत्कंठा उत्पन्न झाली. वकिलांस शाहास भेटविल्यावर त्यांनींही राजाचा निरोप पुनः तसाच कळविला. महंमदशाहास त्यांचें म्हणणें इमानपुरःसर आहे असें वाटलें, तेव्हां वरंगूळच्या राज्याची गोंवळकोंडें ही हद्द ठरवून तेलंगणचे राजे जोंपर्यंत इमानानें वागतील तोंपर्यंत आपल्या मागून गादीवर येणाऱ्या शाहांनीं त्यांस उपद्रव देऊंनये, असा तहनामा स्वतः हातानें लिहिला. नंतर त्यावर शाहाची सही व शिक्का मोर्तब होऊन त्यावर काजी आणि मुख्य सरदार यांच्या साक्षी पडल्यावर मोठें मौल्यवान रत्नजडित असें तक्त हिंदुवकिलांनीं शाहास नजर केलें. तेलंगणच्या राजानें

दिल्लीचा बादशाहा **महंमद तघलख** यास नजर करण्याकरितां हें आरंभीं केलें होतें. महंमदशाहा अत्यंत खुष झाला, आणि त्यानें फार सन्मानपूर्वक वकिलांस निरोप दिला. शाहा कलबुर्ग्यास आल्यावर मोठा उत्साह करून मोठ्या डौलानें त्या तक्तावर चढला आणि त्यास **तक्त इ फेरोज** (अस्मानी तक्त) असें नांव दिलें. नंतर मोठा दरबार भरून लढाईंत ज्यांनीं शौर्य दाखविलें होतें, त्यांस मौल्यवान नजरा आणि किताब दिले. आपल्या वडिलांचें जें रुप्याचें तक्त होतें, तें मौल्यवान जुन्या चिजांमध्यें रत्नशाळेंत ठेवावें असा हुकूम दिला.

सुलतान **महंमूदशाहा** (१४८२) ब्राह्मणीच्या कारकीर्दींत **तक्त इ फेरोज** ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें, अशा जुन्या लोकांनीं त्या तक्ताचें खालीं लिहिल्याप्रमाणें आपल्यापाशीं वर्णन केलें, असें **फेरिस्ता** या इतिहासकारानें लिहिलें आहे. "तें तक्त ६ हात लांब व २ हात रुंद होतें. त्याची चौकट अबनसाच्या लांकडाची केलेली असून शुद्ध सोन्याच्या पत्र्यांनीं मढविलेली होती, व त्या पत्र्यांत फार मोलाचीं रत्नें अशा रीतीनें बसविलेलीं होतीं कीं, त्यांस सहज काढितां घालितां येत असे. बाहामिनी वंशांतील प्रत्येक शाहा यास कांहीं नवीं रत्नें लावीत असे. यामुळें महंमूदशाहाच्या कारकीर्दींत भांड्यावर बसविण्याकरितां त्यांतील कांहीं रत्नें काढिलीं. त्यावेळीं महंमूद शाहानें सर्व तक्ताची जवाहिऱ्याकडून किंमत करविली, ती १,००,००,००० होन किंवा ४,००,००,००० रुपये झाली होती." त्या तक्तावर अस्मानी रंगाचा मिना केला होता, म्हणून त्यास **फेरोज** हें नांव दिलें होतें. परंतु मौल्यवान् रत्नांच्या संख्येनें हा मिना अगदीं झांकून गेला होता.

वर सांगितलेला उत्साह ४० दिवस चालला होता. त्या काळांत दारू न पिण्याविषयीं मुसलमानी धर्मांत + जो निषेध आहे, त्याकडे बिलकुल कोणीं लक्ष दिलें नव्हतें. सरदार व साधारण लोक शाहाचा कित्ता घेऊन चैनींत अगदीं गुंग झाले होते. या प्रसंगीं **अमीर खुस्रू** आणि दिल्लीचा **ख्वाजा हुसेन** या प्रसिद्ध कवींचीं गीतें शिकलेले कित्येक ब-

+ मुसलमानी धर्मांत दारू पिण्याविषयीं जरी निषेध आहे, तरी हिंदुस्थानांतील मुसलमान राजे फार दारू पीत असत.

जवळ्ये आले होते, आणि ज्यांनीं त्या महावस्तादांचें गाणें बजावणें प्रत्यक्ष ऐकिलें होतें, असे ३०० गवई घेऊन दिल्लीहून ते कलबुर्ग्यास आले होते. अशा समयास त्यांचें येणें झालें, ही गोष्ट मोठी शुभदायक अशी समजून त्यांचा महंमदशाहानें फार सत्कार केला. आणि त्यांच्या गाण्याबजावण्यानें इतका खुष झाला कीं, एका प्रसंगीं **मलिक सैफ उद्दीन** आणि **सद्दर उल् शेरीफ** यांस दरबारांत तक्तापाशीं बसण्याची मोकळीक दिली. त्याच प्रमाणें हा मान **बहादूरखानास**ही देऊन त्यास **अमीर उल् उमराव** हा किताब दिला, आणि त्याच्या बेटीचें शाहाजादा **मुजाईतशाहा** याशीं लग्न केलें.

एके दिवशीं संध्याकाळीं गवयांनीं ज्यांत राजाच्या उत्साहाचें वर्णन आहे, अशा अमीरखुस्रूच्या दोन चिजा गाईल्या; तेव्हां शाहास इतका अतोनात आनंद झाला कीं, त्या लहरींत त्यानें **सैफ उद्दीन घोरीस** या ३०० गवयांस बिदागीकरितां विजयानगरच्या राजाच्या खजिन्यावर वरात देण्यास हुकूम दिला. या प्रमाणें शाहानें दारूच्या गुंगींत हा हुकूम दिला, असें जरी दिवाणास वाटलें, तरी त्यानें हुकुमाप्रमाणें वरात लिहिली; परंतु रवाना केली नाहीं. दिवाणाच्या वर्तनावरून दुसऱ्या दिवशीं महंमदशाहानें विजयानगरास वरात रवाना झाली कीं नाहीं, या विषयीं शोध केला, आणि वरात गेली नाहीं असें कळतांच तो म्हणाला:—या मुखांतून निरर्थक शब्द निघेल असें का तुम्हांला वाटतें, मी जो हुकूम दिला तो बेशुद्धपणानें दिला नसून समजून उमजून कांहीं उद्देशानें दिला आहे. त्या प्रमाणें मलिक सैफ उद्दिनानें वरातीवर शिक्का मोर्तब करून सांडणीस्वाराबरोबर विजयानगरच्या राजाकडे वरात रवाना केली. तो राजा स्वाभाविक आपल्या स्वातंत्र्याविषयीं अभिमानी होता. त्याच्या हातीं ही वरात पडतांच त्यास मोठा संताप आला, आणि वरात आणणाऱ्या जासुदास गाढवावर बसवून साऱ्या शहरांत रस्तोरस्तीं त्याची धिंड काढिली, व त्यास छीः थुः करून व हरएक गोष्टींनीं त्याचा अपमान करून त्यास परत पाठविलें. त्या वेळीं जरी पर्जन्यकाळ होता, तरी फौज जमा करण्यास हुकूम देऊन बाहामिनी शाहाच्या मुलखावर स्वारी करण्याची राजानें तयारी केली आ-

शाहा विजयानगरच्या खजिन्यावर वरात देतो, व त्यामुळें लढाई होते.

णि ३०,००० स्वार, ३,००० हत्ती आणि १,००,००० पायदळ इतकी फौज घेऊन अडोनी किल्याच्या समीप गेला. आणि तेथून मुसलमानांचा मुलूख उद्ध्वस्त करण्याकरितां त्यानें टोळ्या रवाना केल्या.

बेदर आणि वऱ्हाड या प्रांतांतील फौजांस मागील दोन सालच्या स्वारींच्या श्रमामुळें अद्यापि विश्रांति मिळाली नव्हती, म्हणून शाहानें खान महंमद यास तूर्त दौलताबादची फौज पाठविण्यास लिहिलें. आणि त्याच वेळीं बेलंपट्टणाहून जी लूट आणिली होती, त्याचा पांचवा भाग देऊन शाहाजादा यास शेख महंमद शेखउद्दीन याजकडे पाठविलें. आणि असें सांगितलें कीं, ती ऐवज सय्यद+ आणि फकीर यांस वांटून त्यांजकडून हिंदुलोकांवर आपणास जय मिळावा, याजबद्दल निमाज पढवावा. कल्बुर्गा येथीलही सर्व फकीरांस घेऊन शुक्रवारीं जुम्मामशिदींत शाहा गेला आणि मुसलमानांच्या सैन्यास यश यावें हा अल्लाचा आशिर्वाद असावा, म्हणून मोठ्या भक्तिपुरःसर निमाज पढला. आणि कुच करण्यास सुमुहूर्त पाहून शहराबाहेर छावणी देण्यास त्यानें हुकूम दिला.

इकडे जरी पर्जन्य पडत होता, आणि कृष्णानदीस अपरंपार पूर आला होता, तरी विजयानगरचा राजा मुद्कलच्या किल्यापुढें येऊन थडकला आणि त्यानें त्यास वेढा दिला. त्या किल्यावर शौर्यविषयीं गाजलेले असे ६०० लोक होते, त्यांनीं किल्याचा बचाव करण्यास होती तितकी पराकाष्ठा केली. मल्लिक सैफ उद्दीन घोरी याचाच एक नातलग किल्यावर सुभेदार होता. त्यानें लोकांवर सक्ति करून त्यांस त्रास दिला होता. म्हणून त्यांमध्यें फुटाफूट होऊन लोक आपापलीं कामें आस्थेनें करीनातसे झाले. यामुळें शत्रूंच्या हातीं किल्ला गेला, आणि शत्रूंनीं पुरुष, बायका व मुलें या सर्वांस एकसहा कापून काढिलें. फक्त एक मनुष्य तेथून जिवंत सुटला व त्यानें शाहास जाऊन ही खबर दिली.

मुद्कलचा किल्ला विजयानगरचा राजा घेतो व तेथील सर्व सैन्याची कत्तल करितो.

---

+ महंमदपैगंबर याची कन्या फातिमा हिचे जे साक्षात् वंशज त्यांस सय्यद म्हणतात.

ही दुर्दशा झाल्याचें वर्तमान महंमदशाहास कळतांच त्यास अतिशय राग व संताप आला, आणि त्या दुर्दैवी जासुदास तत्काळ ठार मारण्यास हुकूम दिला. तो ह्मणाला आपल्या बरोबरच्या शेंकडों शूर शिपायांची कत्तल झालेली पाहून जो जिवंत राहिला, त्याचें मुखावलोकन नको. सर्व सैन्य जमण्याची वाट न पाहतां त्याच दिवशीं हिजरी सन ७६७ च्या जमादिलावल महिन्यांत (जानेवारी सन १३६८) तो कलबुर्ग्याहून निघाला. मुसलमानांची जी कत्तल झाली, तिचा सूड घेण्याकरितां एक लाख हिंदूंस ठार मारल्याशिवाय मी म्यानांत तरवार घालणार नाहीं, अशी त्यानें शपथ घेतली.

महंमदशाहा एक लाख हिंदूस ठार मारण्याची प्रतिज्ञा करितो. जानेवारी सन १३६८.

कृष्णेच्या कांठीं येऊन पोंचल्यावर ज्या अल्लानें आपणास जन्म दिला, व ज्यानें राज्यपदास चढविलें, त्याची त्यानें आणखी अशी शपथ घेतली कीं, शत्रूची फौज तोंडावर असतां नदी उतरून अल्लाच्या आशिर्वादानें त्यांच्या सैन्याची दाणादाण करून मुद्‌कलच्या किल्ल्यावर ज्यांनीं आपले जीव बळी दिले आहेत, त्यांच्या आत्म्यांस आनंद दिल्याशिवाय निद्रा किंवा अन्नसेवन करणार नाहीं. शाहाजादा मुजाहिदशाहा हा आपला वारस आहे, अशी द्वाही फिरवून फक्त २० हत्ती ठेवून बाकी सर्व हत्ती त्यास दिले. आणि उपदेश करून त्यास परत कलबुर्ग्यास पाठविलें. नंतर ९,००० स्वारांनिशी शाहा नदी उतरला.

विजयानगरच्या राजाजवळ ३०,००० स्वार व शिवाय पायदळ असें प्रचंड सैन्य होतें; तरी तो इतका भयाभीत झाला कीं, त्यानें आपला सर्व खजिना व हत्ती आपल्या राजधानीस रवाना केले. आणि लढाई देणें किंवा मागें हटणें यां पैकीं जें प्रसंगास उचित दिसेल, तसें करण्याच्या तयारीनें राहिला. त्या दिवशीं रात्रीं वादळ सुटलें व फार पर्जन्य पडत होता; यामुळें हत्ती व दुसरीं ओझ्याचीं जनावरें वरच्यावर चिखलांत रुतूं लागलीं; आणि रोज ४ मैलांपेक्षां जास्त लांब त्यांस जातां आलें नाहीं. हिंदु याप्रमाणें निघाल्याचें वर्तमान महंमदशाहास लागतांच आपले तंबू तसेच ठेवून तो त्यांजवर तसाच निघाला, आणि उजाडतांच राजाच्या छावणी समीप येऊन ठेपला. मुसलमानी फौज येऊन थडकल्याची गुणगुण हिंदूस लागतांच त्यांची अशी पांचावर धारण बसली व त्रेधा उडाली कीं, सा-

मान सुमान वगैरे सर्व मागें टाकून ते अडोनीस मोठ्या त्वरेनें पळत सुटले. महंमदशाहानें त्यांच्या बाजारबुणग्यांवर छापा घातला, आणि पुरुष, स्त्रिया व मुलें यांमध्यें भेद न करितां सुमारें ७०,००० लोकांस कापून काढिलें आणि सर्व चीज वस्त लुटली. २,००० हत्ती, ३०० तोफांच्या गाड्या, गनिम, ७०० आरबी घोडे, आणि रत्नजडित एक सिंहासन, इतके जिन्नस मात्र शाहानें आपणाकरितां ठेवून बाकीचे जिन्नस शिपाई व कामगार यांस वांटून दिले. हा जय पुढें होणाऱ्या दुसऱ्या जयाचा शुभसूचक आहे, असें समजून पर्जन्यकाळ घालविण्याकरितां त्यानें मुक्काम केला. इतक्यांत दौलताबादेहून खान महंमद फौजेसह येऊन मिळाल्यानंतर अडोनी येथें असलेल्या हिंदूंवर त्यांनीं हल्ला केला. विजयानगरच्या राजानें अडोनीच्या किल्ल्याचे आधिपत्य आपल्या बहिणीच्या मुलास देऊन, तुंगभद्रेच्या नजीक एका मैदानांत तो छावणी देऊन राहिला होता. तेथें त्यानें मोठें सैन्य गोळा करून पुष्कळ हत्ती व लढाईची सामग्री जमविली होती.

हिंदूंचा पराभव होऊन पहिल्याच लढाईत ७०,००० हिंदुलोकांस मुसलमान ठार मारितात.

अडोनीस वेढा देऊं नये, असा खान महंमदानें महंमदशाहास स-

---

+ तोहोफत-उस-सलातीन याचा कर्ता दाऊद बिदरी या ग्रंथकाराच्या लेखावर विश्वास ठेविला असतां हिंदूलोकांनीं या लढाईंत तोफांचा उपयोग केला असें दिसतें. आणि पुढील एका वाक्यांत असें आहे कीं, या नंतरच्या दुसऱ्याच स्वारींत मुसलमानांनीं प्रथमच तोफांचा उपयोग केला; परंतु या दोनही लेखांविषयीं फेरिस्ताचे भाषांतरकार ब्रीग्झ यांस शंका वाटते. दुसऱ्या वाक्यावरून असें संभवनीय दिसतें कीं, मुसलमानांनीं सन १३६८ साली पाश्चिमात्य लोकांकडून तोफा मिळविल्या असाव्या. कारण या पूर्वी १८ वर्षे सन १३५० साली इग्लंडचा तिसरा एडवर्ड राजा ह्यानें क्रेसीच्या लढाईत तोफांचा उपयोग केला होता; परंतु हीही गोष्ट फार अशक्य दिसते. मुसलमानांनीं प्रथमतःच तोफांचा उपयोग केला असें लिहितांना तोफा चालविण्यास तोफांमध्यें वाकबगार असे तुर्क व युरोपीयन होते, असें फेरिस्तानें लिहिलें आहे. सन १४९८ सालीं हिंदुस्थानांत पोर्तुगीज लोक येण्यापूर्वी इकडे तोफांचा उपयोग साधारणपणें करीत असत, असें सूचित दिसतें. तथापि मुसलमानांनीं हिंदुस्थानांत युरोपांतून तोफा आणण्यापूर्वी (पुढें चालू.)

ला दिला; परंतु दक्षणेंत मुसलमानांनीं अद्याप तोफांचा उपयोग लढाईंत केला नव्हता, त्या तोफा आपणास आयत्याच मिळाल्या आहेत. त्या एकत्रजमवून **सबदरखान शिस्तानीचा** मुलगा **मुकरिपखान** यास त्यांवर मुख्य नेमिलें. आणि त्याच्या हाताखालीं तोफांच्या कामांत वाकबगार असे तुर्क व युरोपियन दिले. रात्रीं चोर छावणींत शिरून लोकांस आणि घोड्यांस मारीत किंवा थोटे पांगळे करीत. या भीतीस्तव विजयानगरच्या राजाचे जे हत्ती हातीं लागले होते, त्यांस परत पाठविण्यास हुकूम दिला. त्याचप्रमाणें कामगारांसही आपणास अवश्य तितकें सामान ठेवून बाकी सर्व सामान परत पाठविण्यास सांगितलें. छावणी सभोंवती तोफा ठेवून त्यांस भक्कम वाल्यांनीं आणि सांखळ्यांनीं परस्परांस जोडिलें. आणि रात्रीस सभोंवार घस्त नियमानें फिरविण्याची शिस्त ठेविली.

थोड्याच काळांत शाहा तुंगभद्रा नदी उतरून विजयानगरच्या मुलखांत शिरला. मुसलमान बादशाहानें या मुलखावर स्वारी केल्याचा हा पहिलाच प्रसंग होता. विजयानगरचा राजा **कृष्णाराय** यास ही बातमी लागतांच आपल्या सर्व सरदारांस दरबारीं बोलाविलें, आणि मुसलमानांबरोबर कोणत्या रीतीनें लढावें; याविषयीं मसलत विचारिली. तेव्हां विचारा अंतीं विजयानगरच्या फौजेवरचा सेनाधिपति **भोजमल्ल** यानें ही लढाई चालवावी, असें सर्वानुमतें ठरलें. भोजमल्ल स्वाभाविकच फार बढाईखोर असे, आणि हें एवढें मोठें जाखमेचें काम त्यावर सोंपवितांच तो फार चढला. त्यानें राजास विचारिलें कीं, मुसलमान सुलतानास जिवंत धरून आणूं किंवा भाल्याच्या टोंकावर त्याचें डोकें मात्र आणूं? कृष्णारायानें उत्तर दिलें कीं, शत्रूस जिवंत धरून आणणें हे इष्ट नाहीं. यास्तव शाहास धरतांच ठार मारावें असें सांगितलें. भोजमल्लानें राजाचा निरोप घेऊन ४०,००० स्वार आणि ५,००,००० पायदळ अशी फौज घेऊन महंमदशाहाबरोबर लढण्यास कूच केलें. आपल्या लोकांस आवेश आणण्याकरितां म्लेंछांस मारण्यानें किती पुण्य लागतें, या विषयीं आपल्या फौजेंतील लोकांस धर्मोपदेश करण्याकरितां त्यानें ब्राम्हणांस आज्ञा केली. मुसलमान लोक आपल्या देवळांचा नाश करितात, देवांच्या मूर्ति फोडितात, आणि गाईचा वध करि-

हिंदुलोक तोफांचा उपयोग करीत होते असें निश्चयात्मक ठरवितां येत नाहीं.

तान, इत्यादि गोष्टी सांगून हिंदूंस चेतवावें आणि त्यांच्या मनांत मुसलमानां विषयीं द्वेष पूर्ण उत्पन्न करावा, असेंही त्यानें ब्राह्मणांस सांगितलें.

हिंदूलोकांच्या छावणीपासून १५ कोसांवर येऊन महंमदशाहा पोहोंचला, तेव्हां **खानमहंमद** सेनापति यास फौजेची गणती करण्यास सांगितलें. तेव्हां १५,००० स्वार आणि ५०,००० पायदळ इतकी फौज आहे असें आढळलें. त्यांपैकीं १०,००० स्वार आणि ३०,००० पायदळ आणि तोफखाना देऊन खानमहंमदास आघाडीस शाहानें रवाना केलें. जिल्कादमहिन्याच्या १४ व्या तारखेस दोहों सैन्यांची गांठ पडून लढाई झाली; ती सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत चालून दोहोंकडील पुष्कळ लोक पडले. महंमदखानाच्या फौजेंतील उजवी व डावी या दोहों बाजूंकडील सैन्यावरचे मुख्य **मुसाखान** व **इसीखान** लढाईंत पडले, व त्यांच्या फौजेंत अव्यवस्था झाली. यामुळें मुसलमानी फौजेचा पराभव होतो असें दिसलें. याचक्षणीं महंमदशाहा ३,००० ताज्या स्वारांसह येऊन थडकला, आणि तेणेंकरून महंमदखानास उमेद आली. आणि जे शिपाई इकडे तिकडे फुटले होते, त्यांसही नवी हुरूप येऊन तेही त्यास येऊन मिळाले.

लढाई झाली. हिजरी सन ७६७ ता १४ जिल्काद. आगस्ट तारीख २२ सन १३६६

तोफखान्यावरील **मुखरीपरखान** यानें तोफांच्या भडिमारानें शत्रूंची फळी फोडून त्यांची थोडी वाताहात केली. तेव्हां स्वारांसह हल्ला करून शत्रूंची पुरी शिकस्त करण्यास परवानगी मागितली. तेव्हां खानमहंमदानें कित्येक सरदारांस मदतीस पाठविलें, आणि सर्व जलदीनें हुल्लड करून शत्रूच्या तोंडावर गेले. तेव्हां हिंदूंची अशी त्रेधा उडाली कीं, तरवारी आणि कठारी या छोट्या हत्यारांचा मात्र त्यांना उपयोग करितां येऊं लागला. याच समयास खानमहंमदाचा **शीरशिकार**+ या नांवाचा हत्ती मस्त होऊन शत्रूच्या फळीच्या मध्यभागीं घुसला. त्या ठिकाणीं भोजमल्लाच्या हत्तीनें त्यास थांबविलें; परंतु त्या झटपटींत भोजमल्लाचा महात ठार झाला. त्याच्या मागोमाग खानमहंमद ५०० स्वार घेऊन निघाला. आणि शत्रूचे हत्ती मागें वळून त्यांनीं आपल्या लोकांत दाणादाण उडविली. भोजमल्लास माणघात-

---

+ वाघाची शिकार करणारा. या शिकारींत धैर्य व बळ दाखविण्याविषयीं हा हत्ती फार प्रसिद्ध होता.

क अशी जखम लागली. तेव्हां त्यास रणांतून उचलून नेलें,व त्याबरोबर त्याच्या लोकांनीं लढाई थांबविली. हिंदु लोक आपल्या सैन्याची मधली फळी फुटलेली पाहून जिकडे तिकडे पळाले, आणि मुसलमानांनीं कत्तल उडविण्याचा तडाका चालविला. इतक्यांत शाहा तेथें येऊन पोंहोंचला. तेणेंकरून मुसलमानांस अधिकच चेव येऊन हिंदुलोकांची अशा निर्दयपणानें कत्तल सुरू झाली कीं; गरोदरबायका व आंगावरचीं मुलें यांससुद्धां कोणी वगळिलें नाहीं. महंमदशाहानें रणांगणामध्येंच एक आठवडा मुक्काम करून आपल्यास जय मिळाल्याची वार्ता आपल्या मुलखांत सर्वत्र कळविली. नंतर आपली प्रतिज्ञा पुरी करण्याकरितां शाहानें **कृष्णरायाच्या** छावणीवर हल्ला केला. यांच्याशीं झटपट करण्यास आपण असमर्थ आहों, असें समजून कृष्णरायानें मागें हटून पहाडांत व जंगलांत जाऊन आश्रय घेतला. शाहा सतत तीन महिने त्याचा पाठलाग करीत होता. आणि जे हिंदु हातीं लागतील त्यांस कांहीं भेद न करितां ठार मारीत होता. शेवटीं कृष्णराय आपली राजधानी विजयानगर येथें मागें हटत चालला. शाहाही आपल्या फौजेसह लौकरच त्या शहरानजीक येऊन पोंहोंचला. त्याच्या छावणीवर हल्ला करण्यास दिवसा हिंदू लोकांस छाती होत नसे. परंतु रात्रौ टोळांप्रमाणें त्यांच्या छावणी सभोंवती जमून हिंदु लोक त्यांस फार उपद्रव देत. याप्रमाणें एक महिना लोटल्यावर शाहास असें वाटलें कीं, विजयानगर शहर घेणें, किंवा शत्रूस शहरांतून बाहेर आणणें या दोन्ही गोष्टी मुष्किलीच्या आहेत. तेव्हां आपणास भयंकर रोग झाला आहे, असा बहाणा करून त्यानें मागें हटण्यास हुकूम दिला. मुसलमान छावणी सोडून निघतांच कृष्णरायानें आपल्या सैन्यासह त्यांवर हल्ला केला आणि असा पुकारा केला कीं, "तुमचा शाहा मेला. ब्राम्हणांच्या प्रार्थना देवानें ऐकिल्या, आणि आतां तुम्हांपैकीं एकासही आम्हीं जिवंत जाऊं देणार नाहीं." या रीतीनें मुसलमानी फौज हिंदूफोज पाठलाग करीत असतां तुंगभद्रा नदी उतरून अलीकडे आली. आणि शेवटीं एका विस्तीर्ण मैदानांत छावणी देऊन मुक्काम करण्याचा शाहानें हुकूम केला. कृष्णरायही जवळच एका ठिकाणीं उतरला. आपला अंतर्गत बेत सांगण्यास ही संधि बरी आहे, असें मनांत आणून शाहानें दरबार भर-

कृष्णरायास त्याच्या राजधानींत मुसलमान कोंडितात.

वून आपली तब्बेत चांगली आहे, असें सर्वांस कळविलें. आणि शाहानेंजी कुप्ति केली होती, ती माहीत नसल्यामुळें जे सरदार कांहींसे नाउमेद झाले होते, त्यांस उमेद आणिली. यानंतर अशक्तपणामुळें लौकरच निजण्याची तयारी करून आपल्या महालांत मुख्य सरदारांस बोलावून सैन्याची तयारी करून विवक्षित ठिकाणीं जाऊन हुकुमाची वाट पहात रहावें, असा हुकूम दिला. शाहा मध्यरात्रीं त्या ठिकाणीं गेला. आपल्या सैन्याच्या अनेक टोळ्या करून शत्रूच्या छावणीवर एकाएकीं छापा घालण्यास निघाला.

कृष्णराय आणि त्याचे कामगार मध्यरात्रीपर्यंत नाच तमाशे वगैरे चैनींत गर्क झाल्यामुळें त्यांस थकवा येऊन गाढ झोंप लागली होती. मरणोन्मुख लोकांचें कुंथणें व मुसलमानांच्या आरोळ्या, यांनीं सर्व आकाश दणाणून सोडिलें होतें, त्या आरोळ्या ऐकून उजाडल्यावर ते एकाएकीं जागे झाले. घाबरून गेलेल्या शिपायांस धीर देऊन कांहीं उपयोग होणार नाहीं, असें पाहून कृष्णराय घोड्यावर स्वार झाला, आणि जो त्यानें घोडा सोडिला, तो थेट आपल्या राजधानीस पोंचेपर्यंत आवरिला नाहीं. राजा गेल्यावर महंमदशाहानें त्याची छावणी खुशालपणें लुटली, आणि त्यांत त्यास खूब लूट मिळाली.

मुसलमानांनीं राजाच्या फौजेचा पाठलाग केला; तेव्हां त्यांनीं आणखी शत्रूच्या १०,००० लोकांस ठार मारिलें. तथापि अद्याप शाहाची सूड घेण्याची इच्छा तृप्त झाली नाहीं, आणि त्यानें विजयानगरच्या आसपासच्या प्रत्येक खेड्यांतील लोकांची कत्तल करण्याविषयीं हुकूम दिला. विजयानगरचे ब्राम्हण व दुसरे हिंदु कामगार कृष्णरायाशीं बिथरले, आणि म्हणू लागले कीं, याचें राज्य अनर्थकारक झालें, आमची अब्रू गेली. १०,००० ब्राम्हणांचा वध झाला, आणि पुढें कोठें एकही मनुष्य जिवंत रहात नाहीं अशी अवस्था आली आहे. तेव्हां कृष्णरायानें त्यांस उत्तर दिलें कीं, तुमच्या सल्याशिवाय मी कांहीं केलें नाहीं. परंतु जें झालें तें फिरविण्याची शक्ति माझ्या आंगीं नाहीं. तुम्हीं जें म्हणाल तें करण्यास मी तयार आहें. तेव्हां त्यांनीं राजास सुचविलें कीं, वडिलांप्रमाणें तह करून शत्रूंस शांत करावें. त्याप्रमाणें कृष्णरायानें शाहाकडे वकील पाठवून आपली चुकी कबूल केली, व क्षमा मागितली. परंतु महंमदशाहा तें कांहीं ऐकेना.

याच वेळीं खुषमस्कऱ्यांपैकीं एक जण शाहास म्हणाला कीं, शाहानें फ-

क्त एक लाख हिंदूंची कत्तल करावी, अशी शपथ घेतली होती. परंतु साऱ्या हिंदु जातीचा नाश करण्याचा विडा उचलला नव्हता. तेव्हां शाहा त्यास म्हणाला, प्रतिज्ञा केल्याच्या जरी दुप्पट संख्या मारिली गेली असली, तरी गवयांस दिलेल्या वरातीप्रमाणें राजानें उलगडा केल्याशिवाय मी तह करणार नाहीं, व त्याच्या प्रजेस जिवंत ठेवणार नाहीं. रायानें जे वकील पाठविले होते, त्यांस हवीं तीं कलमें कबूल करण्यास अखत्यार दिलेला होता. त्यांनीं ही गोष्ट लागलीच कबूल करून त्या क्षणीं वरातीप्रमाणें पैसा दिला. तेव्हां महंमदशाहा म्हणाला, मी जो हुकूम दिला होता तो अमलांत आला, याबद्दल परमेश्वराचे आभार मानितों. इतिहासांत मला कोणी दोष देऊंनये, अशी माझी इच्छा होती.

गवयांस राजा वरातीप्रमाणें बिदागी देतो, आणि तह होतो.

शाहा फार खुष झाला आहे, असें पाहून वकिलांनीं नमून सलाम केला, आणि चार शब्द ऐकण्याविषयीं विनंति केली. बोलण्यास परवानगी मिळाल्यावर ते म्हणाले, एकानें गुन्हा केला असला तर त्याच्या अपराधाबद्दल निरपराधी गरीब लोकांस शिक्षा करावी असें कोणत्याही धर्मीत सांगितलें नाहीं. आणि मुख्यत्वें गरीब दुबळ्यांच्या स्त्रिया व मुलें यांस शिक्षा करावी असें कोठेंच आढळणार नाहीं. जर कृष्णरायानें चुकी केली असली, तर गरीब दुबळे लोक यांनीं त्या चुका करण्यास त्यास सल्ला दिली नव्हती. तेव्हां शाहानें त्यांस उत्तर दिलें, जें झालें तें ईश्वरीइच्छेप्रमाणें घडून आलें. तें फिरविण्याचें माझे आंगीं सामर्थ्य नाहीं. तेव्हां वकिलांनीं अर्ज केला कीं, ज्यापेक्षां अल्लानें आपणास दक्षणेचें राज्य दिलें आहे, त्यापेक्षां आपल्यामागून जे तक्तावर बसतील ते आणि कर्नाटकचे राजे फार दिवस शिवशेजारी असण्याचा संभव आहे. यास्तव लढाईंत क्रूरपणा होऊंनये, ही गोष्ट फार इष्ट आहे. म्हणून पुढें होणाऱ्या लढायांत गरीब दुबळ्या व निःशस्त्र अशा लोकांचा वध करूनये, अशाबद्दल तह झाला पाहिजे. हें म्हणणें महंमदशाहास सयुक्तिक दिसलें, आणि त्यानें अशी शपथ घेतली कीं, याउपर जय मिळाल्यावर शत्रूंकडील एकही इसमास ठार मारणार नाहीं; आणि माझ्या मागून जे तक्तावर बसतील, त्यांनींही याचप्रमाणें वर्तन ठेवावें. तेव्हांपासून हा वेळपर्यंत (फेरिस्ताच्या मरणापर्यंत)

लढाईंत जे कैद होतील, त्यांचा जीव घ्यावयाचा नाहीं; आणि शत्रूंकडील निःशस्त्र अशा लोकांचे प्राण घ्यावयाचे नाहींत, अशी चाल चालली आहे. या प्रमाणें सर्व गोष्टींचा उलगडा केल्यावर महंमद शाहा कलबुर्ग्यास परत गेला. मार्गांत **शेख शिराज उद्दीन** या फकीराची गांठ घेतली, आणि त्यास म्हणाला, हिंदूवर आपणास जें यश आलें, तें केवळ आपला आशिर्वाद आणि मातोश्रीबरोबर द्रव्य पाठवून मक्केस जो दानधर्म केला, त्याचें फळ आहे.

बहिरामखान दौलताबादेस बंड करितो.

महंमदशाहास राजधानीस येऊन पांच दिवस झाले नाहींत तोंच दौलताबादेस जें एक बंड झालें, तें मोडण्याकरितां तिकडे जावें लागलें. शत्रूंनीं विजयानगरासमीप जेव्हां शाहास कोंडिलें होतें, त्यावेळीं मागें हटण्याकरितां जें त्यानें दुखणेकऱ्याचें सोंग घेतलें होतें, त्यावरून शाहा मेला, अशी कंडी सर्व राज्यांत उठली. आणि तेणेंकरून कित्येक साहसी लोकांस बखेडे करण्यास संधि मिळाली. **बहिरामखान मझिंदरानीं** हा एक त्यांपैकीं होता. यास माजी शाहानें शाहाजादा असें नांव देऊन त्याचा मोठा सन्मान केला होता. दौलताबाद परगण्यांत सैन्य नाहीं, असें पाहून नाईक लोकांचा मुख्य **गोविंददेव*** या नांवाचा एक मराठा होता, त्यास मिळून दोघांनीं बंड केलें. वऱ्हाडच्या कित्येक सरदारांनीं यांस गुप्तपणें कुमक पाठविली. त्याचप्रमाणें बागलाणच्या राजानेंही कुमक दिली. याप्रमाणें आपलें पारडें बरेंच वर आलेंसें पाहून बहिरामखान फुगला आणि महंमदशाहानें दौलताबादच्या किल्यांत **महाराष्ट्र*** आणि **वऱ्हाड** या प्रांताचा कांहीं वर्षांचा वसूल जो ठेविला होता, तो बळकावून नवे लोक ठेवण्यांत खर्च केला. महाराष्ट्रांतील बहुतेक शहरें व परगणे त्याच्या हस्तगत झाले, ते त्यानें आपल्या अनुयायांस लावून देऊन अल्प काळांतच त्यानें १०,००० स्वार आ-

* देव हा प्रत्यय राजास लावितात. उदाहरणार्थ देवगडच्या राजास रामदेव, त्याच्या कुळास शंकरदेव, तेलंगणच्या राजास विनायकदेव असें म्हटलें आहे. राजमहेंद्रीचे राजे व पूर्वकिनाऱ्यावरील दुसरे कित्येक राजे आपल्यास हल्लीं देव हें उपपद लावितात.

* महाराष्ट्रास फेरिस्ता मेह्रमी आन्हट असें म्हणतो.

णि पायदळ अशी फौज जमविली.

महंमदशाहानें बहिरामखानास लिहिलें कीं, मी मेलों अशी खोटी बातमी ऐकून आणि दुष्टलोकांनीं ज्या भुलथापी दिल्या, त्यांस भुलून हें तूं बंड केलें आहेस; याकरितां जर शरण येऊन पूर्वींप्रमाणें ताबेदारीनें वागशील, तर तुला व तुझ्या साथीदारांस क्षमा केली जाईल.

हें पत्र सय्यद **जलालउद्दीन** आणि **शाहामलिक** या दोन दरबारच्या कामगारांबरोबर पाठविलें आणि चार गोष्टी सांगून त्यास शरण येण्याविषयीं त्याचें मन वळवावें, असें त्यांस सांगितलें होतें. हें शाहाचें पत्र पोंहोंचतांच बहिरामखानानें गोविंददेवास घेऊन विचार केला. तेव्हां गोविंददेव म्हणाला, महंमदशाहा स्वतः मोठा मग्रूर व अधिकारलोभी आहे. असा आज्ञा भंग करून त्यास एकवार चिडविल्यावर तो दया करील असा भरंवसा मानणें हें कधीं शहाणपणाचें होणार नाहीं. दौलताबादेसारखा किल्ला आपल्या ताब्यांत आहे, आणि बागलाणचा राजा आणि वऱ्हाडचे सरदार आपणास सामील आहेत. म्हणून आतां मागेंपुढें पाहिलें असतां वेडेपणा होईल. यास्तव आपले हेतु सिद्धीस नेण्याकरितां हरप्रयत्न करावे आणि स्वतंत्र व्हावें; यांत अधिक शहाणपण आहे. गोविंददेवाच्या या गुळचट बाता ऐकून बहिरामखानानें शाहाच्या सूचनेकडे लक्ष दिलें नाहीं. आणि लढाईकरितां अधिक नेटानें तयारी चालविली. सय्यद जलालउद्दीन आणि शाहामलिक हे परत कलबुर्ग्यास शाहाकडे आले आणि आपण ज्या कामाकरितां गेलों, तें काम फत्ते झालें नाहीं; हा वृत्तांत त्यांनीं शाहास कळविला.

या आग्रही वर्तनाचा महंमदशाहास फार राग आला, आणि **मसनद अल्ली** आणि **खानमहंमद** यांस बहुतेक सैन्य देऊन उत्तरेकडे पाठविलें, आणि मागून स्वतः लौकरच त्यांस जाऊन मिळण्याचा शाहानें बेत केला. इकडे बहिरामखान यानें गोविंददेव आणि वऱ्हाड व बागलाण या प्रांतांतील पुष्कळ सरदार यांसहवर्तमान पैठणास कूच केलें, व तेथें उदार वचनें देऊन बुभुक्षित अशा ६,००० लोकांची टोळी जमविली. मसनदअल्ली हा मोठा अनुभवीक व पोक्त सरदार होता. त्याच्याशीं घाईनें सामना करण्यांत हित होणार नाहीं, असाविचार करून त्यानें **शेवगांवास** छावणी दिली. येथून शत्रूच्या

छावणीवर अवचित छापा घालण्यास खानानें यत्न केला; परंतु शाहाकडील फौज कडृया तयारीनें व सावधगिरीनें आहे, असें पाहून आपला हेतु अमलांत न आणितां तो मागें हटला. हें पाहतांच मसनदअलीनें त्यावर हल्ला करण्याचा निश्चय केला, आणि सरहद्दीवरील पहाडांत महंमदशाहा शिकारीस गेला होता, तेथें त्यास हा बेत कळविला. शाहास हें पत्र पोंहोंचतांच बरोबर असलेल्या ३,००० लोकांसह शाहानें पुढें जाण्याची तयारी केली. मसनदअलीकडून जे खलिते आले होते, त्यांवरून बंडवाल्यांची फौज भारी आहे, असें समजलें होतें. याकरितां शाहाच्या जिवास कदाचित अपाय होईल, या भीतीनें शाहाच्या वजिरांनीं त्यास असें सांगितलें कीं, येथून सावकाश कूच करीत जावें, यांतच शहाणपण आहे. येणेंकरून बाकीचें सैन्य येऊन आपणास मिळण्यास अवधि सांपडेल, आणि मग नेटानें हल्ला करितां येईल. तेव्हां शाहा म्हणाला, जरी तुमचें म्हणणें कांहींसें यथान्याय आहे, तरी मी निश्चय करून चुकलों आहें आणि तो आतां फिरवीत नाहीं. कारण ज्या प्रमाणें फक्त १,००० स्वारांनिशीं तेलंगण प्रांताच्या अगदीं मध्यभागीं जाऊन शत्रूस शासन केलें, आणि ज्या प्रमाणें फक्त १००० लोक घेऊनच विजयानगरच्या प्रचंड सैन्यास पांहाडांत व जंगलांत हांकून देऊन विजयी होत्साता परत आलों, त्याप्रमाणें थोड्याशा बंडवाल्यांशीं टक्कर मारण्यास हे ३,००० लोक बस्स होतील असें वाटतें. याप्रमाणें निश्चय करून तो आपल्या शुबदीज या आवडत्या घोड्यावर स्वार झाला, आणि अशा त्वरेनें तेथून निघाला कीं, मसनदअलीनें बंडवाल्यांशीं लढाई सुरू केली त्याचक्षणीं तो पेठणास पोंहोंचला. शाहा आल्याचें वर्तमान जिकडे तिकडे लौकरच समजलें. बागलाणच्या राजानें त्वासरशी घोड्यास टांच मारिली, आणि आपल्या सर्व लोकांसहवर्तमान तो पळून गेला. आपला दोस्त याप्रमाणें फितूर झालेला पाहून बहिरामखान आणि गोविंददेव हे घाबरून गेले, आणि शाहाच्या फौजेवर एकही बाण न सोडतां दौलताबादच्या किल्यांत आश्रय घेण्याकरितां तेथून पळाले. शाहाचें विजयी सैन्य शत्रूची छावणी लुटीत असतां सुमारें ७०० लोक व हत्ती घेऊन शाहा त्या ठिकाणीं आला, आणि त्या दिवशीं तेथेंच छावणी दि-

ली; आणि आपल्या विजयी सरदारांची वाहवा करून त्यांस किताब दिले. आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं अशा त्वरेनें तेथून निघाला कीं, संध्याकाळच्या आंत दौलताबाद किल्यापर्यंत जाऊन पोंहोंचला. आणि किल्यास वेढा देण्याच्या सर्व तजविजी केल्या.

बहिरामखान आणि गोविंददेव यांस आपण स्वतंत्र होऊं, अशी जी घमेंडी होती, ती जाऊन आतां पुढें काय करावें हें त्यांस सुचेना. रात्रींतें किल्यांतून **शेख ऐन उद्दीन** याच्या घरीं गेले, आणि त्याची सल्ला विचारिली. शेख यानें उत्तर दिलें कीं; किल्यांत कोंडून घेणें हें कांहीं शहाणपणाचें कृत्य होणार नाहीं. याकरितां जोंपर्यंत येथून पळून जाण्याचें सामर्थ्य आहे तोंपर्यंत आपल्या मुलांबायकांस घेऊन गुजराथेंत पळून जावें हें चांगलें, असें मला वाटतें. मग त्याचे परिणाम काय होतील ते होवोत. ही मसलत त्यांस पसंत पडून त्यांनीं कुटुंबांतील माणसांस निरोप पाठवून, शेख याचे घरीं विलंब न करितां येण्यास सांगितलें. त्यांच्या बायकांस पूर्वींच याविषयीं कांहीं गुणगुण कळली होती, म्हणून त्या घोडे व सामुग्री घेऊन आल्या. नंतर शेख यानें बहिरामखान व गोविंददेव यांच्या डोक्यावर हात फिरवून आणि देवाच्या आशिर्वादें करून तुम्ही सुखरूप पोंचाल, असें म्हणून त्यानें त्यांस निघण्यास सांगितलें, आणि त्या प्रमाणें त्यांनीं गुजराथची वाट धरिली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं महंमदशाहास ते पळाल्याचें वर्तमान कळलें. तेव्हां ४०० स्वार घेऊन तो त्यांच्या मागें लागला. परंतु त्यांस गांठतां न आल्यामुळें तो दौलताबादेस फार रागावून परत आला, आणि **शेख ऐन उद्दीनावर** त्यानें आपला राग काढिला. पूर्वीं एकदां पुढील गोष्टीकरितां त्याचा त्यास फार राग आला होता. महंमदशाहा तक्तावर बसला तेव्हां राज्यांतील सर्व शेख, सय्यद व फकीर यांनीं आपलें सार्वभौमत्व कबूल करून प्रजाधर्म स्वीकारावा, असा शाहानें फर्मान काढिला होता. त्यावेळीं एकटा हा शेख शिवाय करून बाकी सर्वांनीं ती गोष्ट मान्य केली होती, आणि ही गोष्ट मान्य न करण्यास यानें अशी सबब लाविली होती कीं, शाहा दारू पितो, आणि कुराणांत निषिद्ध अशा गोष्टींपैकीं अनन्वित अशीं कर्मे करितो. या प्रसंगीं शाहानें या शेखास बोलावणें पाठविलें, आणि त्यास सांगितलें कीं, प्रजाधर्मास सोडून वागणार ना-

हीं, अशी तूं शपथ तरी घे, किंवा इमान सोडणार नाहीं, अशाबद्दल हस्तलिखित जातमुचलका दे. तेव्हां त्या निरोपास कांहीं उत्तर न देतां शाहाच्या जासुदास त्यानें पुढील गोष्ट सांगितली; आणि ती जशीच्या तशीच शाहापुढें जाऊन सांगावी, असें जासुदास फर्माविलें. "कोणे एके समयीं एक मोठा मुल्ला, एक सय्यद, आणि एक छिनाल बायको अशा तिघांस कांहीं काफर लोकांनीं कैद केलें, आणि त्यांस असें सांगितलें कीं, जर तुम्हीं आमच्या मूर्ति पुजाल, तर आम्हीं तुम्हांस सोडून देऊं, आणि तसें न कराल तर तत्काळ ठार मारूं. प्रसंग पडेल त्याप्रमाणें वर्तन करावें या तत्वास अनुसरून मुल्लानें मूर्ति पूजनाच्या संस्कार करण्याचें कबूल केलें, आणि मुल्लासारख्याचा खासा कित्ता घेणें बरोबर आहे, असें समजून सय्यदानेंही त्याच प्रमाणें केलें. तथापि छिनालबायकोनें असें उत्तर दिलें कीं, मी तर यावज्जन्म पाप करीत आहें आणि त्या नवीन पापा करितां मला परमेश्वर दया करील अशी आशा करण्यास मी सय्यद किंवा मुल्ला नाहीं. म्हणून मी तुमचें म्हणणें कबूल करीत नाहीं. असें सांगून तिनें आपला प्राण घेऊं दिला." ही गोष्ट सांगून शेख म्हणाला, माझी स्थिति तिच्यासारखी आहे. मी शाहाच्या कोपास पात्र आहें, व तो जें शासन करील, तें सोसण्यास मी तयार आहें. परंतु मी शाहाच्या मुलाखतीस येणार नाहीं, व त्याचें सार्वभौमत्वही कबूल करणार नाहीं. ही गोष्ट ऐकून महंमदशाहास अधिकच संताप आला, आणि त्यानें त्या शेखास शहर सोडण्यास हुकूम केला. त्याप्रमाणें शेखानें शहर सोडून **बुराणउद्दीन** याच्या दरग्यांत गेला, आणि कबरीवर बसून मोठ्यानें ओरडला कीं "येथून मला हांकून लावण्याची कोणाची छाती होते तें पाहूं." हा त्याचा दृढ निश्चय पाहून शाहानें त्याची वाहवा केली, व त्यास आपल्या कृतीचा पश्चात्ताप झाला. नंतर शाहानें **सुदरऊस शेरीफ** याबरोबर पुढील कविताबद्ध निरोप त्याजकडे पाठविला "मी तुम्हांस शरण आलों आहें, त्या प्रमाणें तुम्हीं मला शरण यावें." त्यास शेख यानें असें उत्तर दिलें कीं, जर महंमदशाहा गाझी आपल्या बापाप्रमाणें दुराचरणास व अधर्माचरणास उत्तेजन

+ लढाईत मोठें शौर्य दाखवून परधर्मी लोकांस जो स्वहस्तानें ठार ( पुढें चालू.)

न देतां व लोकांदेखत दारू न पितां आणि जे लोक हे गुन्हे करितील त्यांस काजी लोकांकडून शिक्षा देववून कुराणांतील नियम पाळण्यास किंवा कुराणाप्रमाणें चालण्यास लोकांस भाग पाडील, तर त्यासारखा आपणास कोणीही प्रिय होणार नाहीं." आणखीं त्यानें पुढील मतलबाची कविताही स्वतः लिहून शाहाकडे पाठविली. " माझें जीवमान आहे तोंपर्यंत सद्धर्माचरण सोडणार नाहीं; राजनिष्ठा व राजभक्ति यां शिवाय दुसरे विचार माझे मनांत नाहींत. ज्यांनीं माझें नुकसान केलें आहे, किंवा मजवर जुलूम केला आहे, त्यांजवरसुद्धां माझ्या हातून होईल तर मी उपकार करीन."

शेख यानें **गाझी** हा जो किताब दिला, त्यामुळें महंमदशाहा इतका खुष झाला कीं, त्यानें तो किताब आपल्या नांवास जोडण्याविषयीं आज्ञा केली.

महंमदशाहाच्या मुलकी कारभाराचें वर्णन.

महाराष्ट्र देशावर **खान महंमद** यास सुभेदार नेमून शाहा कलबुर्ग्यास परत आला. तेथें गेल्यावर राज्यांतील सर्व दारूच्या भट्ट्या फोडून टाकण्याविषयीं त्यानें हुकूम दिला, आणि सद्धर्माचरणाचा सर्वत्र प्रसार करण्याकडे तो मनःपूर्वक झटूं लागला. फार प्राचीनकाळापासून कारवानांस लुटणारे जे दक्षणेंतील लुटारू पेंढारी यांचा अगदीं बींमोड करण्याचा त्यानें निश्चय केला. याकरितां प्रांताच्या सर्व सुभेदारांस त्यानें असा हुकूम पाठविला कीं, देशांत जे चोर व दरवडेखोर असतील, त्यांस भेदाभेद न करितां ठार मारावें, आणि त्यांचीं डोकीं दहशत बसण्याकरितां राजधानीस पाठवावीं; यारीतीनें सर्व मुलखांत त्यांचा बींमोड करण्यास होईल तितका यत्न करावा. याचा परिणाम असा झाला कीं, सहा सात महिन्यांतच शाहाच्या राज्यांत या दुष्ट लोकांचा मागमूस राहिला नाहीं. निरनिराळ्या प्रांतांतून जवळ जवळ ८,००० डोकीं कलबुर्ग्यास आलीं, आणि वेशीपुढें त्यांचा ढीग करून ठेविला.

शेख **ऐनउद्दीन** याच्या उपदेशाप्रमाणें वर्तन करून, पुढें मरणकालपर्यंत त्या सर्वमान्य पंडिताशीं यानें सलुख्याचा पत्रव्यवहार ठेविला,

मारील व मुसलमानीधर्माची प्रवृत्ति करील, त्यास हा किताब लावीत.

व त्यास पूर्वीपेक्षां जास्त मान देऊं लागला. शेखही शाहास वारंवार उपदेश करी, व ते उपदेश तो भीडभाड न धरितां खऱ्या भावानें करण्यास मागें पुढें पाहात नसे.

विजयानगर आणि तेलंगण येथील राजे आणि दक्षणेंतील सर्व जमेदार, पूर्णपणें यास शरण येऊन वेळच्या वेळीं खंडणी पाठवूं लागले. तेणेंकरून राज्यांत दंगेधोपे व लढाया बंद झाल्या. आणखीं प्रांत जिंकण्याचा विचार टाकून आपल्या प्रजेचें सुख वाढविण्याकडे त्यानें आपलें लक्ष लाविलें. हा हेतु तडीस नेण्याकरितां दरसाल आपल्या राज्याच्या एका सुभ्यांत सुभेदारास घेऊन फिरूं लागला. याप्रमाणें फिरत असतां लोकांची दाद घेई, सार्वजनिक कामाचे बेत अमलांत आणी, आणि प्रांतांत कोणत्या गोष्टी सुधारण्याजोग्या आहेत, यांचा विचार करी. याच्या राज्यांत सर्व प्रतीचे लोक निर्भयपणानें व शांततेने होते. न्यायानें वर्तणाऱ्या राजाचें मोल किती आहे, हें समजून ते मोठ्या कृतज्ञतेनें शाहाच्या हुकुमांत वागत; आणि त्याचें राज्य चिरकाल रहावें, म्हणून अंतःकरणपूर्वक परमेश्वराची प्रार्थना करीत. परंतु मृत्यूची धाड सर्वांवर यावयाचीच. त्याप्रमाणें शाहासही त्यानें आपल्या पंजांत पकडून हिजरीसन ७७६ जिल्कादच्या ११ व्या तारखेस ह्या क्षणभंगूर जगांतून शाहास काढून नेलें, आणि त्याच्या सर्व प्रजेस दुःखसागरांत बुडवून हळहळण्यास लाविलें. महंमदशाहाच्या प्रेतास त्याच्या बापाच्या प्रेताजवळच दफन केलें; आणि त्याच्या कबरीवर "जग सर्व मिथ्या आहे" असे शब्द त्याच्या आज्ञेवरून कोरविले.

महंमदशाहाचा मृत्यु. जिल्काद ११ हिजरीसन ७७६. तारीख २१ मार्च इसवी सन १३७५.

ज्याचें राज्य याप्रमाणें भरभराटींत गेलें, व ज्याचीं अशीं स्मारकें मागें राहिलीं आहेत, तो राजा धन्य होय. या शाहास जीवंत असतां लोक अत्यंत मान देत असत, आणि तो मरण पावल्यावरही त्याच्या सद्गुणांवरून वारंवार त्याची आठवण करितात.

**सिराज उत् तवारीख** या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, शाहाच्या खानगींत जितके हत्ती होते, तितके हत्ती त्याच्या वंशांतील कोणत्याही शाहापाशीं नव्हते. नर आणि माद्या मिळून त्याजवळ ३,००० हत्ती होते. तसेंच यानें जें द्रव्य सांठविलें त्याच्या निम्मेसुद्धां दुसऱ्या कोणत्याही शाहानें मिळविलें नाहीं. याच्या पूर्वी कर्नाटकच्या

राजांस व जमीदारांस जिंकून इतकें सुठींत कोणी आणिलें नव्हतें,व त्यांपासून त्यांच्या ७०० वर्षेपर्यंत जमविलेल्या संपत्तीचा बराच भाग कोणी हरण केला नव्हता. असें म्हटलें आहे कीं, याच्या राज्यांत कितीएक लाख हिंदुलोक मुसलमानांच्या तरवारींस बळी पडले, आणि यामुळें कर्नाटकची वस्ती इतकी कमी झाली कीं, ती पूर्ववत् होण्यास कित्येक वर्षे लागलीं. महंमदशाहानें एकंदर १७ वर्षे राज्य केलें.

---

# मुजाईतशाहा बाहामिनी.

इ० सन १३७५ ते १३७८ प०

त्याच्या आंगचें शौर्य —— बाळपणच्या गोष्टी —— विजयानगरच्या राजाशीं लढाईसंबंधीं झालेलें बोलणें —— तो लढाईस निघतो —— एका बाणानें वाघास मारितो —— विजयानगरास पोंचतो —— मुसलमानांचें सैन्य पाहून हिंदू लोक पळतात शाहा जंगलांतून समुद्रकिनाऱ्यापर्यंत त्यांचा पाठलाग करितो —— विजयानगरचा राजा परत राजधानीस येतो —— मुसलमान त्याचा अगदीं पिच्छा पुरवितात —— शाहा विजयानगरच्या रस्त्यांत प्रवेश करितो —— तेथें हिंदुलोक त्याच्याशीं निकरानें लढतात —— शाहाचें एका हिंदूशीं द्वंद्वयुद्ध होतें —— शाहा त्यास मारितो —— नंतर मोठी लढाई होऊन मुसलमान शहरांतून जातात —— तह होतो —— शाहा कलबुर्ग्यास परत येतो —— त्याचा चुलता दाऊदखान शाहाचा वध करितो.

---

महंमदशाहाचा पुत्र **मुजाईत** हा दक्षणच्या तक्तीवर बसला. मलिक सैफउद्दीन घोरी याची कन्या महंमदशाहाची पत्नी होती,व तिच्या पोटीं हा पुत्र झाला होता. हा शाहा शरीरानें मोठा बळकट, दिसण्यांत उंच व भव्य असा होता. त्याच्या आंगचें शौर्य शौर्यांत, धैर्यांत, आणि बळांत याचा हात धरणारा कोणी नव्हता. यास तुर्की भाषा चांगली बोलतां येत असे. याचे सोबती बहुतेक तु-

र्क किंवा इराणी होते. त्यांजपासून ही भाषा त्यास येऊं लागली होती. ल्हानपणापासून यास तीर मारण्याचा व लढाईसंबंधीं गोष्टी बोलण्याचा फार नाद होता. ल्हान असतां यानें एका प्रसंगीं बापाच्या जामदारखान्याचें दार फोडून तेथील सोन्याच्या नाण्याच्या कांहीं थैल्या नेल्या, व आपल्या सोबत्यांस वांटल्या. खजीनदारास ही चोरी झाल्याचें समजतांच त्यानें महंमदशाहास कळविलें. तेव्हां मुलाच्या

बाळपणच्या गोष्टी.

या दुष्ट खोडीचा त्यास अतिशय राग आला, आणि शाहाजाद्यास बोलावण्याकरितां मुबारिक यास पाठविलें. शाहाजादा बापापुढें आला, तेव्हां बाप अतिशय रागावला आहे असें पाहिलें, व राग येण्याचें कारणही त्यानें ताडलें. परंतु त्यास कांहीं सबब सांगण्यास येईना; म्हणून तो उगाच राहिला. आणि रक्त येईपर्यंत बापानें जें त्यास कोरडयानें मारिलें, तें निमुटपणें सोसलें. त्यास बापानें सोडिलें, तेव्हां तो आईकडे गेला, आणि मुबारिकाविषयीं असें गाऱ्हाणें केलें कीं, जर मुबारिकानें याविषयीं मला पूर्वींच सांगितलें असतें, तर मीं तुला मध्यस्ती करण्यास लाविलें असतें. किंवा बापाचा राग शांत होईपर्यंत मी त्याकडे गेलों नसतों. तेव्हां राणीनें सांगितलें कीं, त्यांत नोकराचा अपराध नाहीं. हें ऐकून शाहाजाद्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं, आणि आपला राग आंतल्या आंत जिरवून मुबारिकाशीं नेहमीं प्रमाणें सभ्यरीतीनें वागूं लागला. सुमारें ८ दिवस लोटल्यावर एका प्रसंगीं तो त्यास म्हणाला कीं, तूं मोठा जोरदार पइलवान असून मोठ्या मोठ्या मी म्हणणाऱ्या पैलवानांस चीत केलें आहेस, असें मी ऐकिलें आहे. या करितां तुझ्याशीं कुस्ती खेळावी अशी माझी इच्छा आहे. ही गोष्ट मुबारिकानें कबूल केली व दोघांची कुस्ती झाली. त्या कुस्तींत मुजाईतानें त्यास जमिनीवर असें आदळलें कीं, तो जमिनीवर पडतांच त्याची मान मोडली व तो मेला. ही गोष्ट घडली तेव्हां त्याचें वय १४ वर्षांचें होतें.

मुजाईतशाहा तक्तावर बसला तेव्हां त्याचें वय १९ वर्षांचें होतें. नंतर लागलाच तो **दौलताबादेस शेख बुराण उद्दीन** याच्या कबरीचें दर्शन घेण्यास गेला, आणि शेख **झैन उद्दीन** यास आपला गुरू करून राजधानीस परत आला. यावेळीं त्यास **खानमहंमदा-**

चा कांहीं अंदेशा आला. म्हणून त्याच्या जागीं **अझीम हुमायून** यास दौलताबादच्या सुभेदारीवर नेमून खानमहंमदास हुजूर परत बोलाविलें. विजयानगरचा राजा **कृष्णाराय** यासही असें लिहिलें कीं, **कृष्णा** व **तुंगभद्रा** या दोहों नद्यांमधील किल्ले व मुलूख यांवर उभयतांचा दुतर्फी अम्मल चालत असल्यामुळें वरचेवर तकारीउत्पन्न होतात. या करितां **तुंगभद्रेच्या** पूर्वेकडील सर्व मुलूख **बंकापूरचा किल्ला** आणि दुसरीं कांहीं ठाणीं यांवरील सर्व हक्क सोडून द्यावा. **कृष्णारायानें** उत्तर पाठविलें कीं, "दोहों नद्यांमधील **रायचूर मुदगल** आणि दुसरे कांहीं किल्ले कित्येक युगेंपर्यंत विजयानगरच्या ताब्यांत होते, यास्तव ते किल्ले आम्हांस द्यावे, आणि आपल्या राज्याची हद्द कृष्णानदीच्या उत्तर किनाऱ्यापर्यंत ठेवावी. आणि माझ्या नोकरांच्या गैरवर्तनामुळें महंमदशाहानें मागील लढाईंत जे आमचे हत्ती नेले आहेत, ते आम्हांस परत द्यावे. असें केल्यानें उभयतांमध्यें प्रस्तुत जो विकल्प आला आहे तो जाऊन दोस्ती होईल."

विजयानगरच्या राजाबरोबर लढाईसंबंधीं झालेलें बोलणें.

हें उत्तर पावतांच **मुजाईतशाहानें** आपल्या बापाचा खजिना उघडला, आणि पुष्कळ नवी फौज ठेविली. **मलिक सैफ उद्दीन घोरी** याजकडे सर्व मुलकी राज्यकारभार सोंपवून विजयानगरावर स्वारी करण्याचा त्यानें निश्चय केला. दौलताबाद, वऱ्हाड आणि बेदर येथील फौजा येऊन मिळाल्या, तेव्हां पुष्कळ खजीना आणि ५०० हत्ती घेऊन दक्षिणेकडे कूच केलें. कृष्णा व तुंगभद्रा या नद्या वलांडून दक्षणेंतील अति बळकट किल्ला जो **अडोनी** यापुढें येऊन पोंचला, आणि **सफदरखान शिस्तानी** यास वऱ्हाडची फौज घेऊन अडोनी किल्ल्यास वेढा घालण्यास हुकूम दिला. व **अमीर उल् उमराव, बहादूरखान** आणि **अझीम हुमायून** यांस आपल्या फौजा घेऊन विजयानगराकडे कूच करण्यास सांगितलें. कृष्णारायाची छावणी तुंगभद्रेच्या कांठीं आहे, असें ऐकताच लहान लहान लहान मुक्काम करीत मोठ्या सावधगिरीनें त्याच्या रोखानें पुढें गेला. इतक्यांत कृष्णारायानेंही लढाईची तयारी केली.

तो विजयानगरावर स्वारी करितो.

याच समयीं मुजाईतशाह्मस अशी बातमी लागली कीं, एक मोठा दांणा वाघ माणसें मारण्यास सवकला असून रोजच्या रोज माणसें व जनावरें खात आहे. त्याच्या गुहेजवळच्या रस्त्यावरून जाणाऱ्या पुष्कळ वाटसरांस त्यानें मारिलें, त्यामुळें वाटसरांनीं तो रस्ता सोडून दिला. शाहा स्वाभाविक शिकारीचा शौकी होता. त्यानें वाघाची गुहा आपणास दाखविण्यास सांगितलें, आणि हुकुमाशिवाय बरोबर कोणी येऊनये, असा त्यानें आपल्या लोकांस हुकूम करून तो फक्त सात लोकांनिशीं पायांनीं वाघाच्या गुहेपाशीं गेला. वाघासही त्याची चाहूल समजतांच त्यानें मोठी भयंकर गर्जना केली आणि त्याच्या आंगावर धांवून गेला. शाहानें आपल्या बरोबरच्या लोकांस थांबवून कोणी तीर मारूंनये असा हुकूम दिला, आणि आपण एकटाच कांहीं पावलें पुढें जाऊन जो एक त्यानें तीर मारिला, तो नेमका वाघाच्या कुशींत शिरून वाघ मरून पडला. त्यावेळीं मुजाईतशाहा म्हणाला कीं, माझा नेम चुकला असता तर तरवार आणि कटार यांनीं वाघ मारण्याचा माझा बेत होता. एकाच तिरानें वाघ मेला, ही अघटित गोष्ट दिसली म्हणून कोणत्या मर्मस्थानीं तीर लागला होता, हें पाहण्याकरितां शाहानें वाघाचें शरीर फाडविलें. तेव्हां त्यास असें समजलें कीं, तो थेट काळजांतच शिरला होता.

तो एकाच बाणानें वाघास मारितो.

विजयानगरच्या हिंदुलोकांनीं शाहाचा हा पराक्रम ऐकिला. तेव्हां त्यांच्या मनांत अतिशय भीति उत्पन्न झाली, आणि ते जरी लढाई देण्यास पुढें आले होते, तरी त्यांनीं आपला बेत फिरविला, आणि निबिड जंगलांत दडून आपण सुरक्षित राहावें, आणि तेथून मुसलमानांवर छापे घालून त्यांस उपद्रव द्यावा असा बेत करून, कृष्णराय विजयानगरचें रक्षण करणें आपल्या प्रधानावर सोंपवून शहरच्या दक्षिणेस जंगलांत सैन्यासहवर्तमान गेला.

मुजाईतशाहानें विजयानगर शहरच्या वैभवाविषयीं व सौंदर्याविषयीं लोकांच्या तोंडून फार ऐकिलें होतें. म्हणून तो विजयानगरच्या रोखानें पुढें निघाला; परंतु आतांच त्यास वेढा देणें हें शाहाणपणाचें काम होणार नाहीं, असें समजून जंगलांत शत्रूचा पाठलाग करण्यास निघाला. जंगलें व पहाड यांतून कृष्णराय सेतुबंधरामेश्वराकडे प-

मुसलमानांचें सैन्य पाहून हिंदु पळतात.

+ पश्चिम किनाऱ्यावर गोंव्याच्या दक्षिणेस सदाशिवगडानजीक जें एक रामेश्वर या (पु. चा.)

ळत गेला, व त्याच्या मागें शाहा लागला. ज्या निबिड अरण्यांत घोडेस्वार जाण्यास आजपर्यंत वाट नव्हती, तीं अरण्यें तोडून त्यानें आपल्या स्वारांकरितां वाट केली. या प्रमाणें कृष्णराय सतत ६ महिने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं असा पळत सुटला. परंतु उघड मैदानांत येऊन लढण्यास त्यास छाती झाली नाहीं. शाहाच्या मर्जींतल्या लोकांनीं या पाठलागांत कांहीं अर्थ नाहीं; फक्त आपल्या फौजेची मात्र नासाडी होत आहे; असें जरी वारंवार सांगितलें; तरी शाहानें त्यांच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं. शेवटीं सुदैवानें कृष्णराय व त्याचें कुटुंब यांची तब्बेत जंगलांतील रोगी हवेनें बिघडली. तेव्हां त्यांच्या वैद्यांनीं त्यास जंगल सोडण्यास सांगितलें. कृष्णरायास असें वाटलें होतें कीं, जंगलाच्या वाईट हवेनें शाहास दुखणें लागेल, आणि त्यास मागें हटणें भाग पडेल. परंतु तें अरिष्ट त्यावरच प्रथमतः आलें. या प्रमाणें निरुपाय झाल्यामुळें कृष्णराय चोरवाटांनीं विजयानगराकडे निघाला. त्याच्या पाठीवर शाहानें जी एक फौज पाठविली ती त्याचा पाठलाग करीत गेली. आणि शाहा स्वतः अमीर उल् उमराव आणि बहादूरखान यांस घेऊन सेतुबंध रामेश्वर पाहण्यास गेला.

शाहा जंगलांतून त्याचा पाठलाग करितो.

विजयानगरच्या राजा परत राजधानीस येतो, व मुसलमान त्याचा पिच्छा पुरवितात.

यासमयीं अल्लाउद्दिन खिलजीच्या कामगारांनीं तेथें बांधलेल्या मशिदीची सुजाईतशाहानें दागदुजी केली. हिंदूंचीं कित्येक देवळें पाडिलीं, आणि तेथून मुलूख लुटीत विजयानगराकडे जलदीनें आला. त्या शहरास जाण्यास दोन रस्ते होते. एक फौज जाण्याजोगा मोठा होता, आणि दुसरा अरुंद व अवघड होता. थोरल्या रस्त्यावर शत्रू दबा धरून बसले होते; म्हणून तो धाकट्या रस्त्यानें निवडक फौज घेऊन जो निघाला, तो एकाएकीं शहरच्या आसपासच्या वाड्यांमध्यें जाऊन उतरला, हें त्याचें धाडस पाहून शहरच्या रस्त्यांचा बचाव कर-

---

गांवाचें स्थळ आहे, त्यासच फेरिस्ता यानें चुकीनें सेतुबंध रामेश्वर असें नांव दिलें आहे. यास रामाचें आस्थान किंवा गोकर्ण असेंही म्हणतात. आणि हें स्थळ त्यावेळीं विजयानगरच्या हद्दींत होतें.

ण्याकरितां कृष्णरायानें असंख्य लोक त्यावर पाठविले. शाहानें त्यांस मागें हटवून ज्या गढींत कृष्णराय राहात होता, ती गढी आणि शाहा यांमध्यें जो एक ओढा होता, तेथवर गेला. या ठिकाणानजीक एका उंच टेंकडीवर रत्नजडित सोन्यारुप्याच्या पत्र्यांनीं मढविलेलें देऊळ होतें. हिंदु लोक त्या देवळास पवित्र मानीत असत, व ते त्यास **पटक** असें म्हणत. त्याचा नाश करणें ही एक आपल्या धर्माची आज्ञा आहे, असें समजून त्या टेंकडीवर चढला, आणि त्यानें तें देऊळ जमीनदोस्त केलें, आणि तेथील सोनें रुपें व जवाहीर लुटलें. आपल्या सर्वमान्य पवित्र देवळाचा नाश झालेला पाहून हिंदुलोक अतिशय शोक करूं लागले, व अशा मोठ्यानें त्यांनीं बोंबा ठोकिल्या कीं, तेणेंकरून आकाश दणाणून गेलें. त्यांनीं कृष्णरायास बोलावून त्यासहवर्तमान असंख्य हिंदुलोक मोठ्या नेटानें मुसलमानांच्या तोंडावर चालून गेले. त्यासमयीं आपलें छत्र व किरीट एकीकडे ठेवून महंमूद या नांवाच्या एका अफगाणास मात्र आपल्या बरोबर घेतलें, आणि आपलें चिलखत घालून हिंदु कसे लढतात, हें पाहण्याकरितां ओढा उतरून शाहा पलीकडे जाऊं लागला. याचवेळीं ज्या घोड्यावर शाहा स्वार झाला होता, त्या घोड्यावरून त्यास एका हिंदूनें ओळखिलें. तेव्हां आपल्या देशांतील देवांचा नाश करणाऱ्याचा सूड घेऊन अमर कीर्ति संपादावी, असा त्यानें निश्चय केला. त्या प्रमाणें ओढ्याच्या किनाऱ्यावरील ओघळींतून व दऱ्यांतून कोणाच्या दृष्टीस नपडतां खूब त्वरेनें शाहाजवळ येऊन त्यावर वार करीत होता. इतक्यांत मुजाहीत शाहानें त्यास पाहून महंमूद अफगाणास खूण केली; तेव्हां तो विलंब नलावितां शाहास मागें सारून आपण पुढें झाला. परंतु इतक्यांत महंमुदाचा घोडा उपायीं आला, व तो खालीं पडला. यामुळें हिंदूस क्षणभर सवड सांपडली. इतक्यांत विजेच्या वेगाप्रमाणें मुजाहीत शाहा हिंदूवर चालून गेला, तों हिंदूनें महंमुदास सोडून शाहावर जबर वार करण्यास हात उगारिला. त्याबरोबर त्याणें जयाची आरोळी ठोकिली तेणेंकरून सभोंवतालच्या लोकांस वाटलें कीं, त्या-

शाहा विजयानगरच्या शहरांत प्रवेश करितो.

हिंदुलोक मोठ्या निकरानें लढतात.

चा वार शाहास लागला. इतक्यांत शाहाच्या डोक्यावर जें चिलखत होतें, त्यानें त्याचा बचाव झाला. आणि शाहानें त्या हिंदूवर उलट असा जबर वार केला कीं; त्याचे खांद्यापासून बेंबीपर्यंत दोन तुकडे होऊन तो घोड्यावरून मरून खालीं पडला. नंतर शाहानें महंमुदास घोड्यावर बसविलें आणि तो आपल्या फौजेंत येऊन मिळाला. तेव्हां त्याच्या लोकांस अत्यंत आनंद झाला, आणि शत्रूंनीं त्याच्या शूर व धाडस कृत्याबद्दल त्याची फार वाहवा केली.

शाहाचें एका हिंदूशीं द्वंद्वयुद्ध होतें आणि शाहा त्यास मारितो.

**कृष्णरायानें** आपल्या फौजेसह मुसलमानांवर हल्ला केला, तेव्हां शाहानें उजव्या फळीवर **अमीर उल् उमराव** आणि **बहादूरखान** यांस नेमिलें. आणि डाव्या फळीवर **अझीम हुमायून** आणि **सफदरखान** यांस नेमिलें, आणि तोफांचा भडिमार करून लढाई सुरू केली. मोठ्या निकराची लढाई होऊन व दोहोंपक्षांतील पुष्कळ लोक पडून मुसलमानांनीं शत्रूस पिटून लाविलें. विजयी झालेल्या मुसलमानांस जे श्रम झाले होते, त्यांच्या परिहारार्थ थोडी विश्रांती घेतली न घेतली; इतक्यांत कृष्णरायाचा बंधु २०,००० स्वार आणि कांहीं पायदळ अशी कुमक घेऊन आपल्या सुभेदारीवरून विजयानगरास आला. तेव्हां कृष्णरायानें अस्ताव्यस्त झालेली आपली फौज पुनः जमवून शाहावर पुनः एकवार हल्ला केला. या हल्ल्यांत हिंदूनीं मोठी मर्दुमकी दाखविली, आणि दोहोंकडचे फार लोक पडले. मुसलमानांच्या सैन्यांतील तोफखान्यावरील **मुकारपखान** व दुसरे पुष्कळ मोठे सरदार पडले. सुजाईतशाहा लढाईंत सर्व ठिकाणीं स्वतः जाऊन लढण्यास उभा राही, व उत्तेजन देई. जेथें जेथें तो आपला काळा घोडा नेई, तेथें तेथें भाल्या खालीं पुष्कळ हिंदूंस ठार करी. शाहाचा चुलता **दाऊदखान** ६,००० स्वार व कांहीं पायदळ घेऊन **धनसोद्र** या नांवाच्या ठाण्याच्या बंदोबस्ताकरितां राहिला होता. उजाडल्यापासून लढाई सुरू झाली असून अद्यापपर्यंत शत्रूंचा पराभव होत नाहीं व क्षणोक्षणी शत्रूस कुमकही येत आहे असें पाहून शाहाच्या जिवाविषयीं त्यास भीति वाटली, आणि तो आपलें ठाणें सोडून लढाईस आला. त्यानें लढाईंत अशी जवानमर्दी दाखविली कीं, लोकांनीं तोंडांत बो-

मोठी निकराची लढाई होते, व मुसलमान शत्रूंतून जातात.

टेंच घातलीं. त्याचे तीन घोडे मेले, व कित्येक वेळां त्यास पायीं लढावें लागलें. दाऊदखानाचें निशाण पाहून बिगरहुकूम आल्यामुळें शाहास बरें वाटलें नाहीं. तथापि मुसलमानांस जय मिळेपर्यंत त्यानें आपला राग दाखविला नाहीं. नंतर त्यानें दाऊदखानास बोलावून आपलें ठाणें सोडल्याबद्दल त्यास जबर नशीहद दिली. आणि म्हणाला कीं जर मुसलमानांचा पराभव झाला असता, आणि **धनसोद्र** हें ठाणें हिंदूच्या स्वाधीन झालें असतें; तर एकही मुसलमान जिवंत सुटला नसता. शाहानें तत्काळ त्या महत्वाच्या ठाण्याच्या बंदोबस्ताकरितां फौजेची एक टोळी पाठविली; परंतु दाऊदखान तेथून गेल्याचें ऐकतांच हिंदूंनीं तें ठाणें ताब्यांत घेतलें होतें, आणि तेथें हिंदूंचा जमाव मोठा होता. तेव्हां असें ठाणें ताब्यांत घेण्याकरितां पाठविलेल्या फौजेवरील सरदारानें शाहास खबर देऊन सल्ला विचारिली. जरी शत्रूंचे ४५००० लोक लढाईत पडले होते. तरी मुसलमानांचीही इतकी खराबी झाली होती कीं, छावणी होती तेथें जास्तवेळ राहणें हितकर होणार नाहीं, असें शाहास वाटून तो सर्व फौजेसह **धनसोद्र** या ठाण्याकडे निघाला. शाहा नजीक येतांच ठाणें सोडून हिंदु गेले. सर्व फौज सुरक्षितपणें ठाण्यांत जाईपर्यंत ठाण्यांत शिरण्याच्या वाटेंत निवडक निवडक फौज घेऊन शाहा स्वतः उभा राहिला. कारण मागें हटत असतां कृष्णराय कदाचित् उपद्रव देईल, अशी भीति होती. ज्यांनीं हा मुलुख पाहिला आहे, ते असें कबूल करितात कीं, ह्या स्वारींत कधीं कोणाच्या हातून होणार नाहीं, अशी कर्तबगारी केवळ अल्लाच्या कृपेनें मुजाहितशाहानें केली.

कृष्णेपासून **सेतुबंध रामेश्वरा**+ (गोकर्णपर्यंत) पर्यंत दक्षिणोत्तर

---

+ हेंही स्थळ लंकेच्या समोरचें रामेश्वर असा फेरिस्ता याच्या लिहिण्याचा रोख दिसतो; परंतु म्हैसूरच्या पलीकडचा मुलूख कृष्णरायाच्या ताब्यांत नव्हता हें खचित आहे. आणि यावेळीं मदूरा येथें एक मोठा तामील जातीचा बलाढ्य राजा राज्य करीत होता, हेंही फेरिस्तास माहीत नव्हतें, असें दिसतें. व त्याच प्रमाणें तिकडील लोक कानडी किंवा तेलंगी यांपासून अगदीं भिन्न अशी तामील भाषा बोलत, ही ही गोष्ट त्यास माहीत नव्हती. परंतु यांत फारसें आश्चर्य नाहीं. कारण फेरिस्ता हा मूळचा इ-(पु॰ चा॰)

कर्नाटकची लांबी ६०० कोसच होती. आणि हिंदीमहासागरापासून तेलंगण-च्या सरहद्दीपर्यंत पूर्वपश्चिम रुंदी १५० कोस होती. कित्येक भागांत लोक कानडी भाषा बोलतात; आणि कित्येक भागीं तेलंगी भाषा बोलतात. हे लोक इतके शूर आहेत कीं; लढाईस जातांना नाचतात, व गाणीं म्हणतात. परंतु ती त्यांची हिंमत फार काळ टिकत नाहीं. देशांत मोठीं जंगलें व पहाड फार असून त्यांत फौजेचा रिगाव होण्यास मुष्कील पडते. बाहामिनी वंशाच्या शाहांनीं केवळ आपल्या शौर्यानेंच वर्चस्व राखिलें. मुख्यत्वें मुजाईतशाहाच्या वेळीं तर संपत्तीनें व बलानें विजयानगरचे राजे फार मोठे असून त्यांच्या राज्याचा विस्तारही बहुत होता. कारण यावेळीं तेलंगणचा सर्व प्रांतही बाहामिनीशाहाच्या पूर्णपणें अमलाखालीं आला नव्हता. कर्नाटकाबाहेरील **गोंवे** बंदर **बेळगांव**चा किल्ला व दुसरीं कांहीं ठाणीं हीं विजयानगरच्या राजाच्या ताब्यांतच होतीं. त्याच प्रमाणें **तळघांट** (कोंकण) चे पुष्कळ प्रांतही त्याच्याच ताब्यांत होते. त्याच्या मुलखांत लोकवस्ती दाट होती, व त्याची प्रजा अगदीं त्याच्या हुकुमांत होती. मलबार, सिंहलद्वीप आणि दुसरे कांहीं देश येथील राजांचे वकील याच्या दरबारांत होते, व ते दरसाल यास मोठ्या नजरा पाठवीत. कृष्णरायाच्या पूर्वजांकडे हें राज्य ७०० वर्षें चाललें होतें, आणि या काळांत कोणतीही राज्यक्रांति न झाल्यामुळें व खर्चही बेताबेताचा असल्यामुळें जामदारखाना इतका भरला होता कीं, त्याची बरोबरी पृथ्वीवरील सर्व राजांचे जामदारखाने एकत्र केले तरी झाली नसती. **अल्लाउद्दिन खिलजीच्या** वेळीं **कृष्णरायाच्या** आजानें कांहीं धार्मिक कृत्यांकरितां आपलें द्रव्य पुरलें होतें, त्यापैकीं कांहीं सेतुबंधरामेश्वरास (गोकर्णास) होतें तें अल्लाउद्दिनाच्या सरदारांस मिळालें.

विजयानगर घेणें आपल्या हातून होत नाहीं, असें जेव्हां मुजाईतशाहास वाटलें, तेव्हां त्यानें विजयानगराजवळून आपली छावणी उ-

---

राणचा रहिवाशी असून तो हिंदुस्थानांत फार फिरलेला नव्हता. म्हणून हिंदूलोकांविषयींची त्याची माहिती साधारणपणें अपुर्ती होती, व ज्या प्रांतीं मुसलमानांचा अम्मल बसला नव्हता, त्या प्रांताच्या भूगोलाविषयींही त्याची माहिती फार अपुर्ती होती.

ठविली, आणि लढाईंत केलेल्या सुमारें ६०,००० कैद्यांस घेऊन तेथून निघाला. कैद्यांत मुख्यत्वें स्त्रिया फार होत्या. कारण माजी शाहानें तह केल्या प्रमाणें लढाई संपल्यावर कोणास मारावयाचें नाहीं, असा नेम मुजाईतशाहानें राखिला होता. त्याची कांहीं फौज अडोनी-च्या किल्यास वेढा घालून बसली होती. तेथें शाहा गेला आणि त्यानें त्या किल्यास आणखी ९ महिने वेढा दिला. किल्यांत पाण्याची तूट पडून किल्यावरील सैन्य कैलास येण्याच्या लागास आलें होतें. परंतु इतक्यांत मोठा पाऊस पडला, व किल्यावरील लोक त्या संकटांतून मुक्त होऊन पुनः लढूं लागले. याच समयास शाहाच्या छावणींत धान्याचा तोटा पडला, तेणेंकरून संग्रहणी आमांश वगैरे रोग शाहाच्या गोटांत उद्भवून शेंकडों लोक मरूं लागले. तेव्हां सर्व फौज हवालदील होऊन स्वदेशीं जाण्यास फार आग्रह करूं लागली.

शाहाच्या फौजेची अशी दुःखद स्थिति असल्याची खबर ऐकून **मलिक सैफ उद्दिन घोरी** यानें आपल्या पथकासह येण्याची आज्ञा मागितली, व अडोनीच्या किल्याच्या दुर्धरतेविषयीं लोकांच्या तोंडून फार ऐकिलें असून तो किल्ला पाहण्याचीही मोठी इच्छा आहे, असेंही त्यानें शाहास कळविलें. शाहानें त्याची विनंति मान्य केली, व त्या प्रमाणें तो येऊन शाहास मिळाला. घोरीनें शाहास खासगी रीतीनें असें कळविलें कीं, अल्प काळांत असा दुर्धर किल्ला सर करण्याची आशा सुध्दां नको. या किल्याचें दुसऱ्या १५ किल्यांशीं दळणवळण चालत असल्यानें किल्यावर धान्याचा व लोकांचा तोटा पडण्याचा संभव नाहीं. दोहों नद्यांमधील गोव्यापासून बेळगाव आणि बंकापूरपर्यंत जे दुसरे किल्ले आहेत ते अगोदर सर केले पाहिजेत. हें ऐकून मुजाईतशाहानें वेढा उठवून परत जाण्याचें कबूल केलें. मलिक सैफउद्दीन घोरी याच्या विद्यमानें विजयानगरच्या राजाबरोबर तह केला, आणि घोरीस आघाडीस रवाना करून शाहा मागून आपल्या मुलखीं जाण्यास निघाला.

विजयानगरच्या राजाशीं तह.

शाहाची फौज तुंगभद्रा नदी उतरून **मुदकल**च्या किल्यानजीक आ-

+ अडोनी हा किल्ला अद्यापही हिंदुस्थानांतील दुर्धरकिल्यांपैकीं एक किल्ला आहे.

ली; तेव्हां मर्जीतील कांहीं सरदारांस घेऊन फक्त ४०० स्वारांनिशी शाहा शिकारीस गेला. शाहाबरोबर **दाऊदखान, सफदरखान शिस्तानी** आणि **अझिम हुमायून** हे तिघेही होते. शाहाची अशी वहिवाट असे कीं; सर्व दिवस शिकार करून जेथें अस्तमान होईल, तेथेंच मुक्काम करून रात्र घालवावयाची.

विजयानगर येथें शाहानें **दाऊदखानास** आपलें ठाणें सोडून आल्याबद्दल जो टपका दिला होता, तो त्याच्या मनांत डवचत होता. तक्त आपणास मिळावें, अशीही त्याची अंतर्गत इच्छा होती. म्हणून त्यानें शाहाचा वध करण्याची गुप्त मसलत केली. या मसलतीस **खानमहंमद** आणि **मसाऊदखान** हे त्यास सामील झाले. कारण आपल्यास दौलताबादच्या सुभेदारीवरून काढून आपला प्रतिस्पर्धि **अझिम हुमायून** यास तेथें शाहानें नेमिलें, ही गोष्ट खानमहंमद विसरला नव्हता; आणि मुबारिकाचा पुत्र **मसाऊदखान** यास आपल्या बापास मुजाईतशाहानें कुस्तींत ठार मारिलें होतें, त्याचा सूड घ्यावयाचा होता. हे तिघे दुष्ट आपला बेत सिध्दीस नेण्यास केव्हां संधि सांपडेल याची मोठ्या उतावळीनें वाट पाहातच होते. परंतु **सफदरखान** आणि **अझिम हुमायून** हे नेहमी शाहाजवळ राहून मोठ्या सावधगिरीनें असत, म्हणून यांस संधि सांपडत नसे. ईश्वरी संकेत असला तर तो कशानें चुकतो? एके दिवशीं शाहानें या दोघां सरदारांस आपल्या सुभेदारीवर पाठविलें, व बाकी सैन्य घेऊन आपण राजधानीकडे निघाला. या दुष्ट बेताची गुणगुण यांस कळली होती, म्हणून त्यांनीं न जाण्याविषयीं फार आढे वेढे घेतले, परंतु शाहानें ऐकिलें नाहीं. पुढें राजधानीकडे जात असतां मार्गांत एका नदीच्या तीरीं मुक्काम झाला. तेव्हां शाहा मौजेनें मासे मारण्यास गेला. तेथें एकाएकीं डोळ्यांस कांहीं इजा झाली, म्हणून तो विश्रांति घेण्यास तंबूंत आला. त्याबरोबर तंबूसभोंवती त्या दुष्ट लोकांनीं आपला पाहारा ठेविला.

**खानमहंमद** व त्याचे लोक यांस तंबू बाहेर पाहऱ्यास ठेवून मध्यरात्रीचे सुमारास **मसाऊदखान** आणि दुसरे दोन असामी यांसह **दाऊदखान** तंबूंत शिरला. शाहास झोंप लागली होती, आणि शाहाचे पाय चोळण्यास एक हबशी गुलाम मात्र त्याजवळ हो-

ता. हातांत नागवी तरवार घेऊन दाऊदखान जवळ आल्याचें पाहतांच गुलाम दचकला, आणि मोठ्यानें ओरडला. त्यामुळें शाहा उठला. परंतु त्याच्या डोळ्यांस जी इजा झाली होती, त्यामुळें त्यास डोळे उघडितां येईनात. दाऊदखान त्याच्यावर चवताळून गेला आणि त्याच्या उरांत त्यानें कठार खुपसली. त्या दुःखांतच मारेकऱ्याच्या ज्या हातांत कठार होती, तो हात शाहानें धरिला, आणि त्याच्याशीं झोंबूं लागला. गुलामापाशीं जरी हत्यार नव्हतें, तथापि त्यानें मसाहदखानास धरिलें. परंतु त्यानें समशेरीच्या एका घावानें त्यास ठार केलें. आणि शाहावर अशा जोरानें दुसरा वार केला कीं, तत्क्षणीं शाहा मेला.

शाहाचा चुलता दाऊदखान त्यास ठार मारितो. तारीख १४ एप्रील सन १३७८ इ.

आपला पुतण्या व धनी याचें प्रेत तसेंच तेथें टाकून तंबूंतून दाऊदखान बाहेर आला आणि त्याच दिवशीं जे सरदार व कामगार हजर होते, त्यांजकडून आपण राज्याचा मालक आहें; असें त्यानें कबूल करून घेतलें. मुजाईतशाहास संतान नसल्यामुळें तो वास्तवीकच राज्याचा मालक होता. सरदारांनीं मोठ्या नाखुषीनें आपला रुकार दिला, आणि वहिवाटीप्रमाणें त्यांस त्यानें मोठे किताब व बक्षिसें दिलीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दाऊदखानानें आपल्या पुतण्याचें प्रेत कलबुर्ग्यास पाठविलें, आणि २।३ दिवस मुक्काम करून फौजेसह स्वतः राजधानीस गेला.

मुजाईतशाहानें पुरें ३ वर्षेंही राज्य केलें नाहीं. हाजी महंमद कंदाहारी हा म्हणतो कीं, मुजाईतशाहास मुबारिकाच्या मुलानें घातुक जखम तारीख १७ जिल्हेज हिजरीसन ७७९ (तारीख १४ एप्रिल सन १३७८ इसवी) रोजीं केली. परंतु खरें काय असेल तें ईश्वरास माहीत असणार.

---

# दाऊदशाहा बाहामिनी.

इसवीसन १३७८ इसवी.

सैन्यांतील सरदारांमध्यें शाहाविषयीं अप्रीति—— कांहीं सरदार आपापलीं पथकें घेऊन आपआपल्या सुभेदारीवर जातात.—— दाऊदखानास लोकांनीं शाहा असें कबूल करावें, अशाबद्दल मलिक सैफ उद्दीन घोरी यत्न करितो—— त्यास काम सोडून घरीं बसण्यास परवानगी मिळते—— मार्जी शाहाची बहीण दाऊदखानास कबूल करीत नाहीं—— आणि ती निमाज पढत असतां मारेकऱ्याकडून ती त्यास ठार मारविते.

---

दक्षणचे इतिहासकार असें लिहितात कीं, मुजाईनशाहाच्या वधाचें वर्तमान चोंहोंकडे पसरतांच जिकडे तिकडे कलह सुरू झाले. सफदरखान आणि अझिमहुमायून विजापुरास नुकतेच पोंचले होते. इतक्यांत त्यानीं शाहाच्या वधाचें व दाऊदखान तक्तावर बसल्याचें वर्तमान ऐकिलें, तेव्हां ते उभयतां लागलेच कलबुर्ग्यास गेले. तेथें त्यांनीं वध केलेल्या शाहाचें प्रेत प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें. तेव्हां ते उभयतां परत विजापुरास गेले, आणि तेथें जे हुजूरचे हत्ती व घोडे होते, ते सर्व घेऊन एलचपूर आणि दौलताबाद या आपल्या सुभेदाऱ्यांवर गेले. आणि त्याच वेळीं त्यांनीं दाऊदखानास असें कळविलें कीं, आपल्या फौजांस विश्रांति देऊन ताजे तवाने करण्याकरितां आम्हीं आपल्या सुभेदाऱ्यांवर जाऊन तेथें हुजूरच्या आज्ञेची वाट पहात राहतों. जेथें हुकूम होईल, तेथें विलंब न करितां येऊं.

सैन्यांतील सरदारांमध्यें शाहाविषयीं अप्रीति.

कांहीं सरदार आपलीं पथकें घेऊन आपआपल्या सुभेदारीवर जातात.

ही सर्व खबर ऐकतांच विजयानगरच्या फौजेस फार आनंद झाला, आणि कृष्णानदीपर्यंत मुलूख लुटून तिनें उध्वस्त केला, आणि रायचूर किल्यापुढें येऊन त्या किल्यास त्यांनीं वेढा दिला. कलबुर्ग्यास दोन फळ्या झाल्या. एक फळी दाऊदखानाच्या पक्षाची व दुसरी महंमुदखानाच्या पक्षाची. हा महंमूद अल्लाउद्दिन हसन कांगोचा अगदीं कनिष्ठ पुत्र असून मुजाईतशाहा तक्तावर बसल्यापासून किल्यावर, कैदेंत होता.

माजी शाहाचा वजीर **मलिक सैफ उद्दीन घोरी** यास वाटलें कीं, अशी फुटाफूट झाल्यानें राज्याची खराबी मात्र होईल. यास्तव माजी शाहाचा अगदीं जवळचा आप्त जो **दाऊदखान** तो पूर्वींच तक्तावर बसला आहे. तेव्हां त्याचा अधिकार सर्वांनीं मान्य करून आपसांत लढाई करूंनये असें त्यानें सर्वांस सांगितलें. मलिक सैफ उद्दिन घोरी हा पहिलाच वजीर असून बाहामिनी घराण्याचा केवळ स्तंभ होता. यामुळें राजधानींतील लोकांत व कामगारांत त्याचें वजन फार होतें. ही सल्ला सर्वांनीं मान्य करून त्या प्रमाणें चालण्याचें कबूल केलें. जनानखान्यांतील स्त्रियांसही घोरीची सल्ला मान्य झाली. परंतु माजी शाहाची बहीण व खुद्द घोरीची नात हिला मात्र ही मसलत पसंत पडली नाहीं. तिनें आपल्या आजाची निर्भत्सना करून "आपल्या नातवाचा सूड घेण्यास तयार हो" असें त्यास सांगितलें.

दाऊदखानाचा अधिकार सर्वांनीं मान्य करण्याबद्दल मलिक सैफ उद्दिन घोरी प्रयत्न करितो.

मलिक सैफ उद्दिन घोरी यानें **दाऊदखान**ाच्या नांवानें खुतबा वाचला, आणि सर्व सरदार, काजी, मुल्ले आणि संभावीत गृहस्थ यांसहवर्तमान त्याच्या भेटीस गेला. त्यानें मोठ्या समारंभानें दाऊदखानास शहरांत नेलें, आणि तो **तक्त फेरोज** यावर बसला. नंतर घोरी यानें काम सोडून घरीं बसण्याची आज्ञा मागितली, व त्या प्रमाणें शाहानें त्यास परवानगी दिली. शाहा सर्व कारभार स्वतः पाहूं लागला, आणि सर्व सरदार त्याच्या आज्ञेंत वागूं लागले. याप्रमाणें त्याचा अधिकार पूर्णपणें स्थापित झाला असें दिसलें.

घोरी यास काम सोडून घरीं बसण्यास परवानगी मिळते.

तथापि मुजाईतशाहाची बहीण **रूपवर आघा** त्याचा अधिकार मान्य करीना. दाऊदशाहानें तिला आपलीशी करण्याकरितां होती तितकी खटपट केली. तरी ती त्याचें कोणतेंही म्हणणें ऐकेना. जनानखान्यांत तिचें वजन फार असे, आणि महंमदशाहा मेल्यापासून जनानखान्यांत तीच प्रमुख होती. यामुळें तिच्याशीं मोठ्या आदबीनें वागून तिची तब्येत संभाळणें शाहास भाग होतें. शेवटीं मुजाईतशाहाच्या फार मर्जींतल्या एका जवानास जिवावर उदार होऊन आपल्या धन्याच्या वधाचा सूड घेण्यास ति-

महंमदशाहाची कन्या दाऊदखानाचा अधिकार कबूल करीत नाहीं.

नें वश केलें.

हिजरी सन ७८० सालीं (ता० माहे मे सन १३७८ इ०) मोहरमच्या २१ व्या तारखेस कलबुर्गे येथील मोठ्या मशिदींत खानमहंमदासह वर्तमान दाऊदशाहा जात असतां वरील मारेकरी संधी साधून त्याच्या मागून गेला. आणि मशिदींत शाहाच्या मागेंच उभा राहिला. शाहानें निमाज पढत असतां गुडघे टेंकिले आहेत, ही संधि साधून त्यानें आपला तेगा काढिला, आणि जवळच शाहाचे हुजरे यांस त्याचा बेत समजण्यापूर्वीच शाहास अशी जोराची त्यानें जखम केली कीं, तिनें तो तत्काळ मेला. खानमहंमदानें हें कृत्य पाहतांच मारेकऱ्यास जाऊं न देतां तेग्याच्या एका घावानें त्याचें डोकें उडविलें. दाऊदखानानें सारें १ महिना ५ दिवस राज्य केलें.

दाऊदखानास ती मारेकऱ्याकडून ठार मारविलें. ता० मे सन १३७८ इ०

---

# महंमूदशाहा बाहामिनी.

इ० स० १३७८ ते १३९७ प०

शाहाजादी रूपवर आघा हिचें वर्तन.— माजी दाऊदखानाचा पुत्र महंमद संजर याचे डोकें काढून हसनकांगोचा कनिष्ठ पुत्र महंमूद यास तक्तावर बसवितें.— मलिक सैफउद्दीन घोरी हा पुनः वजिरीचें काम पाहतो — विजयानगरच्या राजाकडून शाहास आनंदमदर्शक पत्र येतें — शाहा ग्रंथकारांस उत्तेजन देतो — इराणांतून प्रसिद्ध कवि हाफीज यास दरबारीं बोलावितो — त्याचें न येण्याचें कारण — त्या प्रसंगीं त्यानें केलेलें कवन — शाहाच्या कारकीर्दींत मुल्कीखात्यांत सुधारणा — सागर येथें बंड — युसफ तुर्क नें बंड मोडितो.— शाहाचा मृत्यु.

---

दाऊदशाहाचा वध झाल्यावर त्याचा पुत्र महंमद संजर यास खानमहंमदानें तक्तावर बसविण्याचा यत्न केला. त्याचें वय त्यावेळीं ९ वर्षांचें होतें. या करितां तो आपल्या सर्व अनुयायांस घेऊन राजवाड्यांत गेला. परंतु रूपवर आघास त्याचा बेत समजतांच तिनें वाड्याचे दरवाजे बं-

शाहाजादी रूपवर आघा हिचें हिंमतीचें वर्तन.

द केले; आणि ज्यानें आपल्या बादशाहाचा व माझ्या भावाचा अन्यायानें वध केला, अशा दगेबाजाच्या पुत्रास मी जिवंत आहें तोंपर्यंत तक्तावर बसूं देणार नाहीं, अशी तिनें प्रतिज्ञा केली, आणि लागलीच अल्लाउद्दिनशाहाचा कनिष्ठ पुत्र महंमूद हा तक्ताचा वारस आहे, अशी तिनें द्वाही फिरविली. महंमदसंजरही वाड्यांतच असून शाहाजादीच्या ताब्यांत होता. यामुळें आतां पुढें कसें करावें, हें खानमहंमदास सुचेना. तेव्हां तो मलिक सैफ उद्दीन घोरी याच्या घरीं जाऊन आपल्या पक्षास मिळण्याविषयीं त्याचें मन वळविण्याचा यत्न करूं लागला. त्यानें लागलेंच उत्तर केलें कीं, महंमद संजर आणि शाहाजादा महंमूद हे दोघेही रूपवर आयाच्या ताब्यांत आहेत, म्हणून या तक्तावर कोणास बसवावयाचें हें तिजवरच सोंपवून कलह टाळावा हें मला बरें दिसतें. खानमहंमदाची खात्री होती कीं: हिंदु व मुसलमान हे लोक आणि सर्व सरदार हे मलिक सैफ उद्दीन याच्या सल्याप्रमाणें चालतील. यास्तव त्याचेंच म्हणणें कबूल करून तो राजवाड्यांत गेला. शा-

शी महंमदसंजर याचे डोळे काढून महंमदास तक्तावर बसविले.

हाजादीनें महंमद संजर याचे डोळे काढून त्यास तक्तावर बसविण्याचा पुढें कधीं यत्न होऊंनये असें केलें, आणि मुख्य कामगार, सरदार, व वजीर यांच्या संमतीनें शाहाजादा महंमूद यास तक्तावर बसविलें.

**महंमूद** शाहा स्वभावानें मोठा दयाशील, सद्गुणी, आणि न्याया असा होता. कारभारच्या कामांत ज्या तजविजी व दर्याफ्ति नौकरी त्या नेहमीं योग्य व विचारच्या असत. नुक्तींच जीं बंडें झालीं तीं करण्यांत खानमहंमद हा एक मुख्य होता. याकरितां त्यास महंमूदशाहानें सागरच्या किल्यावर कैदेंत टाकिलें. आणि तेथें तो थोड्याच दिवसांनीं कैदेंत असतांच मरण पावला. तसेंच मुजाईतशाहाचा वध करण्यांत ससाऊदखान हा साथीदार होता, म्हणून त्यास सुळीं देण्याची आज्ञा केली. आणि मलिक सैफ उद्दीन-

मलिक सैफ उद्दीन घोरी वजीरीचें काम पुनः पाहूं लागलो.

घोरी याचें पुष्कळ आर्जव करून वजिरीचें काम आणि राजधानीची सुभेदारी पत्करण्याविषयीं त्याचें मन वळविलें; आणि घोरीच्या सल्याशिवाय शाहा कोणतेंही कृत्य करीना. येणेंकरून फार हित झालें. आणि सर्व सुर-

र्कीत चाललें. कारण याच्या कारकीर्दीत कोठें दंगे बखेडे झाले नाहींत. आणि राज्यकारभारांनही दिलाई पडली नाहीं. महंमूदशाहा तक्तावर बसल्या बरोबर **दौलताबाद, माहूर,** आणि **कोलास** या उत्तरेकडील तीन सुभ्यांवरचे सुभेदार **बहादूरखान, सफदरखान,** आणि **अझिम हुमायून** हे जलदीनें राजधानीस आले, आणि आपल्या दर्जास योग्य अशा नजरा हुजूर करून आनंद प्रदर्शित केला. आणि आपण हुजूरचे ताबेदार असून जो हुजूरून हुकूम होईल त्या प्रमाणें वागण्यास तयार आहों, असें कळविलें. त्याच प्रमाणें विजयानगरचा राजा रायचूरचा वेढा उठवून परत गेला, आणि **महंमदशाहा** गाझींच्या कारकीर्दींत ठरल्याप्रमाणें महंमुदशाहास खंडणी देण्याचें त्यानें कबूल केलें.

त्यास चोहोंकडून आनंदप्रदर्शक पत्रें येतात.

महंमूदशाहास कवितेची फार आवड असे, आणि त्यानें कांहीं चांगलीं कवनेंही लिहिलीं होतीं. त्यास फारशी व आरबी भाषा अडखळल्याशिवाय स्पष्ट बोलतां येत असत. तो फार भरभराटी किंवा बरखत झाली तरी घमेंडी मानीत नसे, किंवा संकटसमयीं दुःखांत बुडत नसे. त्यानें एकपत्नी व्रत पाळलें होतें, आणि काजी व मुल्ले यांच्या म्हणण्यास नेहमीं फार मान देत असे, व त्यांच्या बरोबर काळ घालविण्यांत त्यास फार आनंद वाटे. याच्या कारकीर्दींत **अरबस्थान** आणि **इराण** येथून मोठे कवी दक्षणेंत येत, व त्यांस महंमूद शाहाकडून मोठ्या बिदाग्या व मोठीं इनामें मिळत. **मीर फैज मुल्ला अंजू** हा मुख्य न्यायाधिकारी होता. त्यानें एक कवन करून शाहास नजर केलें. तेव्हां शाहानें त्यास १,००० मोहोरा बक्षीस दिल्या, आणि त्यास पुष्कळ संपत्ति व किताब देऊन स्वदेशीं जाण्यास परवानगी दिली. शाहाची कवितेविषयीं आवड, त्याचा मनमिळाऊपणा व औदार्य याची कीर्ति जिकडे तिकडे इतकी पसरली कीं, **शिराज** येथील प्रसिद्ध कवि **ख्वाजा हाफीज** यानें दक्षणेंत येण्याचा बेत केला. परंतु एकामागून एक अनेक अडचणी आल्यामुळें त्याचा तो बेत सिद्धीस गेला नाहीं. त्याचें वर्णन खालीं लिहिल्याप्रमाणें केलें आहे.

शाहा ग्रंथकारास उत्तेजन देतो.

**मीर फैज उल्ला अंजू** यानें या प्रसिद्ध कवीस शाहाकडून एक बक्षीस पाठविलें, आणि स्वतः त्यास असें पत्र लिहिलें कीं, जर

तूं कलबुर्ग्यास येशील, तर तुला मोठीं बक्षिसें मिळतील. आणि शिराज येथें तुला परत सुरक्षित पोंहोंचविण्याची तजवीज होईल. अंजूनें याप्रमाणें स्वामीपूर्वक मेहेरबानीनें वचन दिल्यावरून हाफीज यानें दक्षणेंत येण्याचा बेत केला. त्यास ज्या चिजा दक्षणेंतून आल्या होत्या त्या आपल्या आप्तांस व सावकारांस देऊन तो शिराज येथून निघाला, आणि इराणी अखातांतील लार या बंदरीं सुरक्षित येऊन पोहोंचला. या ठिकाणीं त्याच्या एका मित्राची कांहीं रोकड चोरीस गेली होती. म्हणून त्यास त्यानें यथाशक्ति मदत करून तेथून तो हारमसच्या सामुद्रधुनीस जाण्यास निघाला. ख्वाजे झैन उल् अबिदीन अमदानी आणि ख्वाजे महंमद गाझरूनी हे हिंदुस्थानास येणार होते. तेही हाफीज बरोबर निघाले. दक्षणेंतून बादशाही जहाज हारमसच्या आरवातांत आलें होतें. त्यांनच हे तिघेही हारमस येथें बसले. नांगर वर घेऊन जहाज निघालें न निघालें तोंच मोठें वादळ सुटलें. समुद्र फार खवळला, आणि जहाज परत बंदरांत आलें. वादळांत त्यास इतका त्रास झाला कीं, जाहाजावरून आपणास उतरावें, असा त्यानें आग्रह धरिला, आणि हिंदुस्थानाची सफर करण्याचा बेत त्यानें सोडिला. या विख्यात कवीनें कांहीं कविता करून फैजउल्ला अंजू यास देण्याकरितां बरोबरच्या सोबत्यांस दिल्या, आणि आपण शिराजास परत गेला.

*शाहा इराणांतील प्रसिद्ध कवि हाफीज याम दरबारी बोलाविती.*

*त्याचें न येण्याचें कारण.*

फैजउल्लाच्या हातीं ही कविता पडतांच त्यानें ती शाहास वाचून दाखविली. तेणेंकरून शाहा फार खुष झाला, आणि म्हणाला कीं, माझ्या भेटीस येण्याच्या हेतूनें ज्यापेक्षां हाफीज निघाला होता, त्यापेक्षां उदार देणगी त्यास देणें भला भाग आहे. नंतर त्यानें महंमद मोशीदीन कलबुर्गे येथील एक मोठा मौलवी याजपाशीं १,००० होन देऊन हिंदुस्थानांतील चिजांत अति मातबर अशी एक चिज शिराज येथील हाफीज कवीकडे पाठविण्याकरितां खरेदी करण्यास सांगितलें, आणि ती त्यानें त्याजकडे पाठवून दिली.

महंमुदशाहा लहान होता तेव्हां त्यास रंगेल व छाकटे असे पोषाख आवडत होते. परंतु तक्तावर बसल्यापासून तो अगदीं नेहमी साधा

पोषारव करीत असे. तो वरचेवर असें म्हणे कीं, सुलतान हा केवळ दौलतीचा रखवालदार किंवा जिमेदार आहे. म्हणून वाजवीपेक्षां फाजील खर्च करणें म्हणजे इतबार घालविणें आहे. याच्या कारकीर्दीत मोठा दुष्काळ पडला. तेव्हां त्यानें माळवा व गुजराथ येथून धान्य आणण्याकरितां १०,००० बैल ठेवून धान्य आणविलें, आणि तें धान्य लोकांस स्वस्त दरानें विकलें. कुलबुर्गा, बेदर, कंदाहार, एलिचपूर, दौलताबाद, चौल, दाभोळ आणि दुसऱ्या कांहीं शहरीं अनाथांकरितां भिक्षाग्रहें स्थापिलीं, आणि तीं सतत चालावीं म्हणून त्यांस मोठ्या नेमणुका करून दिल्या. तसेंच कुराण शिकविण्याकरितां पगार देऊन मोठ्या मौलवीस ठेविलें, आणि आपल्या सर्व राज्यांत आंधळ्या पांगळ्यांस दरमहा धर्मादाय देण्याची तजवीज ठेविली. **शेख शिराज उद्दीन** अवलियावर याचें फार लक्ष होतें. तो मरणोन्मुख झाला तेव्हां त्याच्या भेटीस शाहा गेला होता, आणि तो मेल्यावरही त्याच्या कबरीच्या दर्शनास वारंवार जाई. तेथें निमाज पढे, आणि जे मुंजावर व फकीर तेथें दर्शनास येत त्यांस भिक्षा घाली.

शाहाच्या मुलकी खात्यांत सुधारणा.

या शाहास लढाईपेक्षां शांतता आवडत असल्यामुळें, याची सर्व कारकीर्द लढाईशिवाय गेली. याच्या शहाणपणावरून दक्षणी मुसलमान त्यास "दक्षणेंतील अरिस्टाटल" असें म्हणत. यानें १९ वर्षे ९ महिने आणि २४ दिवस राज्य केलें, व त्या काळांत एकच बंड झालें, व तेंही थोड्या महिन्यांतच मोडलें. त्याची हकीकत खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

दौलताबाद येथील ब्राह्मण्या कुळांतील रहिवाशी **बहाउद्दीन दौलताबादी** यास सागरच्या किल्यावर सुभेदार नेमिलें होतें. त्याचे दोन पुत्र **महंमद** आणि **खाजा** यांवर शाहाची मर्जी व विश्वास पूर्ण बसला, व त्यांस लौकरच सरदाऱ्या मिळाल्या. पुढें त्यांचा अधिकार इतका वाढला कीं, तेणेंकरून त्यांच्या बरोबरीचे दुसरे सरदार त्याचा हेवा करूं लागले, व शाहापाशीं त्यांची निंदा करूं लागले. यामुळें शाहाच्या मनांत त्यांजविषयीं विकल्प आला. आतां आपला येथें बचाव होत नाहीं. अशी त्यांस भीति वाटून त्यांनीं बंड केलें, आणि आपल्या १,००० लोकांसहवर्तमान ते सागरास पळून गेले. मुलांच्या सांगण्यावरून बापही भरला, आणि तोही त्यांजबरोबर शाहावर उठला. हुजूरून जी फौज आली तिचा त्यानें दोन वेळ पराभव केला, आणि पुष्कळ लूट मिळविली.

सागर येथें बंड.

तिसऱ्या वेळीं महंमूदशाहानें **युसफ अजदीर तुर्क**+ या गुलाम कामगारास मोठी फौज देऊन त्यावर पाठविलें. सागर येथें जाऊन त्यानें किल्यास दोन वेळ वेढा दिला. या काळांत बंडवाल्यांनीं त्यांवर अनेक वेळां निकरानें हल्ले केले. एके दिवशीं तर वडील भाऊ महंमद यानें आपल्या ८०० शूर लोकांस घेऊन हुजूरच्या छावणीच्या पिच्छाडीवर हल्ला करून मोठा जय मिळविला. परंतु **कल्फारी** या कामगारानें त्याच्या हातास जखम केली. पण महंमदानें त्यास उलट जखम करून निर्बळ करून सोडिलें. यावेळीं जरी त्याचे लोक पळाले, तरी तो घोड्यावरून उतरला नाहीं. इतक्यांत त्याचा बाप **बहाउद्दीन** कुमकेस आला. तेव्हां रात्रपडेपर्यंत पुनः लढाई चालली, आणि अंधार पडला तेव्हां लढाई तहकूब करून त्यांस सुरक्षित मागें हटतां आलें. तथापि नेहमीच्या वहिवाटीस सोडून किल्याच्या बाहेर खंदकावर रात्रीं मुक्कामास राहिले, आणि कांहीं दगा होईल याची कांहीं त्यांनीं फिकीर बाळगिली नाहीं. किल्यांतील फौजेपैकीं जे लोक हुजूरच्या फौजेस सामील होते, त्यांपैकीं कांहीं लोकांनीं ही संधि साधून **युसफ अजदीर** यास ही बातमी पोहोंचविली; आणि **बाहाउद्दीन** या बंडवाल्यांस ठार मारून हुजूरच्या लोकांस दिंडीनें किल्यांत घेतों, असें त्यांनीं सांगितलें. **युसफ तुर्कानें**ही नोकरी करण्यास जे खुषी होते, त्यांस किल्यांत पाठविलें आणि आंतील लोकांनीं बहाउद्दिनाचें डोकें त्यांच्या स्वाधीन केल्यास किल्यावर चढून किल्ला ताब्यांत घ्यावा. नाहींपेक्षां परत छावणींत यावें, असा त्यांस हुकूम दिला. ठरल्यावेळीं व ठरल्या ठिकाणीं आंतील टोळीनें सुभेदाराचें डोकें फेकून दिलें. तेव्हां हुजूरच्या लोकांनीं किल्यांत शिरून किल्ला सर केला. त्याचसमयीं पूर्वी ठरल्या प्रमाणें आंतून इशारत होतांच बाहेर असलेल्या हुजूरच्या फौजेनें दोघां भावांवर हल्ला केला. तेव्हां ते जिवाची आशा सोडून लढले; परंतु अखेर पडले. महंमूदशाहा-

युसफ अजदीर नें बंड मोडिलें.

+ मूळ फारशींत गुलाम ई तुर्क म्हणजे विकत घेतलेला तुर्क असा आहे. परंतु मुसलमानांमध्यें हे गुलाम अति उच्च पदवीस नेहमी चढलेले आहेत, आणि कित्येक वेळां त्यांनीं नवीं तख्तेंही स्थापन केलीं आहेत.

च्या कारकीर्दींत शिक्षा करण्यासाठीं एवढी एकवारच म्यानांतून तरवार काढावी लागली.

हा जय मिळाल्यावर थोड्याच दिवसांनीं हिजरी सन ७९९ रज्जबच्या २१ व्या तारखेस कुजकट हवेपासून उत्पन्न झालेल्या तापानें महंमूदशाहा मरण पावला. यानें १९ वर्षें ९ महिने आणि २४ दिवस राज्य केलें. याच्या दुसऱ्याच दिवशीं **मलिक सैफ उद्दिन घोरी** हा बाहामिनी (ब्राम्हणी) घराण्याचा इमानी नोकरही मरण पावला. याचें या वेळीं १०७ वर्षांचें वय होतें. **व** यानें आपलें सर्व आयुष्य बाहामिनी शाहांच्या सेवेंत घालविलें. शाहाच्या इच्छेनुरूप **अल्लाउद्दिन हसन कांगो**ची कबर ज्या चौकांत होती त्याच पटांगणांत शाहाचेंही दफन केलें, व कबरेवर एक मोठी शिळा लाविली. तिजवर असें लिहिलें आहे कीं, “महंमूदशाहा कुराणांत सांगितल्याप्रमाणें अक्षरशः धर्म पाळीत असे. त्याबाहेर अणुरेणु सुध्दां आपण जात नसे. व दुसऱ्यांसही जाऊं देत नसे. यामुळें काजी लोकांस फार सावधगिरीनें राहून धर्मबाह्य आचरण घडल्यास त्याची चौकशी करावी लागे.” एके दिवशीं एका औरतेस जारकर्माच्या आरोपावरून काजीपुढें शिक्षा करण्यास आणिलें. तेव्हां हा गुन्हा कां केलास अशा विषयीं तिला विचारितांच तिनें उत्तर दिलें कीं, काजीसाहेब, हा गुन्हा असून धर्माविरुद्ध गोष्ट आहे असें कसें समजावें. ज्या प्रमाणें एक पुरुष चार बायकांशीं रत होतो. त्याच प्रमाणें एका स्त्रीनें चार नवऱ्यांशीं कां रत होऊंनये? जर माझी मी चुकलें असलें तर मला त्याबद्दल वाईट वाटतें, व पुनः असा गुन्हा करणार नाहीं. तेव्हां काजी गोंधळांत पडला. आणि असें पुनः न करण्याविषयीं फक्त ताकीद करून तिला सोडून देणें काजीस भाग पडलें. महंमूदशाहानें १९ वर्षें ९ महिने आणि २४ दिवस राज्य केलें याच्या मरणामुळें लोक फार हळहळले.

महंमूदशाहाचा मृत्यु. हिजरी सन ७९९ छ. २१ रज्जब. तारीख २० एप्रिलसन १३९७.

---

# घैसासउद्दीनशाहा बाहामिनी.

सन १३९७ इसवी.

घैसास उद्दीन तक्तावर बसतो —— लालचीन आपणास दिवाणगिरी मिळाली नाहीं म्हणून तो नाखुष होतो.—त्याच्या कन्येवर शाहाची प्रीति बसते —— लालचीन शाहास आपल्या घरीं मेजवानीस बोलाविते —— त्याचे डोळे काढितो —— त्यास पदच्युत करून सागरच्या किल्यांत कैदेंत ठेवितो.

---

महंमूदशाहा या सद्गुणी व न्यायी पादशाहाच्या मरणानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र **घैसास उद्दीन** तक्तावर बसला. याचें वय यावेळीं १७ वर्षांचें होतें. बापाच्या वहिवाटीप्रमाणें दरबारच्या सर्व कामगारांशीं हा मोठ्या प्रेमानें वागूं लागला. तसेंच बाहामिनी घराण्याचे पुरस्कर्ते व जुने नोकर यांवरही कृपा करून त्यांस बक्षिसें व इनामें त्यानें दिलीं. याच समयीं **सफदरखान शिस्तानी** वारल्याची बातमी आली. तेव्हां त्याचा मुलगा **सलाबतखान** यास **मुजालिस अली** हा किताब देऊन आणि बापाचा सर्व सरंजाम व कामें हीं त्यास देऊन वऱ्हाडच्या सुभेदारीवर पाठविलें. **अझीम हुमायुनाचा** पुत्र जो **महंमदखान** त्याचा पेशवा+ **अहंमद बेग काझविनी** यास शाहानें **मीरनौबत** हा किताब दिला, व त्यावर शाहाची फार मर्जी बसली. येणें करून **लालचिनास** फार वाईट वाटून तो त्याचा हेवा करूं लागला. महंमूदशाहाच्या गुलामांपैकीं **लालचीन** हा एक तुर्की गुलाम होता, व त्याचें वजन दरबारीं फार असे. आपल्यास वजिरी मिळावी व आपला मुलगा **हसनखान** यास **मीरनौबत** हा किताब मिळावा, अशी त्याची इच्छा होती. या विषयीं त्याची निराशा झाली, तेव्हां त्यानें शाहास आपली

घैसास उद्दीन तक्तावर बसतो.

+ मुख्य प्रधानास पेशवा हा फारसी किताब देण्याची चाल याच राज्यांत सुरू झाली. अहंमदनगरचे राजेही आपल्या प्रधानास पेशवा हा किताब पुढें देत असत. व त्यांजपासूनच सातारच्या राज्यांनीं हा किताब आपल्या राज्यांत सुरू केला.

नाखुषी दर्शविली. त्यासमयीं शाहानें त्याची निर्भर्त्सना करून लालचिनाच्या समक्ष अनेक वेळां असें प्रतिपादन केलें कीं; जे खुद्द पैगंबराच्या अवलादीचे आहेत अशा मोठ्या घराण्यांतील लोकांस सोडून गुलामास मोठ्या कामावर नेमणें म्हणजे मोठें गैर आहे; आणि या आपल्या पूर्वजांच्या चालीस सोडून जर माझें कधीं वर्तन घडलें असेल, तर त्याचें मला फार वाईट वाटतें.

लालचीन नाखुष होतो.

हे शाहाचे शब्दबाण लालचिनानें मनांत ठेवून शाहाचा सूड घेण्याविषयीं गुप्तपणें मसलत आरंभिली. परंतु आपला जो पाणउतारा झाला, त्याचा त्यानें बाह्यात्कारी खेद दाखविला नाहीं. लालचिनाची एक कन्या फार सुंदर होती. ती मोठी चतुर असून उत्तम गाणारी होती. तिच्यावर शाहाचें प्रेम बसलें; आणि त्यानें तिजबद्दल लालचिनापाशीं बोलणें काढिलें. शाहाची तिजवर प्रीति बसली आहे असें पाहून शाहास आपल्या घरीं मेजवानीस बोलाविलें. तेव्हां शाहास वाटलें कीं; या प्रसंगीं लालचीन आपली कन्या नजर करील. लालचिनानें शाहास मोठ्या थाटाची मेजवानी करून आणि दारूही पुष्कळ प्यावयास देऊन त्यास तल्लिन केलें. नंतर आपल्या नोकरांस एकीकडे काढावयास शाहास त्यानें विनंति केली, आणि अशा खाणाखुणा केल्या कीं; तेणेंकरून शाहास आपला हेतु साध्य होतो अशी आशा दिसली. गुलामाची उत्तम कन्या मिळावी; याविषयीं त्याची फार उत्कंठा होती, आणि दारूच्या भरांत अगदीं गुंग झाला असल्यामुळें शाहानें वेडेपणानें आपल्या नोकरांस खोलींतून जाण्यास आज्ञा दिली. नंतर दारू घेऊन एका खोजास मात्र तेथें ठेविलें, आणि लालचीन जनानखान्याकडे गेला, आणि तेथून कांहीं वेळानें नागवी कटार घेऊन परत आला. शाहा जरी अगदीं दारूनें गुंग झाला होता, तरी त्याच्याशीं त्यानें बरीच झोंबाझोंबी केली. परंतु त्यास चांगलें चालतां न येऊन झिंटी जाऊं लागल्यामुळें तो जिन्यावरून खालीं पडला. तेव्हां खोजाच्या सहाय्यानें शाहाच्या केसस्यास धरून त्यास पाठीवर पाडिलें आणि लालचीनानें कटारीच्या टोंकानें त्याचे दोन्ही डोळे फोडले.

लालचिनाच्या कन्येवर शाहाचीप्रीति बसते.

लालचीन शाहास आपल्या घरीं मेजवानीस बोलाविती.

तो शाहाचे डोळे काढितो.

नंतर जगू काय शाहाच्या हुकुमानें एकेका शाहाच्या हुजऱ्यास आंत बोलावून त्यांस ठार केलें; या प्रमाणें २४ असामीस मारिलें यांपैकीं ब-ऱ्याच मोठ्या दर्जाचे लोक होते; यामुळें या मारेकऱ्यांच्या बेतास कोणालाही अडथळा करितां आला नाहीं. नंतर माजी शाहाचा भाऊ शमसुद्दिन यास तक्तावर बसवून घैसासउद्दिनास सागरच्या किल्यावर कैद भोगण्यास लालचिनानें पाठविलें. घैसास उद्दिनानें सारें १ महिना २० दिवस राज्य केल्यावर हिजरी सन ७९९ रमजान तारीख १८ या दिवशीं हा दुर्घट प्रसंग त्याजवर आला.

शाहास सागरच्या किल्यावर कैदेंत ठेविलें. तारीख १ जून १३९७.

---

# शमसुद्दीनशाहा बाहामिनी.

## इसवी सन १३९७.

लालचीन शमसुद्दिनास तक्तावर बसवितो —— त्याचे चुलत भाऊ फेरोजखान आणि अहंमदखान यांचे त्याच्या विरुद्ध बेत —— ते सागरास पळून जातात, आणि फौज जमवितात. —— ते राजधानीवर हल्ला करितात. —— आणि त्यांचा पराभव होतो — फिरून ते सागरास जातात —— आपली तकशीर माफ करण्याविषयीं ते अर्ज करितात —— व शाहा माफ करितो —— त्यांस दरबारीं येण्यास परवानगी मिळते— त्या दोघां भावांस राजधानींत लोक सामील होतात — ते शाहास धरून त्याचे डोळे फोडतात —— लालचिनास धरून ते घैसासउद्दिनाच्या स्वाधीन करितात. —— आणि घैसास उद्दिन त्यास आपल्या हातानें ठार मारितो.

---

शमसुद्दीनशाहा तक्तावर बसला तेव्हां त्याचें वय १५ वर्षांचें होतें. माजी शाहाची दशा काय झाली. हें मनांत आणून शाहा हा किताब मिळाला एवढ्यानेंच तो तृप्त होता. लालचिनास मलिक नाईब हा कि-

+ या हुद्यानें पूर्ण अधिकार दिल्यासारखें होत असे, व त्याचा अर्थ हल्लींच्या इंग्रजींतील रीजंट या सारखा होता.

ताब मिळून तो सर्व राज्यकारभार मुखत्यारीनें करूं लागला. जे सरदार वांचले होते, त्यांनीं शरण जाण्याशिवाय बचावाचा मार्ग-च नाहीं, असें पाहून लालचिनाचा अधिकार मान्य केला. शाहाची आई ही मूळची गुलामच होती. तिला आपल्या मुलाचा जीव कसा वांचतो याची मोठी काळजी पडल्यामुळें तिनें लालचिनाची फार्च अदबीनें तबियत राखिली. तिनें आपल्या मुलास असा उपदेश केला कीं, वजिराच्या धाडसामुळेंच तक्त मास झालें आहे. तेव्हां तो सांगेल त्याप्रमाणेंच वागत जा. आणि आपल्या पुरस्कर्त्याविरुद्ध जे कोणी कांहीं सल्ला देतील तें ऐकूं नको. लालचीनही आपल्याकडून राणीशीं मोठ्या अदबीनें वागे. तिला वारंवार मोठ्या मौल्यवान् नजरा पाठवी, आणि तिचा आपणावर विश्वास बसावा व तिची कृपा असावी अशाबद्दल हरतऱ्हेचे यत्न करीत असे.

लालचीन शमसुद्दिनास तक्तावर बसवितो.

दाऊदशाहा बाहामिनीचे मागें तीन पुत्र होते. **महंमदसंजर** यास शाहाजादी **रूपवर आघा** हिच्या हुकुमानें मागें सांगितल्या प्रमाणें अंध केलें होतें. **फेरोजखान** आणि **अहंमदखान** हे शेवटले दोघे एकाच आईबापांच्या पोटचे होते. यांचा बाप मेला तेव्हां हे ६।७ वर्षांचे होते. त्यांचा चुलता **महंमूदशाहा** यानें त्यांवर बापाप्रमाणें ममता करून त्यांच्या दर्ज्यास योग्य असें शिक्षण त्यांस दिलें होतें. त्यांस शिकविण्यास **मीर फैर अल्ला शिराजी** यास नेमून सर्व प्रतीचें लष्करी शिक्षण त्याजकडून त्या उभयतांस देवविलें होतें. त्यावेळीं महंमूदशाहास पुत्र नव्हता, म्हणून आपल्या दोहों कन्यांचें दोघांशीं लग्न केलें होतें, आणि विनोदानें कधीं कधीं म्हणे कीं, **फेरोजखानानें** माझ्या मागून तक्तावर बसावें. पुष्कळ वेळां **फेरोजखानास** आपल्या जवळ घेऊन तक्तावर बसे, आणि म्हणे कीं, बाहामिनी घराण्यापैकीं तक्तावर बसण्यास फेरोजखाना इतका कोणी लायख नाहीं, व याच्या इतकी तक्तास कोणी शोभाही आणणार नाहीं. पुढें महंमुदास अल्लाच्या कृपेनें पुत्र झाले. तेव्हां **घैसासउद्दीन** या वडील पुत्रास मागें वारस ठरवून **फेरोजखान** आणि **अहंमदखान** यांस शपथ घालून सांगितलें कीं, तुम्ही त्याच्याशीं राजनिष्ठपणानें त्याच्या आज्ञेंत वागावें. त्या प्र-

माणें त्यांनीं त्याची नम्रतेनें व इमानानें सेवा केली. घैसासउद्दिनास लालचिनानें पदच्युत करून अंध केलें. तेव्हां त्याच्या वडील बहिणीनीं आपल्या नवऱ्यांस त्याच्या वधाचा सूड घेण्यास चेतवून दिलें. लालचिनास त्यांच्या बेताची गुणगुण कळतांच शाहापाशीं त्यांजबद्दल कागाळी केली, व राजद्रोहाबद्दल ते अपराधी आहेत, असें सांगितलें. यांत त्याचा हेतु असा होता कीं, येणेंकरून शाहाच्या मनांत भीति उत्पन्न होऊन त्यांस मारण्याचा हुकूम शाहानें द्यावा. परंतु यानें कितीही त्यांची नालस्ती केली तरी शमसुद्दीन मुळींच मनावर घेईना. तेव्हां लालचिनानें हें सर्व प्रकरण राणीपुढें ठेविलें, आणि तिला सांगितलें कीं: जर या दोघां भावांचा नाश न झाला तर ते तुझ्या मुलास पदच्युत करितील, आणि तुलाही मोठ्या दुःखांत व संकटांत घालतील. कारण मजवर तुझी प्रीति आहे अशा त्यांस अंदेशा आला आहे. मुलापेक्षां या सांगण्याचा राणीवर जास्त परिणाम झाला, आणि शेवटीं त्या दोघां भावांस कैद करण्याविषयीं तिनें रुकार दिला; परंतु याची बातमी त्यांस लागली, आणि ते कलबुर्ग्याहून सागर किल्यावर पळून गेले.

फेरोजखान आणि अहंमद खान यांचे त्याच्या गव्याविरुद्ध बेत.

ते सागरास पळून जातात.

बाहामिनी घराण्यांतील सुद्दु या नांवाचा गुलाम सागर किल्यावर सुभेदार होता. तो मोठा संपत्तिमान व जबरदस्त होता. त्यानें मोठ्या आनंदानें त्या दोघां शाहाजाद्यांस आश्रय दिला, आणि त्यांजवर आपली पूर्ण भक्ति आहे, असें दर्शविण्यास कोणत्याही रीतीनें कमी केलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं अहंमदशाहा आणि फेरोजशाहा या उभयतांनीं शमसुद्दीनशाहास पत्र पाठविलें व त्याचप्रमाणें मुख्य सरदारांसही पत्रें पाठविलीं. आणि त्यांस असें कळविलें कीं, लालचिनानें माजी शाहाशीं दगलबाजी केली व दुसरे अशा तऱ्हेचे असंख्य गुन्हे केले आहेत कीं; त्यानें बादशाही खानदानीस कालिमा आणिला आहे. या करितां त्यास राज्यांतून घालवावें एवढाच आमचा बेत होता. म्हणून आमची अशी विनंति आहे कीं, त्यास शिक्षा करावी म्हणजे आम्हीं शमसुद्दिनास शरण येऊन त्याच्या ताबेदारींत राहण्याचें कबूल करितों; आणि हा हेतु सिद्धीस जाईपर्यंत त्याचा

नाश करण्यास आपल्या-हातून होईल तो उपाय करण्यास आम्ही सोडणार नाहीं.

**शमसुद्दीनशाहानें** आपली आई आणि **लालचीन** यांच्या सल्यानें त्यास जें परत उत्तर पाठविलें त्यानें ते शाहाजादे अधिक चिडले; सागरच्या सुभेदाराच्या मदतीनें त्यांनीं ३००० स्वार आणि पायदळ जमविलें, आणि राजधानीकडे कूच केलें. कारण त्यांस अशी खात्री वाटली होती कीं, राजधानीकडे जातांना मार्गांत आपल्यास दुसरी फौज येऊन मिळेल. परंतु यांत त्यांची निराशा झाली. तरी त्यांनीं **भिमेच्या** कांठीं कांहीं दिवस छावणी दिली. तरी त्यांस कोणी महत्वाचा सरदार येऊन मिळाला नाहीं. तथापि सर्वानुमतें असें ठरलें कीं, फेरोजखानाच्या मस्तकावर बादशाही छत्र धरून पुढें निघावें. याच समयीं त्याचा भाऊ **अहंमदखान** यास **अमीर उल् उमराव** हा किताब दिला. **सुहूस मीरनौबत** हा किताब दिला आणि **मीर फैज उल्ला अंजूस** वजिरीचें काम दिलें. या प्रमाणें दरबारी थाट सजवून पुढें कूच केलें, आणि राजधानीपासून ४ कोसांवर जाऊन पोंचले. तेव्हां फौजेंतील शिपाई व कामगार यांस पुष्कळ द्रव्य वांटून लालचीन हा शमसुद्दिनशाहासहवर्तमान त्यांजबरोबर लढाई करण्याकरितां निघाला. मेर्कोलि शहरच्या नजीक मोठी लढाई झाली, आणि तिजमध्यें दोघां भावांचा पराभव होऊन त्यांस सागर किल्यांत आपल्या लोकांसह पळून जावें लागलें. शेवटीं लालचीन आणि शाहाची आई यांचा अधिकार इतका वाढला, व ते अशा बेपर्वाईनें व गुर्मीनें वागूं लागले कीं दरबारच्या पुष्कळ कामगारांनीं त्या दोघां भावांस आपण सहाय्य देतों, असा गुप्तपणें निरोप पाठविला. आणि अशी सल्ला दिली कीं, कशाही रीतीनें **शमसुद्दीनशाहाची** माफी मिळवून कलबुर्ग्यास यावें. म्हणजे तेथें तुमचें बेत सिद्धीस नेण्याकरितां स्वस्थपणानें मसलत करितां येईल.

ते सैन्य जमवितात, व राजधानीकडे कूच करितात.

लढाई होते, व तीत दोघां भावांचा पराभव होऊन ते सागरास पळून जातात.

या त्यांच्या इमानावर विश्वास ठेवून **फेराजखानानें मीर फैज उल्ला अंजू** आणि **सय्यद कमाल उद्दीन** व दुसरे कांहीं संभावी-

न लोक यांस राणी व लालचीन यांजकडे पाठवून असा अर्ज केला कीं, आपल्या जिवास कांहीं अपाय होईल या भीतीनेंच केवळ आम्हीं बंड केलें होतें. परंतु त्याचा आतां आम्हांस मनःपूर्वक पश्चात्ताप झाला आहे. आणि जर शाहा आम्हांस माफीचें पत्र पाठवील तर आम्ही हुजूर येऊन सेवेस हजर होऊं. लालचीन आणि राणी यांस हें त्यांचें म्हणणें ऐकून फार आनंद झाला; आणि त्यांनीं मागितल्याप्रमाणें माफीचें पत्र पाठविलें, व त्यांत माफी केल्याबद्दल त्यांची खात्री होण्याकरितां पुष्कळ तोंडदेखणा व खुशामतीचा मजकूर मोठ्या गौरवानें लिहिला.

ते आपणास क्षमा होण्याबद्दल अर्ज करितात. व त्यांस दरबारीं येण्यास परवानगी मिळते.

हें पत्र पोंहोंचल्यावर थोड्याच दिवसांनीं दोघे भाऊ गद्दीवर बसून कलबुर्ग्यास जाण्याचें साहस करावें किंवा नाहीं, याचा विचार करीत असतां खालून रस्त्यानें एक काश्मीरचा वेडा फकीर जात होता तो मोठ्यानें ओरडला." अरे फेरोज तुझें नशीब चांगलें आहे. कलबुर्ग्यास तुला तक्तावर नेऊन बसविण्याकरितां मी आलों आहें" हा मोठा शुभ शकुन आहे असें समजून ते लागलेच कलबुर्ग्यास निघाले. तेथें शाहानें त्यांचा सत्कार करून त्यांस पोषाख व देणग्या दिल्या. परंतु लालचीन आणि फेरोजखान या उभयतांस परस्परांचा अंदेशा आला, आणि ते मोठ्या सावधगिरीनें राहूं लागले.

ते राजधानीस येतात.

कलबुर्ग्यास आल्यावर सुमारें १५ दिवसांनीं गुरुवारीं हिजरी सन ८०० माहे सफ्फर चंद्र २२ (तारीख १५ नोव्हेंबर सन १३९७ इ०) रोजीं फेरोजखान आपल्या विश्वासाचे असे १२ सरदारबरोबर घेऊन दरबारांत आला, आणि दुसऱ्या आपल्या ३०० लोकांस किल्ल्यांत एक दोन, एक दोन या प्रमाणें घेतलें. नंतर त्यानें आपला भाऊ अहंमदखान यास बोलावणें पाठविलें आणि तो आल्यावर त्यानें लालचिनास सांगितलें कीं, आमचे कांहीं आप्त आपल्या मुलखांतून शाहाच्या भेटीस आले आहेत, यास्तव मी बोलवीन त्यांस किल्ल्यांत घेण्याविषयीं पाहरेकऱ्यांस हुकूम व्हावा अशी माझी विनंति आहे.

तारीख १५ नोव्हेंबर सन १३९७ इ.

या प्रमाणें लालचिनास फेरोजखानानें आपल्याशीं बोलण्यांत गुंतविलें, आणि त्याचा भाऊ आपल्या आप्तांस शाहाच्या भेटीस आणण्याच्या निमित्तानें बाहेर गेला, परंतु एकदम १२ लोकांस घेऊन किल्यांत शिरूं लागला. तेव्हां त्यांस पाहारेकऱ्यांनीं अडविलें; त्यामुळें आपली सर्व मसलत उघडकीस आली, असें त्यांस वाटून जिवाची आशा न धरितां चौकीदारांवर हल्ला करण्याचा त्यानें निश्चय केला. पाहारेकऱ्यांस गारद करून अहमदखान आपल्या सर्व लोकांसह दरबारांत घुसला; तेव्हां लालचिनाच्या मुलाशिवाय कोणी त्यास प्रतिबंध केला नाहीं; आणि बाकीचे सर्व सरदार तत्क्षणीं पळाले. शमसुद्दीनशाहा आणि त्याचा वजीर हे एका भुयारांत जाऊन दडाले; आणि फेरोजखानाच्या ३०० साथीदारांनीं वाड्याच्या चौकांत जे लालचिनाचे लोक होते. त्यांवर हल्ला करून त्यांस किल्याबाहेर पिटून लाविलें. आणि या प्रमाणें त्यांनीं आपला बेत ठरल्याप्रमाणें तडीस नेला.

नंतर फेरोजखानानें शाहा आणि लालचीन यांस आणून बिड्या घातल्या. आणि ज्या भुयारांत ते आश्रय घेण्याकरितां दडाले होते, त्याच ठिकाणीं त्यांस कैदेंत ठेविलें; आणि सरदारांस बोलावून कचेरीच्या दिवाणखान्यांत गेला, आणि फेरोज नांवाच्या तक्तावर चढला. या प्रमाणें काश्मिरी वेड्या फकिराचें भविष्य खरें झालें. फेरोजशाहानें रोझे अफझून असा किताब धारण करून अल्लाउद्दीन हसन कांगोची तरवार त्यानें कंबरेस लटकाविली. या प्रमाणें आपला अधिकार स्थापन झाल्यावर माजी राजाचे डोळे काढून त्यास बेदरच्या किल्यावर कैदेंत ठेविलें, आणि त्याच वेळीं सागरच्या किल्यांत कैदेंत असलेल्या घैसासउद्दिनास आणिलें. नंतर तो जरी अगदीं अंध होता, तथापि लालचिनास त्याच्या पुढें ठेविलें. तेव्हां आपल्या तेग्याच्या एका घावानें त्यानें लालचिनास ठार केलें. घैसासउद्दिनानें मक्केच्या यात्रेस जाण्याची परवानगी मिळावी अशी फेरोजशाहापाशीं विनंति केली. ती शाहानें मान्य करून त्याची तयारी करून दिली. आणि तो चौलबंदरीं जाहाजांत बसून निघाला आणि तेथें जाऊन सुरक्षित पोंचला. तो मरेपर्यंत तेथेंच होता.

ते लालचीन आणि शाहा यांस धरून कैदेंत घालितात.

तो शाहाचे डोळे काढितो, व लालचिनास घैसासउद्दीनाच्या स्वाधीन करितो, व घैसासउद्दीन लालचिनास ठार मारितो.

त्याचें जीवमान असेपर्यंत फेरोजशाहानें त्यास ५,००० अश्रफी+ नेमणूक करून दिली होती, आणि या शिवाय दरमहा मौल्यवान कपडेही पाठवीत असे. शमसुद्दिनानें सारें ५ महिने ७ दिवस राज्य केलें.

---

# फेरोजशाहा बाहामिनी.*

सन १३९७ ते १४२२. इ॰

फैज उल्ला अंजू वजीर होतो —— विजयानगरचा राजा देवराय दक्षणेकडील मोंगलावर स्वारी करितो —— केरळचा नरसिंगराय वऱ्हाडावर स्वारी करितो —— शाहा दक्षिणेकडे जातो आणि विजयानगरच्या राजाचा पराभव करून लढाईच्या खर्चाकरितां ४,००,००,००० रुपये त्याजकडून घेतो —— नंतर शाहा उत्तरेकडे वऱ्हाड प्रांतीं जातो— केरळच्या राजाचा पराभव होतो —— शाहा तैमूरलंगाकडे वकील पाठवितो —— तैमूरलंग शाहास माळवा व गुजराथ हीं दोन्हीं राज्यें देतो —— माळवा व गुजराथयेथील राजे विजयानगरच्या राजाशीं गुप्त मसलत करितात —— विजयानगराशीं पुनः लढाई सुरू होते —— विजयानगरास पुनः मुसलमान वेढा घालितात.—आसपासचा मुलूख मुसलमान लुटून उध्वस्त करितात.—— बंकापुरचा किल्ला मुसलमान घेतात.—— विजया-नगरचा राजा फेरोजशाहास आपली कन्या देऊन त्याशीं तह करितो—— फेरोजशाहा पानगल घेतो—— पुनः लढाई सुरू होते —— मुसलमानांचें राज्य बुडण्याची वेळ येते—— इतक्यांत शाहाचा भाऊ अहंमद हिंदूंचा पराभव करितो —— फेरोजशाहा भ्रमिष्ट होतो —— त्याचें ढिलें व दुर्बल वर्तन— शाहाचा भाऊ अहंमद तक्त मिळविण्याचा बेत करितो —— तो बेत सिद्धीस नेण्याकरितां त्याचे यत्न.—— आणि अखेरीस त्याची फत्ते —— फेरोजशाहा बाहामिनीचा मृत्यु.

---

+ अश्रफी हें अर्वाचीन काळच्या मोहरेसारखें एक सोन्याचें नाणें होतें, व त्याची किंमत १५ पासून २० रुपये असे.

* याचा पूर्ण किताब असा आहे:- सुलतान अबुल मुजफर, गाझी फेरोजशाहा रोझे अबझून.

राज्याचें वैभव व स्वभाव.

पूर्वी होऊन गेलेल्या शाहांहून फेरोजशाहाचा अधिकार व थाट फार होता, आणि याच्या कारकीर्दीत बाहामिनीशाहाचें घराणें वैभवाच्या कळसास पोंचलें. हिंदुलोकांच्या मुलींचीं लग्नें हिंदूंशींच करण्याची जरी चाल आहे, तरी विजयानगरच्या हिंदुराजास आपल्या कंन्येचें स्वतः आपल्याशीं लग्न करण्यास या शाहानें भाग पाडिलें. मुसलमानी धर्माचा प्रसार करण्यासही त्यानें पुष्कळ यत्न केले. यानें एकंदर २४ स्वाऱ्या करून आपल्या राज्याची मर्यादा पुष्कळ वाढविली. यानें बंकापुरचा किल्ला घेतला. तेलंगणच्या पुष्कळ भागावर मुसलमानी अम्मल बसविला. दक्षणच्या बादशाहांपैकीं यानेंच प्रथमतः रत्नजडित किरीट पागोट्यासारखा धारण केला. औदार्य हा एक राजेलोकांचा सद्गुण आहे. हा सद्गुण या शाहाच्या आंगीं फार होता व त्याचा त्यास अभिमान वाटत असे. तेणेंकरून त्याचा मोठा लौकिक झाला. धर्मविरुद्ध त्याचें आचरण कोणतेंही नव्हतें. फक्त दारू पीत असे, व गाणें ऐकण्याचा शोक होता. तो वरचेवर रोजे करी, आणि कुराणांत सांगितल्या प्रमाणें सर्व नियम कडक रीतीनें पाळीत असे, व सर्व संस्कार करीत असे. याला आपल्या या दोन वाईट खोडीं-बद्दल वारंवार पश्चात्ताप होई; परंतु असें म्हणे कीं, गाणें ऐकल्यानें अल्लाचें ध्यान करण्यास मनास मोठा उत्साह येऊन तें तल्लिन होतें; आणि विचारशक्ति बिघडण्याजोगी आपण दारू पीत नाहीं. तेव्हां सर्व दयाळू परमेश्वर त्याबद्दल आपणास माफी करील, अशी आशा आहे.

हा स्वभावतः फार स्त्रीलंपट होता. परंतु कुराणांत तर फक्त चार लग्नें करावीं असें लिहिलें आहे. तेव्हां धर्म न मोडतां आपली इच्छा तृप्त करण्यास कोणते उपाय योजावे, असें त्यानें काजीस विचारिलें. कित्येकांनीं सांगितलें कीं, एका स्त्रीशीं घटस्फोट करून दुसरीशीं लग्न करावें. परंतु हें त्यास रुचलें नाहीं. तेव्हां त्यानें आपला वजीर मीर फैज उल्ला अंजू यास याविषयीं सल्ला विचारिली. तेव्हां फैज उल्ला म्हणाला, पैगंबराच्या व पहिल्या खलीपाच्या वेळीं मोतिया म्हणजे क्षणिक लग्न करण्याची परवानगी होती. जरी ही चाल दुसऱ्या खलिपानें बंद केली तथापि शियाधर्माच्या मताप्रमाणें ही चाल अद्याप सशास्त्र आहे. सुनी लोकांनीं हें मत धर्मास सोडून आहे, अ-

सें प्रतिपादन केलें, आणि काजींमध्यें याबद्दल मोठी भवती नभवती झाली. प्रत्येक पक्षाच्या काजींनीं आपापल्या मतास बळकटी आणण्याकरितां कुराणावरील निरनिराळ्या टीका काढिल्या व अनेक आधार दाखविले. शेवटीं शिया लोकांचे विचार व मतें खरीं आहेत अशी शाहाची खात्री झाली. व त्यानें एके दिवशीं जनानखान्यांत ३,००० स्त्रिया घेतल्या.

**हाजी महंमद कंदाहारी** यानें असें लिहिलें आहे कीं, फेरोजशाह प्रत्येक चवथ्या दिवशीं कुराणाच्या १६ पृष्ठांची हातानें नक्कल करीत असे. व नंतर सरकारी काम करण्यास बसे. काजी, कवि, इतिहास

खाजगी मेळे व त्यांत याचें वर्तन.

वाचणारे, शाहानामा वाचणारे आणि मोठे विद्वान् व हुषार असे पदरचे दरबारी लोक यांच्या मंडळींत बसून रोज मध्यरात्रीपर्यंत काळ घालवी. या मंडळींत कोणत्याही तऱ्हेचा कोणास निर्बंध नसून शाहाही सर्वांशीं अगदीं मोकळ्या मनानें वागे. याविषयीं मंडळीस असें म्हणे कीं, मी तक्तावर सरकारी काम करण्यास बसतों, तेव्हां मी पादशाहा असतों; व त्यावेळीं लोकांच्या मनावर माझ्या मोठेपणाचा योग्य ग्रह होण्याकरितां मला डामडौल करावा लागतो, व राजचिन्हें धारण करावीं लागतात. कारण येणेंकरून माझ्या राज्याधिकारास जोर येतो. परंतु मी तुमच्या मंडळींत असलों, म्हणजे मी साधारण खासगी मनुष्याप्रमाणें आपणास समजतों. इतरांनीही माझी अदब वगैरे न ठेवितां मोकळेपणानें मजशीं वागावें, अशी माझी इच्छा असते. मंडळींतील कोणीही मर्जीस येईल तेव्हां यावें किंवा जावें. प्रत्येकानें हवा तो जिन्नस खावयास व प्यावयास मागावा, आणि दोन विषय सोडून हव्या त्या विषयावर मोकळ्या मनानें बोलावें, असें मंडळींतल्या लोकांस शाहाचें सांगणें असे. सरकारी कामकाज किंवा राजकीय गोष्टी आणि हजर नसलेल्या मनुष्यांची निंदा करणें, किंवा त्यांवर तोहमत करणें हे दोन विषय वर्ज करण्याविषयीं शाहाचें सांगणें असे.

**मुल्ला इसाक सरहिंदी** या महा चतुर व विद्वान मनुष्यानें एके दिवशीं शाहास म्हटलें कीं, मंडळी जमून आपण बसलों असतां आपली अदब वगैरे राखूनये असें म्हणतां ही गोष्ट दुसऱ्या सर्व शाहांच्या वहिवाटीस सोडून आहे. असें सांगून आपल्या म्हणण्याच्या पुष्टिकरणार्थ त्यानें **अमीर महंमद सबकटगीन** आणि **अनवेरी खान** हा प्रसि-

द्ध हकीम व ज्योतिषि या उभयतांमध्यें घडलेली एक गोष्ट सांगितली. ही गोष्ट ऐकून शाहा हंसला, आणि म्हणाला कीं, असें वर्तन केवळ न्यायशून्य किंवा नीतिशून्य राजाच्या हातूनच घडेल. मला वाटतें कीं, तो दुर्बलपणा माझ्या स्वभावांत नाहीं. जे शाहाच्या खाजगी मेळ्यांत वारंवार जात त्यांस तर पूर्ण अनुभव होता कीं, शाहा बोलल्याप्रमाणें चालतो, आणि त्याचें वर्तनही सर्वदां सर्वांशीं सारखें असतें.

सबक्‌टगीन आणि अनवेरी यांची गोष्ट अशी आहे. "अनवरी हा प्रसिद्ध ज्योतिषी त्या काळच्या अद्भुत रत्नांपैकीं एक रत्न होतें. हा मोठा विद्वान होता, व पादशाहा त्याशीं अगदीं अभिमान सोडून वागे. यामुळें त्यास भीड व मर्यादा सोडून वागण्याची बरीच मोकळीक होती. परंतु ती शेवटीं शाहास आवडेनाशी झाली. गिझनी येथील वाड्यांतील एका उंच इमारतीच्या गच्चीवर **सबक्‌टगीन** बसला असतां **अनवेरी** वेशींतून आंत आला. तेव्हां तूं कोणत्या वेशीनें बाहेर जाशील तें आतां सांग असें सांगितलें. तेव्हां वेध घेण्याचें यंत्र लावून आकाशांतील ताऱ्यांचा त्यानें वेध घेतला, व गणित करून कागदाच्या तुकड्यावर जें उत्तर आलें तें त्यानें लिहिलें व पादशाहानें तो कागद लोडाखालीं ठेविला. नंतर वाड्याच्या पूर्वेकडील तटाचा कांहीं भाग पाडून टाकण्यास हुकूम देऊन पादशाहा बाहेर गेला. नंतर कागद पाहतांच शाहानें जें केलें तें अनवेरीनें पूर्वी ताडलें होतें. याची शाहास प्रचीति आली. या प्रमाणें त्या तत्ववेत्त्यासच यश आलेलें पाहून **सबक्‌टगिनास** राग आला व त्या त्वेषांत त्यास वाड्याच्या गच्चीवरून खालीं फेकून देण्यास त्यानें हुकूम दिला. सुदैवानें खालीं एक जाळें होतें, त्यांत तो पडला, आणि कांहीं अपाय न होतां बचावला. तेव्हां शाहानें त्यास विचारिलें कीं, हें भविष्य तूं पूर्वी केलें होतेंस काय? तेव्हां लागलेंच आपलें पुस्तक आणून त्यांत लिहिलेलें दाखविलें." अमक्या दिवशीं उंच ठिकाणावरून खालीं पडेन व कांहीं इजा न होतां त्यांतून सुटेन?" येणेंकरून शाहास त्याचा अधिकच राग आला, आणि त्यास कैद करण्याचा हुकूम दिला. पुढें सहा महिन्यांनीं तो हकीम कैदेंत असतांच त्या हकिमाचा एक गुलाम बाजारांत जात असतां त्यास एका ज्योतिष्यानें सांगितलें कीं, तुझ्या चेहेऱ्यावर जे कांहीं शुभ शकून दिस-

अनवेरीची गोष्ट.

तात, त्यावरून तुला कांहीं लाभ होणार आहे, असें दिसतें. व अमुक पैसे देशील तर तो कोणता लाभ तें तुला सांगेन. गुलामानें त्यास मागितल्या प्रमाणें पैसे दिले. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, तुझा धनी प्रस्तुत विपत्तींत आहे त्याची थोडक्याच दिवसांत सुटका होऊन त्यास पोषाख मिळेल. गुलामानें पळत जाऊन आपल्या धन्यास ही हकीगत कळविली. तेव्हां तो त्यास त्याच्या भोळेपणाबद्दल व अशा वाईट लोकांच्या मंडळींत जाण्याबद्दल रागें भरला. या नंतर तीनच दिवसांनीं हसन मैमंदीशीं पादशाहा मुहूर्त जोतिषावर बोलत असतां मैमंदीनें संधि साधून दुर्दैवी **अनवेरीची** गोष्ट काढिली, आणि म्हणाला कीं, दोन आश्चर्य वाटण्याजोगीं भविष्यें त्यानें सांगितलीं. असें असून त्यास बक्षिसें व किताब मिळावयाचे ते एकीकडे राहून त्या बिचाऱ्याच्या नशिबीं दुःखदायक कैद भोगावयाचें आलें आहे. शाहानें उत्तर दिलें कीं, **अनवेरी** सारखा दुसरा विद्वान् विरळा आढळेल, हें खरें आहे. परंतु विद्वानास मनुष्य स्वभाव कसा असतो, याचेंही अधिक चांगलें ज्ञान असलें पाहिजे. कारण राजे लोक हे केवळ लहान मुलांप्रमाणें होत. त्यांस खुष करण्यास त्यांची खोटी स्तुति केली पाहिजे. असे उद्गार काढून **अनवेरीस** मुक्त करण्यास पादशाहानें हुकूम दिला. तुरुंगांतून दरबारीं जातांना वाटेंतच त्यास तो 'भविष्यवादी' भेटला. तेव्हां हकिमाशिवाय दुसरेही कधीं कधीं भविष्य सांगतात, ही गोष्ट मला कबूल केली पाहिजे, असें त्यानें त्यास सांगितलें. दरबारीं आल्यावर शाहानें अनवेरीचा मोठा सन्मान करून त्यास उंचा पोषाख, १,००० रुपये, एक घोडा व गुलाम दिला. आणि जें झालें त्याबद्दल शाहानें मोठी दिलगिरी दर्शविली, आणि सांगितलें कीं, "नेहमी शास्त्रांतील गोष्टींस अक्षरशः धरून न बसतां कधीं कधीं तर आम्हांस रुचेल असें बोलत जा."

शहाची विद्वत्ता.

दरसाल पृथ्वीवरील सर्व खंडांतून उत्कृष्ट व चमत्कारिक चिजा आणण्याकरितां आणि मुख्यत्वें प्रसिद्ध विद्वानांस आपल्या दरबारीं बोलावण्याकरितां गोंवें आणि चौल या दोन बंदरांहून फेरोजशाहा दरसाल जहाजें रवाना करीत असे. तो पुष्कळ वेळां असें म्हणे कीं, 'सर्व देशांतील विद्वान् लोक हेच उत्तम चिजा म्हणजे परकी देशांतील पैदा करण्याजोग्या उत्तम वस्तु होत. राजे लो-

कांनीं सर्व राष्ट्रांतील मोठ मोठ्या विद्वान् व गुणवान् अशा पुरुषांस आपल्याजवळ जमवावें. म्हणजे त्यांच्या संगतीनें पृथ्वीच्या दूरदूरच्या प्रदेशीं प्रवास केल्यानें जी माहिती मिळावयाची ती मिळेल, व जे लाभ व्हावयाचे ते होतील! शाहाची स्मरणशक्ति इतकी उत्तम होती कीं, त्यास पुष्कळ भाषा बोलतां येत होत्या. आणि परदेशीय लोकांशीं साधेल तितकें त्यांच्या भाषेंत बोलण्याची तो वहिवाट ठेवी. एकदां एखादी गोष्ट कोणी सांगतांना त्यानें ऐकिली म्हणजे ती नेहमी त्याच्या ध्यानांत राही. तो चांगला कवि होता. पुष्कळ वेळां एखादा विषय घेऊन त्यावर कविता करी. अनेक शास्त्रांची त्यास चांगली माहिती होती. आणि मुख्यत्वें पदार्थविज्ञानशास्त्राची तर त्यास फारच आवड असे. शनिवारीं, सोमवारीं, आणि गुरुवारीं, पदार्थविज्ञानशास्त्र, भूमितिशास्त्र आणि तर्कशास्त्र यांवर व्याख्यानें ऐके. हीं व्याख्यानें ऐकण्यास तो बहुधा दिवसास बसे. परंतु दिवसास काम असलें तर रात्रीं बसे. असें म्हणतात कीं, विद्वत्तेमध्यें **महंमद तघलख** बादशाहाहूनही याची वरची पायरी होती.

दक्षणेंत याच शाहानें प्रथमतः अंजूच्या सय्यदघराण्याशीं शरीरसंबंध केले. आपला पुत्र **हसनखान** याचें त्या घराण्यांतील एका कन्येशीं लग्न केलें, आणि आपल्या कन्येचें **मीर शमसुद्दीन अहंमद अंजू** याशीं लग्न करून त्यास दौलताबादेच्या सुभेदारीवर नेमिलें.

**फेरोजशाहानें** भिमेच्या कांठीं एक शहर वसविलें, व त्यास **फेरोजाबाद** असें नांव दिलें. त्याचे रस्ते रुंद व सरळ असून लांब व नियमित असे ठेविले होते. नदीजवळच एक बालेकिल्ला बांधिला, आणि एकमेकांपासून अलग असे त्याचे अनेक सुंदर चौक केले होते. नदीचा कालवा आणून सर्वांमध्यें पाणी खेळविलें होतें. आपल्या मर्जीतल्या स्त्रियांना यांपैकीं एकेक चौक नेमून दिला होता, आणि स्त्रियांनीं नियमितपणानें व शिस्तीनें वागावें, म्हणून जनानखान्याकरितां नियम केले होते. आणि त्या नियमाप्रमाणें तो आजन्म चालत असे.

फेरोजाबाद व त्याचा जनानखाना.

जनानखान्यांत प्रत्येक बेगमेस ३ नोकरांहून जास्त नोकर देत नसे. बेगम ज्या जातीची व ज्या देशांतील असेल, त्याच जातीचे व त्याच देशांतील नोकर तिच्या दिमतीस ठेवी. आणि त्यांनीं ति-

च्याशीं तिच्या स्वभाषेंतच बोलावें असा नियम असे. कोणी स्त्री मेल्यामुळें किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें जनानरवान्यांत व तेथील नोकरांत ज्या जागा रिकाम्या पडत त्या भरण्याकरितां देशोदेशीं स्त्रिया विकत घेण्याकरितां व्यापाऱ्यांस रवाना करी. त्याच्या जनानरवान्यांत अरबस्थानांतल्या, सरक्याशिया देशांतल्या, जार्जिया देशांतल्या, तुर्कस्तान, रूस, आणि यूरोप या देशांतील स्त्रिया त्याच प्रमाणें चिनी, अफगाणी, रजपूत, गुजराथी, तेलंगी, मराठी आणि दुसऱ्या कांहीं अशा अनेक जातीच्या स्त्रिया होत्या. आणि शाहास प्रत्येकीशीं तिच्या स्वभाषेंत बोलतां येत असे. सर्वांवर असें सारखें लक्ष ठेवी कीं, प्रत्येक बेगमेस वाटत असे कीं, मीच कायती शाहाची अत्यंत लाडकी आहें. ख्रिस्तीलोकांच्या बायबलांतील जुना व नवा करार तो वाचीत असे. व सर्व धर्मांच्या मतांस मान देत असे. परक्या लोकांच्या दृष्टीस पडूंनये म्हणून स्त्रियांस कोंडून ठेवणें व दारू पिणें या दोन आज्ञांमुळें इतर धर्मींहून महंमदी धर्म त्यास चांगला वाटत असे.

फेरोजशाहा तक्तावर बसला तेव्हां त्यानें आपला भाऊ **अहंमदरवान** यास **रवानरवनान** हा किताब दिला. आणि आपला शिक्षक **मीर फैज उल्ला अंजू** यास **मलिकनाईब** हा किताब देऊन **वकील अल् सुलतनत** या कामावर नेमिलें बाहामिनी घराण्यांतील दुसऱ्या कित्येक पुरुषांसही किताब दिले. हिंदूंवर यानें एकंदर २४ स्वाऱ्या केल्या, याविषयीं सर्व इतिहासकारांची एकवाक्यता आहे. परंतु त्यांपैकीं फक्त कांहीं स्वाऱ्यांचें मात्र **अल्ला दाऊद बिदरी** यानें आपल्या **तोहफत उसलातीन** या ग्रंथांत वर्णन केलें आहे.

हिजरीसन ८०१ (इसवी सन १३९७) यावर्षीं विजयानगरच्या देवरायानें ३०,००० स्वार व पुष्कळ पायदळ घेऊन **दोआब**+ प्रांतावर स्वारी केली, आणि **मुदकल** व **रायचूर** हे किल्ले घेण्याचा यत्न केला. **फेरोजशाहास** ही खबर कळतांच तो कलबुर्ग्याहून सागरास गेला. आणि तेथें जाऊन त्यानें आपल्या सैन्याची पाहणी केली. येथें असतां एका जमेदारास आणि ७।८ हजार हिंदूंस त्यानें ठार मारिलें.

---

+ कृष्णा आणि तुंगभद्रा या दोन नद्यांमधील मुलूख.

कारण ते फार दिवसपर्यंत शिरजोर होऊन शरण आले नव्हते. इतक्यांत दौलताबाद आणि वऱ्हाड येथील फौजा घेऊन सागरापाशीं त्यास मिळाल्या. तेव्हां तो देवरायाच्या तोंडावर कूच करण्याच्या बेतांत होता. इतक्यांत त्यास असें वर्तमान आलें कीं, मांडु आणि आसीर येथील राजांच्या फुशीवरून आणि विजयानगरच्या राजाच्या सल्यानें केरळचा राजा नरशिंगराय यानें वऱ्हाडप्रांतावर स्वारी करून थेट माहूर शहरच्या तटापर्यंत मुसलमानांचा मुलूख फार उध्वस्त केला. ही खबर पोंहोंचतांच शाहानें नरसिंगरायास मागें हटविण्याकरितां दौलताबादच्या फौजेस परत पाठविलें, आणि बाकीची फौज घेऊन शाहा देवरायावर गेला. त्यावेळीं पर्जन्यकाळ होता, व कृष्णेस पूर आला होता.

विजयानगरचा राजा देवराय दोआब प्रांतावर स्वारी करितो. इसवीसन १३९७.

शाहा देवरायावर जातो.

म्हणून देवरायानें आपली छावणी दक्षिण किनाऱ्यावर देऊन मुसलमानांस नदी उतरतां येऊं नये म्हणून नदी किनाऱ्यावर पुष्कळ पायदळ ठेविलें होतें. नदीजवळ येऊन पोहोंचल्यावर फेरोजशाहानें कचेरी भरवून कोणत्या रीतीनें लढाई करावी, याविषयीं सर्वांस मसलत विचारिली. परंतु कोणत्याही तऱ्हेचा योग्य सल्ला दरबारी लोकांकडून मिळाला नाहीं. आतां पुढें कशी तजवीज करावी याविषयीं विचार करीत असतां कोणी काजी सिराज या नांवाच्या मुसलमानानें शाहास असें सांगितलें कीं, शाहाचा हुकूम होईल तर कांहीं निवडक लोक जे खुषीनें येण्यास तयार होतील त्यांस घेऊन मी नदी उतरेन व साधेल त्या प्रमाणें देवराय किंवा त्याचा मुलगा या दोहोंपैकीं एकाचा तरी वध करीन. नंतर हें काम फत्ते झाल्याची सूचना दिली म्हणजे या वधामुळें शत्रुच्या सैन्यांत जी धांदल उडेल त्या धांदलींत शाहानें फौजेची एक टोळी पाठवून सर्व सैन्य उतरण्यास उताराची जागा ताब्यांत घ्यावी.

फेरोजशाहास हा बेत पसंत पडून या लोकांस नदींतून उतरण्याकरितां कातड्यांनीं मढविलेल्या अशा शेंकडों बुरुड्यां जलदीनें तयार क-

---

\+ माळवा आणि खानदेश या प्रांतांतील मुसलमान राजे.

* यावेळीं हिंदुस्थानांत याच प्रकारच्या बुरडी छोट्या नांवाचा (पुढें चालू.)

रचिल्या. काजी शिराज आणि त्याचे ७ स्नेही जोग्यांचीं सोंगें घेऊन देवरायाच्या छावणींत गेले. आणि जेथें कलावंतिणींचा ताफा उतरला होता त्या ठिकाणीं जाऊन एका कलावंतिणीशीं अति तल्लिन झाल्यासारखें दाखवून आपल्या जोग्यांच्या वेषास साधणाऱ्या अमर्यादेच्या गोष्टीही त्यानें केल्या. सायंकाळीं ती कलावंतीण आपला उंच पोषाख घालून बाहेर निघाली. अगदीं रत झालेला मनुष्य जसा कावराबावरा होऊन जातो, तसा कावराबावरा होऊन तिच्यापुढें काजीनें लोळण घेतली आणि तिला बाहेर न जाण्याविषयीं त्यानें विनंति केली. शेवटीं आपल्या बरोबर तरी घेऊन जा, आणि तुझ्या वियोगाचें दुःसह दुःख देऊं नको, असें त्यानें तिला सांगितलें. तेव्हां कलावंतिणीनें त्यास सांगितलें कीं, आजरात्रीं देवरायाच्या मुलाकडे गाण्यास जाण्याचा हुकूम झालेला आहे, व तो हुकूम अमान्य करितां येत नाहीं, आणि तुलाही बरोबर नेतां येत नाहीं. कारण फक्त बजवय्ये व नाचणाऱ्या कलावंतिणी यांस मात्र तंबूंत घेतील. तेंव्हां तो काजी म्हणाला, तूं जें वाद्य वाजवितेस तें मलाही वाजवितां येतें व त्याशिवाय दुसरेही कांहीं हुन्नर माझ्या आंगीं आहेत. त्यांच्या योगानें मीही राजपुत्रास खुष करून सोडीन. कलावंतिणीसही सर्व थट्टा वाटली. आणि तिनें आपलें रासमंडळ त्यास देऊन मस्करीनें वाजवून दाखविण्यास सांगितलें. तें वाद्य त्यानें अशा अलौकिक रीतीनें वाजविलें कीं, तेणेंकरून ती अगदीं खुष झाली; आणि काजी व त्याचे स्नेही यांस सायंकाळीं आपल्याबरोबर येण्यास तिनें परवानगी दिली.

दक्षणेंत अशी चाल आहे कीं, कलावंतिणीचे पुष्कळ ताफे एकाच दिवशीं नाचास व गाण्यास बोलावितात. त्या सर्वांचें नाच व गाणें आटोपल्यावर रायाच्या मुलानें गारुडी व नकल्ये यांस बोलाविलें. तेव्हां त्या कलावंतिणीनें काजीस आणि त्याच्या स्नेह्यांपैकीं एक स्नेही यांसही आपले हुन्नर दाखविण्याविषयीं परवानगी घेतली.

---

उपयोग करीत होते. पुढें सन १८१२ सालीं ब्रिटिशसरकारच्या एका पलटणीनेंही आपल्या तोफा गाड्यांसकट असल्या बुरडी नावांतून तुंगभद्रेंतून उतरल्या.

ते स्त्रीवेष धारण करून नखरे करीत, हंसत, नाचत आणि रासमंडळ वाजवीत पुढें आले. त्यांचें कसब पाहून राजपुत्र अत्यंत खुष झाला. शेवटीं प्रत्येकानें एकेक कठार काढून दक्षिणेंत+ नाच करण्याची कित्येक स्त्रियांची वहिवाट आहे, त्याप्रमाणें कठारी फिरवीत नाचूं लागले. अखेरीस एकाएकीं रायाच्या मुलाच्या आंगावर जाऊन दोघांनींही आपल्या कठारी त्याच्या उरांत खुपसून त्यास ठार केलें, व नंतर त्याचे हुजरे व सोबती यांवरही हल्ला केला. इतक्यांत काजीचे दुसरे मित्र तंबूबाहेर टेहळणीवर होतेच. त्यांस सूचना मिळतांच तंबू फाडून त्याच्या मदतीस आंत शिरले. तेथच्या मंडळीपैकीं पुष्कळ लोक दारू पिऊन गुंग झाले होते. यामुळें कांहीं अडथळा न होतां त्यांनीं त्यांस ठार मारिलें. आणि नंतर दिवे मालवून काजी व त्याचे स्नेही बाहेरच्या दाटींत जाऊन मिसळले. लौकरच या दंग्याबद्दल जिकडे तिकडे ओरडा ओरड झाली. सर्व छावणींत गोंधळ उडाला, आणि त्याच्या कारणांविषयीं अनेक तऱ्हेच्या कंड्या उठल्या. कित्येक म्हणूं लागले कीं, नदी उतरून तंबूवर एकाएकी शाहानें छापा घातला. दुसरे म्हणूं लागले कीं, शाहाचा एक सरदार १२,००० लोकांनिशी येऊन राय व राजपुत्र यांस कापून काढिलें. त्या रात्रीं फारच गडद अंधार पडला होता, व छावणी सुमारें १० मैल पसरली होती. म्हणून खरी स्थिति काय आहे, हें न समजल्यामुळें सर्व सरदार आपापल्या ठिकाणीं उजाडण्याची वाट पहात हत्यारें सज्ज करून राहिले. इतक्यांत काजी कडून इशारा मिळतांच फेरोजशाहाचें सुमारें ४,००० सैन्य बोटी व ताफे यांवरून उतरलें. त्यांस उतरूं न देण्याकरितां किनाऱ्यावर जे लोक ठेविले होते, ते छावणींतल्या धांदलीनें अगदीं घाबरून गेले. आणि शाहाच्या फौजेस अडथळा न करितां पळाले. उजाडण्यापूर्वींच फौजेमागून फेरोजशाहाही नदी उतरला आणि शत्रूच्या छावणींत उजाडतांच शिरला. देवराय मुलाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून अत्यंत दुःखी झाला, आणि मुसलमानांवर शस्त्र उचलण्यास त्यानें मुळींच यत्न केला नाहीं. परंतु आपल्या मुलाचें प्रेत घेऊन ते-

+ तेलंगी कलावंतिणी प्रत्येक हातांत एकेक दुधारी जंब्या घेऊन तालावर नाचतात, व इकडून तिकडे फिरवितात. याविषयीं अद्यापही फार प्रसिद्धि आहे.

धून पळाला. फेरोजशाहास छावणींत खूब लूट मिळाली. त्या
शाहा दक्षिणेकडे जातो, व विजयानग रचा राजा पळून जातो.
विजयानगरापर्यंत शत्रूंचा पाठलाग केला. विजयानगरास पोंहोंचेपर्यंत मार्गांत पुष्कळ छोट्या लढाया झा ल्या त्या सर्वांत मुसलमानांस जय येऊन सर्व मोठे रस्ते हिंदूंच्या मेतांनीं भरून गेले.

देवरायानें विजयानगरच्या किल्यांत आश्रय घेऊन दरवाजे बंद केले, आणि बाहेर मैदानांत कोणी हिंदु राहिला नाहीं. तेव्हां फेरोजशाहानें खानखनान आणि मीरफजलू उल्ला यांस शहराचा
शाहा दक्षिणे कडील भाग उध्वस्त करितो.
दक्षिणेकडील भाग उध्वस्त करण्यास पाठविलें. कारण या भागीं वस्ती दाट होती, व लोकही सुखी होते. काजी सिराज यास त्याच्या शूर व धाडसी कृत्याबद्दल सरदारी दिली, आणि आघाडीच्या फौजेबरोबर त्यास पाठविलें. या फौजेनें शाहाच्या इच्छेप्रमाणें काम फत्ते करून व पुष्कळ लोकांस कैद करून ती फौज छावणींत परत आली. मुसलमानांच्या हातीं पुष्कळ ब्राम्हण सांपडले होते. यामुळें विजयानगर येथील त्यांचे स्नेही राजाकडे आले, आणि पुष्कळ ऐवज आणून राजापुढें ठेविला. आणि ही खंडणी देऊन कैद्यांस सोडवावें, आणि तह करावा, अशी विनंति केली. देवरायानें त्यांचे म्हणणें कबूल केलें.
विजयानगरच्या राजाशीं तह.
तहाच्या शर्तीविषयीं परस्पर बोलणीं चालणीं झाल्यावर कैद्यांस सोडण्याकरितां शाहाच्या खजिन्यांत १०,००,००० होन+ द्यावे आणि तह ठरविल्याबद्दल* आपणास १,०,००० होन द्यावे, असा ठराव मीरफजल् उल्लानें केला. त्या प्रमाणें ब्राम्हणानीं ६,००,००० होन दिले, आणि त्याच्या भरतीस देवरायानें आपल्या खजिन्यांतून ५,००,००० घातले व सर्व ब्राम्हणास सोडविलें. तो सर्व

---

+ होनाची किंमत ३½ पासून ४ रुपये असे. ४ रुपये सरासरी किंमत धरली असतां वरील रकम ४०,००,००० होते.

* तह ठरविणारानें जी खंडणी द्यावयाची ठरेल त्याचा १/१० घेण्याची वहिवाट सर्व साधारण होती, असें दिसतें. ही रकम तहाच्या कलमांत नमूद करीत, व तह ठरविणाऱ्या मुत्सद्यास हें योग्य बक्षीस असें समजत.

ऐवज **फजल उल्लानें** शाहापुढें नेऊन मांडिला. तेव्हां शाहा त्याच्या बड्या नोकरीबद्दल संतुष्ट झाला. नंतर शाहा आणि राय यांमध्यें तह झाला.त्यांत असें ठरलें कीं; दोन्ही राज्यांच्या हद्दी लढाईपूर्वी होत्या तशाच रहाव्या, आणि कोणी एकानें दुसऱ्याच्या प्रजेस पीडा देऊंनये. या प्रमाणें सर्व काम उरकल्यावर **फेरोजशाहा** आपल्या मुलखांत जाण्यास निघाला.तुंगभद्रा उतरल्यावर **फोलादखानास दोआब** प्रांतावर नेमून व सर्व फौजेस मागून येण्यास हुकूम करून आपण एकटाच त्वरेनें कलबुर्ग्यास गेला.

ही स्वारी खलास झाल्यावर थोड्याच महिन्यांनीं हिजरीसन ८०२ च्या अवेलीस (इसवी सन १३९९) **केरळ**चा राजा **नरसिंगराय** याच्या पारिपत्यास शाहा निघाला. **माहूर** येथें पोंहोंचल्यावर त्यास असें आढळलें कीं, केवळ **नरसिंगराया**च्या भीतीस्तव त्या प्रांताच्या सुभेदारानें राजाची ताबेदारी पत्करली आहे. म्हणून या प्रसंगीं कांहीं सरदारांच्या मध्यस्थीनें त्यास शाहाकडून माफी मिळाली, व तो मोठ्या नजरा देऊन सैन्यांत येऊन मिळाला. माहूर येथें शाहानें १ महिना ५ दिवस मुक्काम करून **केरळास** निघाला. **नरसिंगराय** मोठा संपत्तिमान व बलवान राजा होता. **गोंडवणाचा** सर्व पहाडी प्रदेश व दुसरे कित्येक प्रांत त्याच्या ताब्यांत होते. त्यानें माळवा आणि खानदेश येथील राजांकडे मौल्यवान नजरा पाठवून त्यांचे सहाय्य मागितलें. जरी त्यांनीं पूर्वीच्या कित्येक प्रसंगीं राजास सहाय्य दिलें होतें, तरी वास्तवीक त्याचा नाश व्हावा अशी त्यांची इच्छा असल्यामुळें त्यांनीं यावेळीं सहाय्य देण्याचें नाकबूल केलें. असें झालें तरी **नरसिंगरायानें** शाहाशीं लढाई करण्याचा निश्चय केला. आणि केरळपासून दोन कोसांवर छावणी देऊन शाहाच्या फौजेची वाट पाहात राहिला.

शाहा केरळच्या राजावर स्वारी करितो. इ.स. १३९९.

सैन्याचें आधिपत्य स्वतः घ्यावें, अशी शाहाची फार इच्छा होती,परंतु **खानखनान** आणि **मीर फजल उल्ला अंजू** यांनीं ही कामगारी आपणावर सोंपवावी, अशी विनंति केली, तेव्हां शाहानें रुकार दिला.त्यांनीं **नरसिंगरायास** एक पत्र पाठवून लढाईस आरंभ केला. त्या पत्रांत त्याचें आचरण पूर्वी कोणत्या प्रकारचें होतें, व हल्लीं कसें आहे, हें दाखवून त्यास अशी सल्ला दिली कीं, शाहास खंडणी देण्याचें कबूल करून मागील सर्व तक्रारी मिटवून घ्याव्या. हें पत्र गेल्यावर आ-

ण अशा सल्लामसलतीची कांहीं पर्वा बाळगीत नाहीं, अशा मतलबाचें उत्तर पाठवून राजानें लढाईची तयारी अधिक जोरानें चालविली. खानखनान आणि मीरफजलू उल्ला यांनीं पुढें सरून त्यावर हल्ला केला. तेव्हां दोहों फौजांमध्यें मोठी निकराची लढाई झाली. तिजमध्यें शुजाहतखान, दिलवरखान, बहादूरखान हे बडे मुसलमानसरदार पडले. तेव्हां हिंदूंनीं मोठ्या त्वेषानें मुसलमानांवर हल्ला केला. त्या समयीं मुसलमानी फौजेंत धांदल उडून तिनें कच खाला. याच समयास खानखनानास शत्रूनीं मारिलें, अशी कोणी मीर फजलू उल्ला यास खबर दिली. परंतु ज्यानें खबर आणिली, त्यास ती बातमी गुप्त ठेवण्यास सांगून २,००० स्वारांनिशी फजल उल्ला आघाडीस गेला, आणि जयाची नौबत वाजवून शाहा मदतीस येत आहे, अशी वार्ता सर्व फौजेंत फिरविली. हें शुभवर्तमान मुसलमानांस कळतांच त्यांस दम चढला, व एकच हुल्लड करून अशा नेटानें हल्ला केला कीं त्यांनीं शत्रूस मागें हटविलें. इतक्यांत जो खानखनान मेला असें फजलू उल्ला समजत होता, तोच त्यास येऊन मिळाला. तेव्हां फजल उल्लास दुप्पट दम चढून उलट मुसलमानांनीं शत्रूच्या तोंडावर जाऊन त्यांस पिटून लाविलें. आणि नरसिंगरायाचा पुत्र गोपाळराय यास कैद केलें. नंतर हिंदु पळत सुटल्यावर मुसलमान लगोलग त्यांचा पाठलाग करीत गेले. आणि थेट केरल शहरापर्यंत त्यांची पाठ त्यांनीं सोडिली नाहीं. रणांत १०,००० हून जास्त हिंदु पडले. नरसिंगराय मोठ्या प्रयासानें किल्यांत जाऊन पोंहोंचला. तेथें तो पोंहोंचला, तों त्या किल्यासही विजयी मुसलमानांनीं वेढा दिला.

लढाई होऊन केरळच्या राजाचा पराभव होतो.

सुमारें दोन महिने वेढा पडल्यावर किल्यांतील फौज अगदीं टेंकीस येऊन त्यांनीं तहाचें बोलणें लाविलें. तेव्हां मुसलमानी सरदारांनीं असें उत्तर पाठविलें कीं, कांहीं अट न धरितां स्वाधीन व्हाल तर मात्र तुमचें बोलणें आम्हांस कबूल करितां येईल. याशिवाय दुसरें कोणतेंही म्हणणें ऐकण्याचा आम्हांस अधिकार ठेविला नाहीं. तेव्हां नरसिंगराय अगदीं निरूपाय होऊन आपल्या कुटुंबाच्या सर्व माणसांसह एलिचपूर येथें शाहाच्या छावणींत गेला. आणि आपल्या वर्तनाबद्दल फा-

र पश्चाताप झाल्याचें दर्शवून आणि शाहाचा ताबेदार आहें असें क-बूल करून केरळसुध्दां स्वाधीन करण्याचें त्यानें कबूल केलें. याप्रमाणें शरण येऊन शाहा मागील वागणुकीबद्दल माफी करून आपल्या मांडलि-क राजांत मला स्थान देईल अशी आशा आहे, आणि तसें झालें म्ह-णजे अल्लाउद्दिन हसन कांगोनें ठरविल्या प्रमाणें खंडणीही देत जा-ईन, व आज्ञेंत वागेन असें वचन देतों, अशी नरसिंगरायानें विनंति केली. शाहानें त्यास माफी करून उंच मखमाली पोषाख दिला. राया-नें आपल्या कन्या पैकीं एका कन्येस शाहाच्या जनानखान्यांत पाठविलें; व तिजबरोबर ४५ हत्ती, पुष्कळ द्रव्य व दुसऱ्या कांहीं मौल्यवान चिजा शा-हास नजर दिल्या. तेव्हां शाहानें केरळचा वेढा उठविण्यास हुकूम दि-ला. खान खनान आणि मीरफजल् उल्ला यांच्या फौजा एकत्र मिळा-ल्यावर नरसिंगरायास खमुलखीं जाण्यास निरोप दिला, आणि शाहा-ही मोठ्या विजयानें कलबुर्ग्यास परत आला. मीर फजल उल्ला या-च्या श्रमामुळेंच हा जय मुख्यत्वें मिळाला होता. म्हणून शाहानें त्या सरदारास वऱ्हाडच्या सैन्याचें आधिपत्य दिलें.

हिजरी सन ८०४ या सालीं तैमूरलंगाच्या दरबारांतून वारंवार अ-शा बातम्या येऊं लागल्या कीं, त्यानें दिल्लीची बादशाही आपल्या मु-लांपैकीं एका मुलास देऊन हिंदुस्थानांतील सर्व राज्यें जिंकण्यास हु-कूम केला आहे. आणि जरूर पडल्यास त्याच्या मदतीस येण्याचा नि-श्चय त्यानें केला आहे. या करितां फेरोजशाहानें तै-मूरलंगाकडे मोठ्या नजरा देऊन वकील पाठविले, आ-णि आपली पूज्य बुद्धि दर्शविण्याकरितां त्यांजबरो-बर पत्रही दिले. तैमूरलंगानें वकिलांचा मोठ्या गौरवानें सत्कार के-ला, व नजरा स्वीकारिल्या. वकिलांनीं असाही अर्ज केला कीं बादशा-हाच्या ताबेदारांपैकीं आपण आहों, असें बादशाहांनीं समजावें, अ-शी फेरोजशाहा बाहामिनीची उत्कट इच्छा आहे. आणि ज्या वेळीं बादशाहा स्वतः हिंदुस्थान जिंकावयास निघतील किंवा आपल्या शा-हाजाद्यांपैकीं एकास पाठवितील. तेव्हां फेरोजशाहा दक्षणेंतून आपली फौज घेऊन बादशाही फौजेच्या कुमकेस त्वरेनें येईल.

शाहा तैमूरलंगाकडे वकील पाठवितो.

फेरोजशाहानें स्वतः आपण होऊन कुमक करण्याचें जें हें बो-

लणें काढिलें, त्यावरून तैमूरलंग फार खुष झाला. आणि तैमूरलंगानें फेरोजशाहास दक्षण, माळवा, आणि गुजराथ या राज्यांचें आधिपत्य दिलें, व बादशाही छत्रचामरादि सर्व चिन्हें धारण करण्याचीही परवानगी दिली. सुमारें सहा महिने वकिलांस ठेवून घेऊन वर सांगितलेले देश दिल्याची सनद व तैमूरलंगाच्या कमरेंतील रत्नजडित एक तलवार, बादशाही पोषाख, एक तुर्की गुलाम आणि दक्षणेंत पूर्वी कोणी कधीं पाहिले नाहींत असे सिरिया देशांतील ४ सुंदर घोडे फेरोजशाहास त्यानें देऊन वकिलांस निरोप दिला.

बादशाही छत्र व दुसरीं चिन्हें धारण करण्याची परवानगी आणि दक्षण,माळवा व गुजराथ हीं राज्यें फेरोजशाहास तैमूरलंग देतो.

गुजराथ, माळवा व खानदेश+ येथील मुसलमान सुलतान यांचा अद्याप अंमल चांगला स्थापन झाला नव्हता. फेरोजशाहा चोहोंकडे वरचेवर नवीन मुलूख सरकरूं लागला. यामुळें त्यांस भीति वाटून फेरोजशाहाची दोस्ती संपादन करण्याकरितां त्याकडे त्यांनीं वकील पाठविले. आणि त्यांचे मार्फत असें कळविलें कीं, आपण सर्व मुसलमान असल्यानें बंधूप्रमाणें एकीनें राहावें, आणि दिल्लीच्या बादशाहाचा कटाव चालूं देऊनये. त्याच वेळीं त्यांनीं गुप्तपणें विजयानगरच्या राजास असें लिहिलें कीं; जेव्हां फेरोजशाहाविरुद्ध सहाय्य लागेल तेव्हां आम्ही आमच्या हातून होईल तितकी कुमक एकदम करूं. असें बोलणें त्यांज-

माळवा आणि गुजराथ येथील राजे (फेरोजशाहा विरुद्ध) विजयानगरच्या राजाशीं गुप्तपणें वकील पाठवितात.

---

+ तैमूरलंगाकडे वकील पाठविले, व ते जो फर्मान घेऊन आले, त्याविषयीं माळवा व खानदेश येथील शाहांस हकीकत कळतांच फेरोजशाहाचे अंतर्गत हेतु काय आहेत हें त्यांस समजलें. आणि कलबुर्ग्यापासून फार अंतरावरचा केरळ या प्रांतावर फेरोजशाहानें हल्ला केला, त्यावरून तर त्याच्या महत्वाकांक्षेविषयीं त्यांची खात्रीच झाली. वास्तव उत्तरेकडील या दोघां शाहांनीं विजयानगरच्या राजाशीं तहाचें बोलणें सुरू करावें, हें स्वाभाविक होतें. कारण विजयानगरचा मुलूख दुसऱ्या दिशेस असल्यामुळें तेथील राजांस त्यांस अनुकूल अशा रीतीनें बाहामिनीशाहास गुंतविण्याचें नेहमीं घडण्याजोगें होतें.

कडून येतांच विजयानगरच्या राजानें लागलेंच आपलें वर्तन फिरविलें, आणि ४ वर्षेंपर्यंत शाहाकडे त्यानें खंडणी पाठविली नाहीं. गुजराथ आणि माळवा येथील सुलतानांचें गुप्त वैर फेरोजशाहास माहीत होतें. म्हणून त्यानें रायास खंडणीबद्दल तगादा न करितां तूर्त कानाडोळा केला. परंतु पुढें संधि आली म्हणजे याबद्दल याची खोड काढावी, असा त्यानें निश्चय केला.

मुदकल शहरीं एक सोनार रहात असे. त्याची एक निहाल या नांवाची अति रूपवान कन्या होती. विधात्यानें तिचें रूप परिपूर्ण करण्याकरितां जणुं काय आपलें सर्व कौशल्य खर्च केलें आहे, असें दिसत होतें. हिंदुलोकांच्या चालीप्रमाणें तो सोनार तिजकरितां आपल्याच जातींतला नवरा पाहून तिचें लहानपणींच लग्न करणार होता. परंतु आपलें लग्न कांहीं दिवस करूंनये, असें तिनें मोठ्या उत्कंठेने बापाचें आर्जव केलें. तेव्हां बापानें तिचें लग्न लांबणीवर टाकिलें. पुढें कांहीं दिवसांनीं एक म्हातारा ब्राम्हण काशीयात्रेहून परत येत असतां वाटेंत तिच्या बापाच्या घरीं उतरला. तेथें त्या मुलीचें सौंदर्य पाहून फार चकित झाला. तो गाणें व नाचणें यांत फार निष्णात होता. म्हणून त्यानें त्या मुलीला त्या दोन्ही विद्या शिकविण्याचा निश्चय केला. त्यानें तेथें सुमारें १८ महिने राहून त्या मुलीला गाणें बजावणें व नाच शिकविला. या दोहोंतही ती तरबेज झाली, असें पाहून तो निरोप घेऊन निघाला. परंतु त्यानें असें वचन दिलें कीं, जेणेंकरून तुमच्या घराण्याचा फायदा होईल व माझ्या शिष्यिणीस मोठें घर मिळेल, अशा तऱ्हेचें लग्नाचें बोलावणें घेऊन मी परत येईन. त्या ब्राम्हणानें मुळापासूनच त्या मुलीचा शरीरसंबंध राजघराण्यांत व्हावा, असें मनांत योजिलें होतें, व त्या प्रमाणें तो विजयानगरास गेला. तेथें राजाची गांठ घेऊन त्यानें या मुलीच्या सौंदर्याविषयीं राजापाशीं इतकी स्तुति केली कीं, राजानें तिला वरण्याचा निश्चय केला, आणि त्या ब्राम्हणास मुलीच्या बापाकडे मागणें करण्यास पाठविलें. राजा याप्रमाणें आपणास सांगेल, असें ब्राम्हणानें पूर्वींच ताडिलें होतें. म्हणून त्यानें लागलेच आपले हेतु सिद्धीस नेण्याकरितां आपल्याकडून होईल तितकी ख-

टपट करण्याचें वचन दिलें. नंतर तिच्या बापास मौल्यवान् देणग्या देऊन त्या ब्राम्हणास राजानें त्याकडे रवाना केलें, आणि असें सांगून पाठविलें कीं, त्या सुंदर कन्येस मी आपली पट्टराणी करितों. तो ब्राम्हण मार्गांत फार काळ न घालवितां जलदीनें मुदकलास गेला आणि सोनाराचें घरीं पोहोंचतांच त्या मुलीच्या आईबापांस मुलीस घेऊन विजयानगरास रायानें बोलाविलें आहे असा निरोप ब्राम्हणानें त्यांस कळविला. असें आपलें नशीब अवचित उघडलें, हें पाहून त्यांस अत्यानंद झाला. आणि मुलीस बोलावून तिच्यापुढें रायानें पाठविलेल्या मौल्यवान् देणग्या ठेवून "मोठ्या राजाबरोबर तुझें लग्न होणार म्हणून आम्हांस फार आनंद होत आहे." असें सांगितलें. आणि लग्नाचा निश्चय ठरला, असें समजण्याबद्दल रायानें पाठविलेली रत्नजडित पुतळ्यांची माळ घालूं लागले. ही माळ घातली म्हणजे वाग्निश्चय झाला, व तो पुढें फिरावयाचा नाहीं; असें समजतात. या करितां मुलीनें तो हार गळ्यांत घालून घेतला नाहीं. तेव्हां तिच्या आईबापांस फारच आश्चर्य वाटलें. तीं म्हणाली विजयानगरच्या अंतःपुरांत ज्या स्त्रिया जातात, त्यांस आपल्या अगदीं जवळच्या आप्तांस सुद्धां भेटण्याची परवानगी पुढें कधीं मिळत नसते. राज्याच्या वैभवास भुलून जरी तुम्हीं मला अर्पण करण्यास खुषी असली तरी विजयानगरच्या वैभवाकरितां देखील माझ्या प्रियकर आईबापांचा सतत वियोग सहन करण्यास मी राजी नाहीं. असें मोठ्या प्रेमानें म्हणून तिनें डोळ्यांत अश्रू आणिले. तेव्हां त्यांचें अंतःकरण द्रवलें, व त्यांनीं तिच्या म्हणण्यास रुकार दिला, आणि तिच्यावर जबरी न करितां त्या ब्राम्हणास त्यानें आणलेल्या सर्व देणग्या परत करून निरोप दिला. तेव्हां कार्यसिद्धि न होतां तो ब्राम्हण विजयानगरास परत गेला. तदनंतर त्या मुलीनें आपल्या आईबापांस आपलें हृद्गत असें कळविलें कीं, आपण मुसलमानी शाहाची बेगम होईन, अशी माझी फार दिवसांपासून खात्री झालेली आहे. तर ईश्वरकृपेनें तो योग कधीं घडून येतो, याची वाट पहात कांहीं दिवस स्वस्थ बसा,. असें तिनें सांगितलें. ह्या तिचा वेडेपणाचा विचार ऐकून त्यांस हसूं आलें. परंतु तिला कितीही सांगितलें, तरी ती ऐकेना; तेव्हां ते निराश होऊन पुढें क-

सा प्रकार घडून येतो तें पाहात राहण्याचा त्यांनीं निश्चय केला.

तो ब्राम्हण विजयानगरास पोंहोंचला, व काम फत्ते झालें नाहीं असें त्यानें राजास कळविलें. तेव्हां राय फारच कावराबावरा झाला, आणि जरी ती मुलगी फेरोजशाहाच्या मुलखांत राहात होती, तरी तिला जबरीनें आणून आपले मनोरथ पूर्ण करण्याचा रायानें निश्चय केला. याकरितां आपल्या प्रांतांत फिरावयास जावयाच्या मिषानें फौज घेऊन विजयानगराहून निघाला, आणि तुंगभद्रेच्या कांठीं येऊन त्यानें तळ दिला. तेथून त्यानें ५,००० निवडक स्वार घेऊन त्याचे सरदार व कामगार निषेध करीत असतां रातबेरात मोठ्या त्वरेनें त्यानें मुदकलास कूच केलें, आणि त्या सोनाराच्या मुलीस तिच्या सर्व कुटुंबासह कांहीं इजा न करितां कैद करून आणण्याकरितां ज्या ठिकाणीं सोनाराचें घर होतें. त्या भागास त्यानें गराडा दिला.

कामाच्या भरांत रायास सारासार विचार राहिला नाहीं. यामुळें आपलें सैन्य आलें म्हणजे लोक घाबरून पळून जाऊं लागतील; तेव्हां तुम्हीं पळून नजातां घरींच असा, असें त्या मुलीच्या आईबापांस सांगण्याकरितां ब्राम्हणास पाठविण्यास राय विसरला. यामुळें असें घडलें कीं, विजयानगरची फौज आली, असें मुदकलच्या आसपास कळतांच तेथचे लोक दूरच्या प्रदेशीं पळून गेले, व त्यांतच त्या सुंदर निहाल मुलीचेंही कुटुंब पळालें. यामुळें देवरायास इच्छित वस्तु प्राप्त न होतां जलदीनें परत जावें लागलें. यामुळें मार्गांत कित्येक गांवें व खेडीं त्यानें उध्वस्त केलीं. कारण त्याचें निवारण करण्याकरितां तेथची फौज जमविण्यास अवधीच मिळाली नाहीं. शेवटीं त्या प्रांताचा सुभेदार फोलादखान हा त्यावर चालून गेला. परंतु जेव्हां हिंदूंनीं पाहिलें कीं, आपली फौज त्यांच्याहून फार आहे, तेव्हां ते त्यांच्याशीं लढाई करण्यास थांबले, आणि त्यांनीं मुसलमानांस मागें हटविलें. इतक्यांत त्यांस कुमक आल्यामुळें पुनः फोलादखानानें हिंदूंचा पाठलाग केला. पराजित झालेला शत्रू पुनः पाठीवर येईल, हें त्यांच्या स्वप्नींही नव्हतें. यामुळें ते फार गैरसावधपणानें चालले होते. तेव्हां त्यांवर मुसलमानांनीं एकाएकीं छापा घालून त्यांचा अगदीं पराभव केला;

विजयानगरच्या राजाशीं लढाई.

आणि विजयानगरचें सैन्य तुंगभद्रा उतरून जाईपर्यंत त्यांच्या दोनहजार लोकांस मुसलमानांनीं ठार मारिलें.

आगळिकीवांचून ही स्वारी केल्याचें ऐकून **फेरोजशाहानें** लागलास **फेरोजाबादेस** फौज जमविण्याचा हुकूम दिला. आणि हिजरीसन ८०९ (इसवीसन १४०६) च्या अवेलीस मोठें सैन्य घेऊन शाहा निघाला, आणि कांहीं प्रतिबंध न होतां तो विजयानगरासमीप येऊन पोहोंचला. देवराय वेशी बंद करून शहरांत राहिला होता. शाहानें शहरावर हल्ला करून शहरचे कांहीं रस्ते ताब्यांत घेतले; परंतु शहरचे लोक अशा त्वेषानें मुसलमानांशीं लढले कीं, त्यांनीं मुसलमानांस

विजयानगरास मुसलमान वेढा घालितात. इसवी सन १४०६.

मागें हटविलें. या जयानें देवरायास उमेद आली, आणि शहराच्या बाहेर तटाच्या आश्रयास रायानें छावणी दिली, आणि थोडें सैन्य घेऊन वेढा घालणारांच्या छावणीवर हल्ला केला. विजयानगरच्या सभोंवारचा प्रदेश चढउतार आहे. म्हणून मुसलमानांस स्वारांचा उपयोग करितां येईना. यामुळें हिंदुशिपायांचा त्यांस फार उपद्रव सोसावा लागला, व ते नाउमेद झाले. एका प्रसंगीं फेरोजशाहाच्या हातावर तिराची जखम लागली. परंतु घोड्यावरून न उतरतां जखमेंतून तीर काढून त्यानें कपड्यानें जखम बांधिली, आणि लोकांस दम देत राहिला. अखेरीस शाहाचा भाऊ **अहंमदखान** याच्या शौर्यामुळें शत्रू मागें हटले. तेव्हां शाहानें आपली छावणी तेथून काढून शहरापासून दूर एका सोईच्या मैदानांत तळ देऊन जखमी लोक बरे होईपर्यंत तेथें राहिला. त्यानें शहर घेण्याचा बेत रहित करून आपला भा

मुसलमान विजयानगरच्या आसपासचा मुलूख उध्वस्त करितात.

ऊ **अहंमदखान, खानखनान** आणि **मीरनौबत** यांस विजयानगरच्या दक्षणेकडील मुलूख उध्वस्त करण्यास पाठविलें, आणि **मीरफजल उल्ला अंजू** यास वऱ्हाडची फौज देऊन कर्नाटकांतील अत्यंत महत्वाचा किल्ला **बंकापूर** यास वेढा देण्यास पाठविलें. शाहा बाकीची फौज घेऊन विजयानगरच्या आसपास राहिला. आणि आपल्या छावणी भोंवतीं तोफांच्या गाड्यांचा गराडा त्यानें दिला. देवरायानें यांवर एक दोन वेळा हल्ला केला. परंतु सर्व वेळीं त्यास मागें हटवून मु-

सलमानांनीं त्याच्या लोकांची कत्तल केली. रायानें आतां हल्ले करण्याचें बंद केलें, आणि माळवा, खानदेश आणि गुजराथ येथील सुलतानांकडे कुमक मागण्यासाठीं वकील रवाना केले.

विजयानगरासमीप रहण्यांत शाहाचा उद्देश असा होता कीं, येथें देवरायास गुंतवून बाहेर लक्ष देण्यास त्यास सवड मिळूंनये. या प्रमाणें त्यानें देवरायास ४ महिने गुंतविलें. या काळांत खानखनानानें कर्नाटकांतील अत्यंत भरभराटींत असलेलीं शहरें व प्रांत लुटून उध्वंस्त केले. आणि त्याच प्रमाणें मीरफजल उल्लानेंही बंकापूर किल्ला व त्याखालील मुलूख सर केला. उल्लाबरोबर मियानसुद्दो हाही मोठ्या शौर्यानें लढत होता म्हणून त्यास शाहाच्या हुकुमानें बंकापुरच्या सुभेदारीवर नेमून उल्ला शाहाच्या छावणींत परत आला. खानखनानही सुमारें ६०,००० हिंदु कैदी व पुष्कळ लूट घेऊन शाहास येऊन मिळाला. या उभयतांनीं जी नोकरी बजाविली, त्याबद्दल या कामगारांचा योग्य सत्कार करून त्यानें या जयाबद्दल मोठा उत्साह केला, व त्यावेळीं पुढें व्यवस्था कशी करावयाची याबद्दलही वाटाघाट केली. कांहीं वादविवाद झाल्यावर असें ठरलें कीं, खानखनानानें विजयानगर येथें राहून देवरायाशीं लढावें, आणि मीरफजल उल्लास घेऊन शाहानें अडोनी किल्ल्यास वेढा घालण्यास जावें. शत्रूच्या ताब्यांत जे किल्ले होते त्या सर्वांत हा मोठा बळकट व दुर्धर होता.

मुसलमान बंकापूर घेतात.

माळवा, खानदेश आणि गुजराथ येथील सुलतानांकडून देवरायास कांहीं कुमक मिळाली नाहीं. तेव्हां तो अगदीं निराश झाला, आणि शाहाचा पुढील बेत त्यास कळतांच तह ठरविण्याकरितां शाहाच्या छावणींत आपले कांहीं सरदार त्यानें पाठविले. तहाविषयीं मीं कांहीं बोलणें ऐकणार नाहीं, असें शाहानें सांगितलें; परंतु शेवटीं मीर फजल उल्ला यानें विनंति करून फार आग्रह केला. तेव्हां पुढील शर्तीवर तह ठरला.

रायानें आपल्या एका मुलीचें शाहाशीं लग्न करावें. १०,००० होन खंडणी द्यावी. पांच मण मोत्यें ५० उत्तम हत्ती व २००० पुरुष व स्त्रिया मिळून गुलाम, कांहीं गवई, कांहीं कलावंतिनी, आणि कांहीं बजवय्ये शाहा-

देवराय आपली कन्या शाहास देऊन तह करितो.

स नजर करावे. जो बंकापुरचा किल्ला शाहानें आतां ताब्यांत घेतला आहे, त्याबद्दल पुढें कांहीं तक्रार पडूंनये, म्हणून तो किल्ला विजयानगरच्या राजकन्येबरोबर रायानें शाहास आंदण द्यावा.

विजयानगरच्या राजांमध्यें आपल्या मुलीस आपल्याच जातीचा नवरा पाहून विवाह करण्याची चाल होती; आणि त्यांनीं आजपर्यंत परजातीशीं लग्नसंबंध केले नव्हते, आणि तसें करणें म्हणजे फार बेअब्रूचें काम आहे, असें समजत, तथापि यावेळीं निरूपाय होऊन **देवराया**नें या गोष्टीस रुकार † दिला, आणि दोहोंकडून लग्नाची तयारी सुरू झाली. सुमारें ४० दिवस विजयानगर आणि शाहाची छावणी यांमध्यें लोकांचें जाणें येणें सुरू होतें. दोहोंमध्यें अंतर सुमारें १४ मैलांचें होतें; आणि एवढ्या लांब रस्त्यावर दोहोंबाजूंनीं मुसलमान व हिंदु यांचीं दुकानें बसलीं होतीं. वाटेंत गारुडी, बहुरूपी, आणि नकल्ये हे खेळ करून लोकांस रंजवीत होते. नवऱ्याकडून जे पेषाख व जवाहीर द्यावयाचें तें देऊन **खानखनान** आणि **मीर फजल उल्ला** यांस विजयानगरास मोठ्या समारंभानें शाहानें पाठविलें, व तेथून ते ७ दिवसांनीं रायानें दिलेल्या वरदक्षिणेसह नवरीस घेऊन शाहाच्या छावणींत आले. नंतर देवरायानें आपला जांवई फेरोजशाहा याची भेट घेण्याची इच्छा दर्शविली. शिष्टाचारास अनुसरून नवरीसह आपल्या सासऱ्याच्या भेटीस जाण्याचें शाहानें कबूल केलें.

भेटीकरितां एक दिवस नेमून शाहा विजयानगरच्या नवरीस घेऊन निघाला, आणि **खानखनानास** छावणींत ठेविलें. देवराय मोठ्या समारंभानें रस्त्यांत त्यास सामोरा आला. शहरच्या वेशीपासून राजवाड्यापर्यंत सुमारें ६ मैल अंतर होतें. तथापि किनखापी, मखमली, साटीन व दुसरे उंची कपडे रस्त्यावर पसरले होते. दोघेही राजे सुंदर मुली व सु-

† आपली मुलगी मुसलमानाबरोबर लग्न करून देणें हिंदुराजास भाग पाडणें म्हणजे त्यांची अत्यंत मानहानी होणें होय. परंतु राज्यरक्षणाकरितां असें करणें हिंदूंस भास पडलें. मुसलमानांनीं आपली दुष्ट आशा तृप्त करण्याकरितां म्हणून केवळ जरी ही चाइवाट आरंभीं सुरू केली, तथापि हिंदू व मुसलमान यांचें ऐक्य करण्यास ती परिणामीं उपयोगीं पडली; आणि हे शरीरसंबंध होण्यापूर्वीं जें दोहीं जातींत मोठें हाडवैर होतें, तें येणेंकरून बरेंच कमी होत गेलें.

लगे यांच्या मधून घोड्यावर बसून चालले होते. मुली आरत्या ओंवाळीत होत्या, व मुलगे रुप्याचीं फुलें त्यांवर उडवीत होते, व तीं फुलें गोरगरीब लोक गोळा करीत होते. हें संपल्यावर शहरच्या पुरुष बायकांनीं आपापल्या योग्यतेप्रमाणें अहेर केले. शहरच्या मध्यभागच्या चौकांतून पुढें गेल्यावर देवरायाचे आप्त सोयरे रस्त्यावर उभे होते. त्यांनीं मुजरे केले व ते स्वारींत मिसळून दोहों राजांपुढें पायांनीं चालले. वाड्याच्या दरवाजापुढें पोहोंचल्यावर दोघेही घोड्यावरून उतरले, आणि रत्नजडित पालख्यांत बसून नवरानवरीकरितां तयार केलेल्या महालांत गेले. नंतर देवराय त्यांचा निरोप घेऊन आपल्या महालास गेला. तीन दिवस मोठी मेजवानी झाल्यावर शाहानें रायाचा निरोप घेतला. तेव्हां पूर्वींपेक्षांही मोठमोठ्या चिजा नजर करून आणि ४ मैलपर्यंत शाहास पोंहोंचवून राय परत गेला. राय आपणास छावणीपर्यंत पोंहोंचविण्यास आला नाहीं, याचा शाहास राग आला, व तो मीरफजल उल्लास म्हणाला कीं, या अपमानाबद्दल कधीं तरी सूड घेईन. हे शाहाचे शब्द देवरायास कळतांच तोही शाहास लागण्याजोगे कांहीं शब्द बोलला. यामुळें दोहों घराण्यांचा शरीरसंबंध होऊनही द्वेष शमन झाला नाहीं.

आपल्या राजधानीस परत आल्यावर सोनाराची मुलगी या लढाईस कारण झाली होती; तिला व तिच्या आईबापांस आणावयास फेरोजशाहानें कांहीं इसम पाठविले. तिच्या सौंदर्याविषयीं लोकांनीं जें शाहापाशीं वर्णन केलें होतें, त्याहूनही ती फार सुंदर आहे, असें प्रत्यक्ष पाहतां प्रत्ययास आलें. अशा तरूण मुलीस वरण्यास आपण फार वृद्ध आहों, असें समजून शाहानें आपला शाहजादा हसनखान याशीं तिचें लग्न करण्याचें ठरविलें, आणि तिच्या आईबापांस मोठ्या देणग्या दिल्या, व त्यांस त्यांच्या गांवीं पुष्कळ जमीनही इनाम दिली. लग्नाची तयारी होईपर्यंत त्या मुलीस शाहानें आपल्या चुलतीच्या स्वाधीन केलें. लग्नसमारंभाची तयारी झाल्यावर मोठ्या पादशाही थाटानें लग्नसमारंभ झाला.

फेरोजशाहास ज्योतिषशास्त्राची फार आवड होती. म्हणून त्यानें दौलताबादे नजीक एका टेंकडीच्या माथ्यावर हिजरी सन ८१० सालीं एक मोठी वेधशाळा बांधण्यास सुरू केलें; परंतु मध्यंतरीं प्रसिद्ध ज्योतिषि हकीम हसनखान मरण पावला. हिजरीसन ८१० इसवी सन १४०७

यामुळें तें कांम पुरें होण्याचें नसेंच राहिलें.

हिजरी सन ८१५ या सालीं गोंडवणच्या प्रांतीं शिकारीच्या मिषानें जाऊन शाहानें तो मुलूख उध्वस्त केला, आणि ३०० हत्ती घेऊन तो परत आला. **महंमद जिसू दुराज** हा प्रसिद्ध सय्यद दिल्लीहून कलबुर्ग्यानि-

दुराज सय्यद येतो हि. स. ८१५ इ. स. १४१२.

जीक आला आहे, असें शाहानें ऐकिलें. त्यावरून तो **फेरोजाबादे**हून त्याची भेट घेण्यासाठीं कलबुर्ग्यास गेला, आणि पदरच्या कांहीं सरदारांस त्यास सामोरें पाठविलें. तो आल्यावर शाहानें त्याचा प्रथम मोठा सत्कार केला; परंतु त्याची विद्वत्ता म्हणण्यासारखी जाडी नाहीं, असें पाहून त्याची फारशी वागपूस करीना. परंतु शाहाचा भाऊ **अहंमदखान** याची या सय्यदाविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि होती. त्यानें या सय्यदाकरितां मोठा जंगी दर्गा बांधिला, व त्याचे उपदेश ऐकण्यांत तो आपला बराच वेळ घालवीत असे. त्याची **वजीद** चालली असतां कधीं गैरहजर राहात नसे. या प्रसंगीं दर्ग्यांतील लोकांस व इतर दरवेशांस फार धर्म करी.

हिजरी सन ८१८ या सालीं आपला पुत्र **हसन** यास आपल्यामागून तक्त मिळावें असा शाहानें निश्चय करून त्यास पादशाही कि-

हि. स. ८१८ इ. स. १४१५.

रीट घातला; पादशाही कमरबंद दिला; आणि त्याप्रमाणें पादशाही छत्र, कित्येक पादशाही तंबू, कांहीं हत्ती व दुसरीं पादशाही चिन्हें शाहानें त्यास दिलीं. पदरच्या सर्व सरदारांस बोलावून **हसन** हा माझ्या मागून गादीवर बसावयाचा, व त्याचा अधिकार सर्वांनीं मान्य करावा, असें सांगितलें. **हसन** हा दुर्बल व व्यसनी होता, यामुळें लोकांची त्यावर भक्ति नव्हती. शाहानें दिल्लीच्या सय्यदासही बोलावून हसनास आशिर्वाद देण्यास सांगितलें. त्यानें उत्तर केलें कीं, ज्यास शाहानें पसंत केलें आहे, त्यास गरीब फकिराचा आशिर्वाद कशास पाहिजे? फेरोजशाहास

---

+ या कामाचे अवशेष अद्याप दृष्टीस पडतात. परंतु तेथील लोकांस याच्या मूळ उद्देशाची कल्पनासुद्धां नाहीं.

* दर्गा म्हणजे फकीर सय्यद वगैरे मुसलमान साधूंचा राहण्याचा मठ होय.

हें त्याचें उत्तर रुचलें नाहीं; व त्यानें त्या सय्यदास पुनः बोलाविलें. तेव्हां सय्यदानें स्पष्ट सांगितलें कीं, तक्त तुझ्या भावास मिळावें, असा ईश्वरी संकेत आहे. तेव्हां तें दुसऱ्यास देणें व्यर्थ आहे. हें भाषण ऐकून शाहास भीति वाटली, आणि सय्यदास शहराबाहेर जाण्यास हुकूम केला. नंतर सय्यदाचा दर्गा पादशाही माहालाच्या फार सन्निध असल्यामुळें सय्यदाचे शागिर्द व विद्यार्थी यांच्या गर्दीपासून राजधानीच्या शांततेस धोका येईल, असें निमित्त करून त्यांस शहर सोडून जाण्यासही शाहानें हुकूम केला. सय्यद लागलाच शहरांतून गेला, व दूर एका ठिकाणीं जाऊन राहिला. तेथें त्याची कबर अद्याप आहे. तेथें त्याच्या अनुयायानीं दुसरा मोठा भव्य दर्गा+ बांधिला.

हिजरी सन ८२० या सालीं तेलंगणच्या राजाकडे कांहीं वर्षांची तुंबलेली बाकी मागण्यास शाहानें वकील पाठविले. त्यानें देणें असलेली बाकीशिवाय आणखी कांहीं मौल्यवान नजरा पाठविल्या. अँडोनीपासून सुमारें २५० मैलांवर पानगल* किल्ला आहे. यास हल्लीं बीलकोंडा म्हणतात. तो किल्ला घेण्याचा बेत शाहानें याचसालीं केला. विजयानगरच्या राजाशीं जो नुकताच शरीरसंबंध झाला तो मनांत न आणितां मागील द्वेष आठवून शाहानें कूच केलें, व किल्यास वेढा दिला. दोन वर्षें वेढा देऊन शाहा बसला, तरी किल्ला सर झाला नाहीं. तो किल्ला त्यावेळीं मुसलमानांच्या हातीं जाऊंनये असा ईश्वरी संकेत असल्यामुळें शाहाच्या छावणींत जरीमरीची सांथ उद्भवून शेंकडों माणसें व घोडीं मरूं लागलीं. यामुळें सर्वांची बागबुग होऊन तेथें राहण्यास सर्व नाखुष झाले, व कित्येक बडे सरदार आपल्या लोकांस घेऊन छावणींतून आपल्या प्रांतीं गेले. याच अणीबाणीच्या प्रसंगीं सभोंवतालच्या

हिजरी सन ८२०
इ. स. १४१७.

शाहा पानगल किल्यास वेढा घालितो.

---

+ या सय्यदाची हल्लीं जी क़बर आहे, ती प्रसिद्ध सय्यद महंमद जिसू दुराज याचा वंशज महंमद अमीन हुसेनी यानें विजापुरच्या महंमद आदिलशाहाच्या कारकीर्दींत सन १६५० इ. सालीं दुरुस्त केली, किंवा नवी बांधलेली असावी.

* हल्लीं पानगल यास दुसरें नांव नाहीं. आणि तो किल्ला अडोनीपासून ७०मैलाहून जास्त लांब नाहीं.

सर्व राजांची (तेलंगणच्या राजाची सुद्धां) कुमक घेऊन देवरायानें मोठी फौज जमविली; आणि असंख्य स्वार व पायदळ घेऊन त्यानें शाहावर हल्ला केला.

आपल्याजवळ हिंदूंशीं लढाई करण्याजोगें सैन्य नाहीं, असें जरी फेरोजशाहास समजलें, तथापि यावेळीं आपण माघार घेतली तर आपली फजिती होईल. असें त्यास वाटून, त्याचे सरदार लढाई करूं नये असें म्हणत असतां लढाई देण्याचा त्यानें निश्चय केला. मीरफजल उल्ला यानें सैन्याचें आधिपत्य स्वीकारून मोठ्या शौर्यानें हिंदूंवर हल्ला केला; आणि त्यांची मधली फळी फोडूनउजवीकडच्या फळीवर दौड केली. तेव्हां त्यास जय मिळण्याचा लाग आला होता. इतक्यांत त्याच्याच एका नोकरानें त्याच्या डोक्यावर अशी एक जबर जखम केली कीं, तेणेंकरून तो तत्काळ मेला. (देवरायानें या नोकरास लांच देऊन हें कृत्य करण्यास प्रवृत्त केलें होतें, असें लोक मागून म्हणूं लागले.) हें घातक कृत्य होतांच लढाईचें स्वरूप बदललें. मुसलमानांचा पराभव झाला, आणि शाहास मोठ्या प्रयासानें रणांतून आपली सुटका करून घ्यावी लागली. हिंदूंनीं मुसलमानांची मोठी कत्तल उडविली, आणि रणांगणावर त्यांच्या डोक्यांचा मोठा ढीग रचला. नंतर शाहाचा पाठलाग करीत त्याच्या मुलखांत शिरले, व आपल्या तरवारींनीं व बंदुकांनीं मुलूख उध्वस्त केला. त्यांनीं नंतर अनेक शहरें घेतलीं. मशिदी व दर्गे पाडिले, आणि दया माया न करितां कत्तल उडविली. त्यांच्या या क्रूर व रानटी वर्तनानें असें दिसलें कीं, मुसलमानांचा सूड घेण्याची कित्येक वर्षांची हिंदूंची इच्छा त्यांनीं तृप्त करून घेतली. या दुःखदायक प्रसंगीं फेरोजशाहानें गुजराथच्या सुलतानाकडे कुमक मागितली. परंतु तो नुकताच तक्तावर बसला असल्यामुळें त्यास कांहींच करतां आलें नाहीं. शेवटीं दैवयोगानें शाहास चांगले दिवस आले, आणि त्याचा भाऊ अहमदखान (खानखनान) यानें त्यांच्याशीं वारंवार लढाया करून त्यांस राज्यांतून हांकून लाविलें. फेरोजशाहा आतां वृद्ध झाला.

लढाई होते, व मुसलमानांचा पराभव होतो.

हिंदूलोक मुसलमानाची कत्तल करितात, व मुसलमानांचें राज्य बुडण्याची वेळ येते.

होता. यामुळें या विपत्तीचा त्याच्या मनास इतका खेद झाला कीं, त्याची प्रकृति बिघडली, आणि मनही भ्रमिस्त झालें.

या त्याच्या भ्रमिस्तपणांत **हुशियर** आणि **बेदर** या दोघां गुलामांच्या हातीं त्यानें सर्व राज्यभार दिला, आणि त्याचा अम्मल एकसहा चालावा, म्हणून त्यानें आपलें सर्व वजन खर्च केलें. **खानखनान** लोकांस फार प्रिय असे, व आपणास तक्त मिळावें, अशी त्याची फार इच्छा होती. यास्तव हे दोघे गुलाम वजीर त्याचा हेवा करीत. त्यांनीं शाहास असें कळविलें कीं, जोंपर्यंत त्याचें राज्यांत वजन व अधिकार आहे तोंपर्यंत शाहाजादा **हसनखानास** दक्षणचें राज्य मिळण्याची आशा नाहीं. हा कांटा राज्यांतून काढून टाकिला तरच हसनखानास तक्त मिळेल. **महंमद जिसू दुराज** या सय्यदाच्या भविष्याचीही फेरोजशाहास आठवण झाली. आपल्या भावास अंध करून त्यास पुनः तक्तावर कधीं बसतां येऊंनये, असें करून टाकण्याचा त्यानें निश्चय केला. **खानखनानास** हा बेत कळतांच त्यानें पळून जाण्याची तयारी केली. रात्रीं आपला मुलगा **अल्लाउद्दिन** यास घेऊन सय्यदाच्या घरीं गेला, आणि त्याचा उपदेश व आशिर्वाद मागितला. त्यानें अल्लाउद्दिनाच्या डोक्यावरील पागोटें काढून त्याचे दोन तुकडे केले, आणि एक बापाच्या डोक्यावर आणि एक मुलाच्या डोक्यावर गुंडाळिले. आणि दोघांच्या मस्तकावर हात ठेवून दोघांसही बादशाही पद मिळणार आहे, असें सांगितलें. हा सय्यदाचा आशिर्वाद घेऊन **खानखनान** घरीं आला, आणि बाकीची रात्र तयारी करण्यांत घालवून उजाडतांच आपल्या ४०० विश्वासू लोकांस घेऊन वेशींतून निघाला. वेशींतच त्यास त्याचा फार जुना ओळखीचा प्रसिद्ध व्यापारी बसोऱ्याचा **खलीप हसन** हा भेटला. त्यास त्याचे बेत समजले होते. त्यानें खानखनानास पाहतांच खुद्द शाहास मुजरा करितात, तसा लवून त्यास मुजरा केला.

फेरोजशाहाचें दुर्बल व पुळपुळीत वर्तन.

शाहाचा भाऊ अहंमद तक्त मिळण्याचा यत्न करितो.

खानखनानानें त्यास सांगितलें कीं, तूं लागलाच घरीं जा नाहींतर तुला दरबारचे कामगार पाहतील, आणि माझ्या निमित्य शासन करतील. तेव्हां **हसनानें** असें उत्तर केलें कीं, तुझ्या वैभवाच्या वेळीं

मात्र तुझी दोस्ती करावी, आणि विपत्तिकाळांत तुला सोडून छी थू करावें, हें सद्गुणीमनुष्यास शोभत नाहीं. म्हणून माझ्या जिवांत जीव आहे, तोंपर्यंत मी आपल्या पुरस्कर्त्यास कधीं सोडणार नाहीं. तर तुला माझ्याजवळ ठेवून कांहीं महत्वाचें काम तुजकडून करून घेईन. त्याचें हें निर्वाळ्याचें बोलणें ऐकून खानखनानास आनंद झाला, आणि त्यानें बरोबर येण्यास हसनास परवानगी दिली, आणि म्हणाला कीं, जर मला तक्त मिळेल तर तुला मी वजिरी देईन व तुझ्या सल्त्यानें वागेन. नंतर त्यानें शहर सोडिलें, आणि खानखनापुरास तो जाऊन पोंहोंचला. तेथें पोहोंचल्यावर त्यानें असा नवस केला कीं, मला तक्त मिळालें तर या शहरचा सर्व वसूल **मक्का, मदिना, नजीफ** आणि **कर्बला** येथील फकिरांच्या खर्चाकडे नेमून देईन.

तो बेत सिद्धीस नेण्याकरितां त्याचे यत्न.

**खानखनान** पळाला हें **हुशियर** आणि **बेदर** यांस कळतांच ते मोठ्या उतावीळपणानें शाहाकडे गेले, आणि त्याची परवानगी घेऊन ४,००० स्वार व कांहीं हत्ती घेऊन जलदीनें निघाले. कांहीं सरदारांस वश करून आपल्या पक्षास मिळवून घेईपर्यंत कोठें तरी छपून राहावें असा खानखनानानें मनांत संकेत केला. परंतु खलीप हसनास हें आवडलें नाहीं, आणि त्यानें **कल्बुर्गे, बेदर** आणि **कल्याणी** या शहरीं लोक पाठवून फेरोजशाहाशीं बिघडलेल्या अशा पुष्कळ लोकांस त्यानें खानखनानाच्या पक्षाकडे आणिले. त्यांनीं लढाई न देतां एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्यांत बरेच दिवस घालविले. शेवटीं शाहाच्या वजीरांस चोहोंकडून कुमक आली, तेव्हां त्यांच्या तावडींतून सुटून जाण्याची आशा राहिली नाहीं. पादशाही फौज सुमारें ८,००० जमली, आणि खानखनानापाशीं सुमारें १,००० स्वार होते. या अणीबाणीच्या प्रसंगीं धान्याचा व्यापार करणारे कांहीं वणजार व्यापारी २,००० धान्याचे बैल घेऊन वऱ्हाडाहून येत होते, व कल्याणीच्या शेजारीं उतरले होते. त्याचप्रमाणें लाहोराहून कांहीं कारवान ३,००० विकाऊ घोडे घेऊन तेथेंच उतरले होते. खलीप हसनानें ते सर्व घोडे व बैल खरेदी करून प्रत्येक बैलावर एकेक मनुष्यास बसवून दक्षणच्या पद्धतीप्रमाणें त्यांच्या हातांत हिरवीं व तांबडीं निशाणें दिलीं. या

लष्कर्‍या फौजेच्या आघाडीस कांहीं स्वार ठेवून त्यांस असा हुकूम दिला कीं, लढाई सुरू झाली म्हणजे यांनीं दूर राहावें. आणि कांहीं सरदार आपल्या सुभेदारीवरून खानखनानास सहाय्य देण्याकरितां आले आहेत अशी कंडी उठवावी. खानखनानास हा बेत प्रथमतः पोरकट वाटला; परंतु शेवटीं तो अमलांत आणण्यास त्यानें रुकार दिला. सकाळीं कांहीं सरदार लोक व कांहीं बडेलोक आपणास मिळण्यास येत आहेत व ते अगदीं जवळ येऊन ठेपले आहेत, असें आपल्या लोकांस उत्तेजन देऊन तो शाहाच्या फौजेच्या तोंडावर हळू हळू निघाला. खानखनानास जर कुमक येऊन पोहोंचली, तर कठीण प्रसंग गुजरेल अशी हुशियर आणि बेदर यांस भीति वाटून एकदम लढाई देण्याचा त्यांनीं बेत केला. व या रीतीनें त्यास कुमक येऊन मिळण्यास प्रतिबंध होईल, असें त्यांचे मनांत आलें. लढाईस आरंभ होतांच खलीप हसनानें बैलांच्या आघाडीस आपला घोडा चालवून निशाण फडकावीत कांहीं अंतरावरील झाडींतून कूच करीत पुढें आला. तेणेंकरून शाहाच्या वजिरांस असें वाटलें कीं, खानखनानाच्या सहाय्यास जे सरदार येणार होते ते येऊन पोहोंचले. आणि त्याचक्षणीं शाहाच्या फौजेवर खानखनानानें मोठ्या निकरानें हल्ला करून शाहाच्या फौजेच्या उजव्या फळींत फार धांदल उडवून दिली. हुशियर आणि बेदर हे मध्यभागीं होते. आपले लोक पळत आहेत असें पाहून आणि खानखनानाचीही लष्करी कुमक नजीक पोहोंचल्यामुळें ते भिऊन त्यांचे हातपाय गळाले, आणि लढाई करण्याचा त्यांस दम राहिला नाहीं. यामुळें खानखनानानें त्यांची दाणादाण उडवून त्यांस रणांतून हांकून दिलें. या प्रमाणें एकाएकीं खानखनानास जय मिळतांच त्यानें त्यांचा पाठलाग करून त्यांचे पुष्कळ हत्ती व घोडे हस्तगत केले. असें त्याचें नशीब उघडतांच शाहाच्या फौजेंतील शेंकडों लोक चोहोंकडून येऊन त्यास मिळाले.

शाहाची प्रकृति भ्रमिष्ट व नादुरुस्त झालेली होती, तरी त्यानें शाहाजादा हसनखान याच्या मस्तकावर पादशाही छत्र धरविलें, आणि कांहीं विश्वासू शिपायांच्या स्वाधीन किल्ला करून वार्धक्यामुळें घोड्यावर बसतां येईना, म्हणून पालखींत बसून पुष्कळ सर-

दार ४,००० घोडे, पुष्कळ पायदळ, कांहीं तोफा, पुष्कळ हत्ती असें सैन्य घेऊन आपला भाऊ **खानखनान** याजबरोबर लढाई करण्यास निघाला. शहरापासून कांहीं मैलांवर लढाई झाली. तिजमध्यें फेरोजशाहा ज्या ठिकाणीं होता, त्या ठिकाणीं शत्रूंनीं त्याजवर मोठ्या निकरानें हल्ला करून दाणादाण उडविली. त्यावरून शाहा लढाईंत पडला, अशी कंडी उठली, व त्याबरोबर शाहाकडील पुष्कळ कामगार व शिपाई खानखनानास जाऊन मिळाले. या प्रमाणें शेंकडों सरदार खानखनानास जाऊन मिळतांच **हुशियर** आणि **बेदर** भ्याले, आणि शाहास घेऊन किल्ल्यांत पळाले. भयानें व थकव्यानें शाहास जी मूर्च्छा आली होती, तिजमधून शाहा वेशींत येऊन पोहोंचला तेव्हां सावध झाला.

शाहाविषयीं आपली पूज्यबुद्धि दाखविण्याकरितां **खानखनाना**नें आपल्या लोकांस शाहाचा पाठलाग करूं दिला नाहीं; परंतु शाहा किल्ल्यांत पोहोंचला, असें जेव्हां त्यानें ऐकिलें तेव्हां तो राजधानीकडे गेला. आणि किल्ल्याच्या तटाच्या आश्रयास छावणी देऊन उतरला. **हुशियर, बेदर** आणि शाहाजादा **हसन** यांनीं तटाच्या बुरुजावर लोक व दारूगोळा चढवून वेढा घालणाऱ्या लोकांवर तिरांचा व गोळ्यांचा वर्षाव करून त्यांस मागें हटवूं लागले. **खानखनाना**च्या तंबूंत एक गोळा येऊन पडला. आणि त्याजवळ बसलेले कांहीं लोक जखमी झाले, तेव्हां **खानखनान** मागें हटून दूर अंतरावर जाऊन उतरला. शेवटीं **फेरोजशाहा**नें शाहाजादा **हसनखान** यास बोलावून असें सांगितलें कीं, राज्यांतील सरदार व फौज यांच्या दिलावर सुरक्षितें राज्य अवलंबून असतें; आणि बहुतेक सरदार व बहुतेक फौज तुझ्या चुलत्यास जाऊन मिळाली आहे. तेव्हां तूं आतां त्यास प्रतिबंध करण्याचें सोडून दे. नाहीं तर विनाकारण लोकांवर अरिष्टें मात्र गुदरतील. असें सांगून किल्ल्याच्या वेशी उघडण्यास शाहानें हुकूम दिला, आणि **खानखनानास** त्याच्या कांहीं लोकांसह किल्ल्यांत घेतलें. शाहाच्या बिछान्याजवळ जातांच **खानखनानानें** त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. तेव्हां खानखनान भेटल्यामुळें फेरोजशाहानें आपला आनंद दर्शविला. आणि आपल्या भावास तक्त मिळाल्याचें पाहण्यास अल्लानें आपल्यास वांचविलें याबद्दल त्यानें अल्लाची फार स्तु-

ति केली. कारण बादशाही तक्तास सर्व प्रकारें तूंच योग्य आहेस. केवळ पुत्रममतेमुळें माझ्या मुलास तक्त मिळावें, अशी मला स्वाभाविक इच्छा उत्पन्न झाली होती. परंतु त्यांत माझी आतां निराशा झाली. मी आतां सर्व राज्य अल्लाच्या स्वाधीन करितों, आणि माझ्या मुलास मी तुझ्या हवाली करितों. असें म्हणून **फेरोजशाहानें** **खानखनानास** तक्तावर चढण्यास सांगितलें, आणि मी जे कांहीं चार दिवस वांचेन तों पर्यंत पाहुण्याप्रमाणें माझी वागपूस कर, अशी शाहानें त्यास विनंति केली. त्याच दिवशीं हिजरी सन ८२५ चंद्र ५ सव्वाल या रोजीं **खानखनानानें** पादशाही छत्र धारण करून **फेरोज** तक्तावर बसला, आणि **अहंमदशाहा बाहामिनी** हा किताब धारण केला, आणि आपल्या नांवानें नाणें पाडण्यास व खुतबा वाचण्यास हुकूम दिला. यानंतर दहा दिवसांनीं छ १५ सव्वाल रोजीं **फेरोजशाहा** मरण पावला. त्याच्या पूर्वजांच्या कबरीसन्निध मोठ्या डौलानें व समारंभानें त्याच्या प्रेताचें दफन केलें. त्यानें २५ वर्षें ७ महिने आणि १५ दिवस राज्य केलें.

खानखनानास तक्त प्राप्त होणें.

खानखनान तक्तावर बसतो. सप्टंबर १४२२ इ.

फेरोजशाहाचा मृत्यु. छ. १५ सव्वाल हिजरी सन ८२५ सप्टंबर सन १४२२ इ.

कित्येक इतिहासांत असें लिहिलें आहे कीं, **अहंमदशाहानें** आपल्या वृद्ध भावास मुद्दाम मारविलें, असें लोक ह्मणतात; परंतु त्यास कांहीं आधार मिळत नाहीं.

---

# अहंमदशाहा वली+ बाहामिनी.

इ॰ स॰ १४२२ ते १४३२प॰

अहंमदशाहा माजी शाहाचे प्रधानास कामावर ठेवितो.—— माजी शाहाच्या मुलास राहण्याकरितां एक वाडा देतो.—— उत्तर सरहद्दीवर बंदोबस्ताकरितां फौज जमवितो,—— आणि विजयानगरचा राजा देवराय यावर दक्षिणेकडे स्वारीस जातो.—— वरंगूळचा राजा देवराचास मिळतो;—— परंतु मागून सैन्य घेऊन परत जातो.—— देवरायावर एकाएकीं छापा पडून तो कैद होतो, परंतु तो सुटून जातो.—— विजयानगर मांत अहंमदशाहा लुटून उध्वस्त करितो.—— हिंदु लोकाची एक टोळी शाहास ठार मारण्याकरितां आपले जीव बळी देण्याची प्रतिज्ञा करिते.—— ते शाहास घेरतात.—— आणि मोठ्या कष्टानें शाहा जिवंत सुटून जातो.—— दक्षणेंत मोठा दुष्काळ.—— शाहा वरंगूळ घेतो, व राजास मारितो.—— कलम येथें हिऱ्यांची खाण सांपडते.—— माळव्याचा सुलतान केरळच्या राजावर हल्ला करितो, व तो राजा अहंमदशाहापाशीं कुमक मागतो.—— माळव्याच्या सुलतानाबरोबर लढाई.—— व तींत त्याचा पराभव होतो.—— तह होतो.—— माळव्याचा सुलतान केरळावर पुनः स्वारी करितो.—— लढाईंत राजा पडतो.—— अहंमदशाहा पुनः माळव्याच्या सुलतानाबरोबर लढाईस जातो.—— खानदेशच्या राजाच्या मदतीनें तह होतो.—— शाहाचा मृत्यु.

---

मुलकी व दिवाणी कामाची माहिती **अहंमदशाहास** चांगली होती. आपल्या भावाच्या राजशैलीस अनुसरूनच सय्यद लोकांस आणि सर्व विद्वान व साधू लोकांस तो फार मान देत असे; आणि त्यांच्या हिताकरितां कोणतीही गोष्ट करण्यास चुकत नसे. सय्यद **महंमद जिसूदुराज** यानें जें भविष्य केलें त्याबद्दल यानें आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं त्या महंतावर पुष्कळ कृपा केली., राजाचा कित्ता प्रजा साधारणपणें नेहमीं वळविते. त्यामुळें दक्षणचे सर्व मुसलमान धर्माच्या बाबतीं-

---

+ हिंदुस्थानच्या बादशाहानें वली (साधु) हा किताब धारण केल्याचें हें एवढेंच उदाहरण आहे.

त त्या सय्यदास गुरुस्थानीं समजूं लागले. यामुळें सर्व पंथाचे लोक त्याच्या घरीं त्या सय्यदाच्या दर्शनास जाऊं लागले. **शेख शिराज उद्दीन** या साधूच्या घराण्यावर शाहाचें प्रेम कमी होऊन या सय्यदाच्या घराण्यावर शाहाची मेहेरबानी फार झाली. आणि कित्येक शहरें, खेडीं, आणि कलबुर्ग्याजवळील विस्तीर्ण जमिनी शाहानें त्यास कायमच्या इनाम करून दिल्या. शिवाय शहराजवळ त्याच्याकरितां एक मोठी सुंदर पाठशाळा बांधिली. बाहामिनी घराण्याकडून जरी हा प्रदेश विजापूरच्या बादशाहाकडे गेला, तथापि आदिलशाही कारकीर्दीत सय्यदाच्या वंशजाकडे या सर्व जमिनी चालत होत्या. दक्षणचे लोक या साधूस इतकें पूज्य मानीत कीं, दक्षणच्या कोणत्याही मुसलमानास **महंमद पैगंबर** किंवा हा सय्यद या दोहोंपैकीं मोठा कोण? असा प्रश्न कोणी विचारिल्यास त्याबद्दल थोडें आश्चर्य वाटे. आणि तो असें उत्तर देई कीं, जरी **पैगंबर** हा निःसंशय फार मोठा पुरूष होता, तथापि **सय्यद महंमद जिसू दुराज** हाही फार मोठा साधू होऊन गेला.

तक्तावर बसल्यानंतर अहंमदशाहानें आपलें सैन्य सुधारण्याकडे फार लक्ष दिलें. कारण माजी शाहाच्या कारकीर्दीत विजयानगरच्या राजानें जी स्वारी केली होती, तिचा सूड घ्यावयाचें त्याच्या मनांत होतें. त्यानें **खलीप हसन** यास **वकील उस सुलतनद** हा किताब देऊन १२,००० स्वारांच्या पथकावर नेमिलें, आणि तो व्यापारी होता म्हणून त्यास आणखीं **मलिक उत् तुजार** हा किताब दिला. याचा अर्थ व्यापाऱ्यांचा राजा किंवा प्रमुख असा आहे. दक्षणेंत या किताबास फार मान्यता होती, व हा किताब मिळाला म्हणजे मोठा सन्मान झाला असें समजत. माजी शाहाच्या प्रधानाचा इमानीपणा पाहून त्यांवर विश्वास ठेवणें योग्य होईल, असें **खलिप हसनास** वाटलें, आणि त्याच्या तर्फे त्यानें शाहापाशीं मध्यस्थि केली. तेव्हां त्याच्या शिफारसीवरून **हुशियर ऐन उल्मुल्क** यास **अमीर उल् उमराव** हा किताब देऊन १,५०० स्वारांवर त्यास अधिकारी नेमिलें. आणि **बेदर निजाम उ-**

अहंमदशाहा माजी शाहाच्या प्रधानास कामावर ठेवितो.

ऌमुल्क यास **दौलताबाद**च्या सुभ्यावर नेमून त्यास २,००० स्वारांच्या पथकाचा अधिकार दिला. बाह्यामिनीशाह्याच्या कारकीर्दीत सर्वांत मोठी सरदारी म्हणजे २,००० स्वारांची होती. व या सरदाऱ्या फक्त चार सुभ्यांच्या तरफदारांस मात्र मिळत. या खालीं स्वारांच्या संख्येप्रमाणें दर्जा कमी कमी होत अगदीं कनिष्ठ प्रतीच्या सरदाराच्या ताब्यांत २०० स्वार असत. याहून कमी स्वार ज्यांच्या ताब्यांत असत, त्यांची सरदारांत किंवा बडेलोकांत गणना होत नसे. १,००० स्वारांवरील अमीरास तोगैं, अलम (निशाण) आणि नौबत घेण्याचा त्याच्या दर्जाचा हक्क असे.

माजी शाह्याचा पुत्र **हसनखान** हा जरी दक्षणच्या पादशाहीचा कायदेशीर वारस होता, व त्यास प्रधानांनीं कडेकोट प्रतिबंधांत ठेवावें किंवा मारून टाकावें, अशी सल्ला दिली, तरी ती न ऐकतां अहंमदशाहानें त्यास ५०० स्वारांची अमिरी देऊन फेरोजाबादेचा वाडा राहण्यास दिला, आणि खर्चाकरितां मोठी नेमणूक करून दिली. तसेंच आपल्या वाड्याच्या सभोंवार ८ मैलपर्यंत पाहिजे तेव्हां शिकारीस किंवा मौज मारण्यासही परवानगी दिली. हा शाहाजादा फार चैनबाज होता. यामुळें राज्यकारभारापेक्षां चैन मारण्यास मोकळीक मिळाली, याचा त्यास अधिक संतोष झाला. आपला चुलता जिवंत अ-

माजी शाह्याच्या मुलास राहण्याकरितां अहंमदशाहा एक वाडा देतो.

---

लष्करी किताब देण्याची चाल फार प्राचीनकाळापासून आढळते. बेबलांत १० व १०० लोकांचें क्यापटन् असें आढळतें. रोमनलोकांत १०० लोकांवरच्यांस सेंचुरिअन म्हणत. तार्तार लोक १०० व १,००० लोकांवरील अंमलदारांस युझबशी व मीनबशी म्हणत. हिंदुस्थानांत मुसलमानांनीं ही वहिवाट आणिली. आणि ५,००० स्वारांची सरदारी किंवा पांच हजारी हा सर्वांत मोठा लष्करी हुद्दा समजत. व याहून जास्त फौजेवरील अम्मलदारास सरलष्कर म्हणत.

* तिबेटांतील गाईच्या शेंपटाचा केलेला हा फरारा होता. तार्तार लोकांनीं ही चाल हिंदुस्थानांत आणिली, व यूरोपांतही नेली. युरोपिअन लोक आपला फरारा घोड्याच्या केंसांचा करितात.

सेपर्यंत तो मोठ्या सुखानें राहिला. आणि शाहाशीं त्याचा कोणताही कलह झाला नाहीं. परंतु **अहंमदशाहाच्या** पश्चात् यास अंध करून फेरोजाबादेच्या महालांत कैदेंत ठेविलें.

अहंमदशाहानें आपल्या सद्गुणांनीं प्रजेची पूर्ण प्रीति संपादन केली, आणि उत्तरसरहद्दीवर गुजराथेंतून आपल्या मुलखावर स्वारी होऊंनये, म्हणून मोठी फौज ठेवून सुमारें १०,००० स्वार घेऊन कर्नाटकाकडे कूच केलें. देवरायानें विलंब नलावितां आपली फौज जमा केली, आणि **वरंगूळच्या** राजास कुमकेस बोलावून मुसलमानांचें समूळ उच्चाटन करण्याच्या इराद्यानें तुंगभद्रेच्या कांठीं जंगी फौज घेऊन तो आला.

शाहा उत्तरसरहद्दीवर बंदोबस्त करून विजया नगरावरस्वारी करितो.

अहंमदशाहा पैलतीरीं येऊन पोहोंचल्यावर शत्रूच्या पायदळास रात्रीं छापे घालितां येऊनयेत, म्हणून तुर्की लोकांच्या वहिवाटी प्रमाणें आपल्या छावणी सभोंवार गाड्यांचा गराडा देऊन तेथें त्यानें ४० दिवस मुक्काम केला. या काळांत याची तुरळक फौज तुंगभद्रेच्या उत्तरकिनाऱ्यावरील देवरायाचा मुलूख उध्वस्त करीत होती. या युक्तीनें शाहास अशी आशा होती कीं, शत्रू नदीउतरून ज्या ठिकाणीं छावणी होती, तेथें लढाई देण्यास येतील. कारण तें ठिकाण लढाई करण्यास फार सोयीचें होतें. परंतु त्याचे हे सर्व यत्न व्यर्थ गेले. शेवटीं अशी दिरंगाई करण्याचा त्यास कंटाळा येऊन शाहानें आपल्या सर्व सरदारांस कचेरीस बोलावून सल्ला विचारिली. तेव्हां सर्वानुमतें असें ठरलें कीं, नदी उतरून शत्रु ज्या ठिकाणीं उतरले आहेत, तेथेंच त्यांवर हल्ला करावा. तेव्हां दुसऱ्या दिवशीं सकाळीं शाहानें तसें करण्याचा निश्चय केला. वरंगूळचा राजा यापूर्वींच देवरायास सोडून आपल्या फौजेसह माघारा गेला होता. **लोदीखान, अदमखान** आणि **दिलवरखान** यांनीं रात्रीस कूच केलें, आणि कांहीं अंतरावर नदी उतरून उजाडण्याच्या सुमारास शत्रूच्या छावणीनजीक जाऊन भिडले. त्यावेळीं देवराय एका मोठ्या उंसाच्या फडानजीकच्या एका बागेंत निजला होता, व त्याजवळ अगदीं थोडेलोक होते. मुसलमानांची एक टोळी लुटीकरितां त्या बागेंत शिरली होती. गलबल होतांच राय जागा झाला, व अंथरुणावरून एकाएकीं उघड्या बोडक्याच उठून शेजारच्या उंसाच्या फडांत प-

देवरायावर एकाएकीं छापा पडून तो कैद होतो.

ळून गेला. तेथें त्यास शिपाई भेटले. त्यांस हा कोणी खेडचा माणूस आहे, असें वाटून त्याच्या डोक्यावर त्यांनीं एक उंसाची मोळी दिली, आणि आपल्यापुढें चालण्यास त्यास सांगितलें. आपण कोण आहों हें त्यांस समजलें नाहीं, असें देवरायास वाटून तें ओझें त्यानें लागलेंच डोक्यावर घेतलें आणि चालला. कारण त्यास अशी आशा आली कीं, ओझें शत्रूच्या छावणींत पोंचविलें म्हणजे आपली सुटका होईल.

ते फार दूर गेले नाहींत, तोंच **अहंमदशाहा** नदी उतरून आलीकडे आला. आणि **देवराय** नाहींसा झाला आहे, अशी बातमी हिंदूंच्या छावणींत पसरली. कांहीं प्रतिबंध न होतां शाहा हिंदूंच्या छावणींत शिरला. तेव्हां देवरायास घेऊन जे शिपाई येत होते, ते उंसाहून जास्त मैल्यवान् लूट मिळविण्याच्या आशेनें **देवरायास** सोडून देऊन आपल्या लोकांत जाऊन मिसळले. तेव्हां देवराय कोणास न समजतां पळाला. वाटेंत त्याच्या पदरच्या कांहीं कामगारांनीं त्यास ओळखिलें, तेव्हां तेही त्यास मिळाले. आणि त्यां सहवर्तमान दोन प्रहरीं तो छावणींत येऊन पोंहोंचला. तेव्हां त्याच्या लोकांस मोठा आनंद झाला. तो येतांच त्याच्या सैन्यांत थावराथावर करून त्याचे सरदार कांहीं शिस्त बसवूं लागले, परंतु नुक्ती घडलेली गोष्ट हा मोठा अपशकून झाला. असें समजून मैदानांत शत्रूशीं लढाई करण्याचा विचार एकीकडे ठेवून देवराय विजयानगरास पळून गेला.

*देवराय सुटून पळून जातो.*

हिंदूंच्या राजधानीस वेढा न देतां आसपासचा मुलूख **अहंमदशाहानें** घेतला. आणि माजी शाहा व विजयानगरचा राजा यांमध्यें झालेल्या करारांस न जुमानितां जेथें जेथे गेला, तेथें तेथें दया माया न करितां पुरूष, स्त्रिया व मुलें यांची कत्तल करीत सुटला. जेव्हां कत्तलीची संख्या २०,००० होई; तेव्हां तीन मुक्काम करून मोठा उत्साह करी. यानें पुष्कळ हिंदु लोकांचीं देवळें पाडिलीं, व मूर्ति फोडिल्या, व ब्राम्हणांच्या पाठशाळा जमीनदोस्त केल्या. या प्रमाणें अनर्थ चालला असतां आपल्या पवित्र इमारतींचा नाश होऊन मूर्तिंचा जो उपमर्द झाला, तेणेंकरून त्वेष येऊन ५,००० हिंदूंनीं या आपल्या अरिष्टांचा उत्पादक जो

*विजयानगरच्या राजाचा मुलूख अहंमदशाहा लुटून उध्वस्त करितो.*

शाहा त्यास ठार मारण्याचा यत्न करण्यासाठीं आपले जीव बळी देण्याची शपथ घेतली. आपला हेतु सिद्धीस नेण्याकरितां त्यांनीं हेर ठेविले, आणि शाहा कोठें जातो, काय करितो, याची पाळत राखून आपला हेतु साधण्याजोगी संधि मिळतांच यत्किंचित विलंब न करितां शाहास मारण्याचा त्यांनीं निश्चय केला. एके दिवशीं असें झालेकीं, शिकारीच्या नादांत आपल्या लोकांपासून **अहंमदशाहा** दूर गेला आणि छावणीपासून सुमारें १२ मैल अंतर पडलें. ही खबर हिंदूंस कळतांच लागलेच ते त्यास

हिंदुलोकांचीटोळी शाहास मारण्याकरितां आपले जीव बळी देण्याचीप्रतिज्ञा करिते.

अडविण्यास निघाले, आणि तो दिसूं लागला इतके त्याच्या जवळ जाऊन पोहोंचले. या वेळीं त्याचे २०० मोंगल हुजरेही त्याजपासून बऱ्याच अंतरावर होते. शत्रूंस पाहतांच शाहानें घोड्यास टाच मारिली, आणि मैदानांत एक गुरांचा कोंडवाडा होता, त्यांत आश्रय घेण्याच्या आशेनें निघाला. परंतु हिंदु लोक त्याच्या पाठोपाठ इतक्या त्वरेनें आले कीं, ते येऊन पोंहोंचण्यापूर्वी वाटेंत जी एक ओघळ लागली, ती शाहास ओलांडून जातां आली नाहीं. सुदैवेंकरून शाहाचे कांहीं तिरंदाज तेथें त्याचक्षणीं येऊन पोहोंचले, व त्यांनीं शत्रूस कांहीं वेळ अडवून धरिलें. तेव्हां शाहास त्या कोंडवाड्यांत जाण्यास संधि मिळाली. हिंदु लोक त्यांत शिरण्यास यत्न करूं लागले, आणि मोठी निकराची झटापट झाली. मुसलमानांनीं अल्लाचें स्मरण करून हिंदूंच्या स्वाधीन होण्यापेक्षां मारूं किंवा मरूं अशी शपथ घेतली. या प्रसंगीं **सय्यद हसन बदक्षी, मीर अल्ली शिस्तानी, मीर अल्ली काबुली** व **अबदुल्ला खुर्द** यांनीं मोटें शौर्य दाखविलें, व शाहाच्या कृतज्ञतेस पात्र झाले. या छोट्या टोळींतील बहुतेक लोक मेले, किंवा जखमी झाले. तेव्हां हिंदु लोक त्या कोंडवाड्याच्या भींतीपाशीं येऊन भिडले, आणि खोरीं कुदळी घेऊन भिंती पाडूं लागले. तेव्हां शाहाची अगदीं पांचावर धारण बसली. याच आणीबाणीच्या प्रसंगीं शाहाचा चिलखतवाला **अबदूल कादर** थोडीशी फौज घेऊन शाहाच्या शोधार्थ फिरत होता, तो तेथें अकस्मात आला. हिंदु भिंतीस मोठें भोंक पाडून मोठ्या हातघाईनें लढत होते. इतक्यांत आपल्या पिछा-

ते शाहास गांठतात.

अबदुल कादर हिंदूवर हल्ला करितो, व शाहा मोठ्या कष्टानें जिवंत सुटून जातो.

डीवर कोणी एकाएकीं हल्ला केला. असें त्यास आढळून आलें. तेव्हां शाहास दम येऊन आपल्या जवळच्या लोकांसुद्धां त्यानें हिंदूंवर निकरानें हल्ला केला. तेव्हां मोठी हातघाईची झटापट होऊन शत्रूंचा त्यानें पराभव केला, व १,००० लोकांस ठार मारिलें. मुसलमानांपैकींही सुमारें ५०० लोक मेले. **अबदूल कादरानें** जें अवचित सहाय्य केलें, त्यामुळें अगदीं मृत्यूच्या तडाक्यांतूनच राज्योपभोग घेण्यास **अहंमदशाहा** वांचला. ही मोठी चमत्कारिक व ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट घडली कीं, हिंदु व मुसलमान राजे सैन्य घेऊन लढाई करीत असतां एकाच स्वारींत त्यांनीं अशा संकटांत पडावें, व दोघांचीही कांहीं इजा न होतां सुटका व्हावी. **अहंमदशाहा** आपल्या छावणींत परत येतांच **अबदूल कादरास** त्यानें २,००० स्वारांची सरदारी देऊन वऱ्हाड प्रांताच्या सुभेदारीवर नेमिलें. तसेंच त्यास **खान जहान** हा किताब दिला, व त्यास **'जीव देणारा बंधु'** व **इमानी मित्र** असें म्हणूं लागला. कादराचा भाऊ **अबदूल लतीब** यासही हीच पदवी देऊन **अझीमखान** हा किताब दिला. शाहाची सुटका करण्यांत ज्या दुसऱ्या पुरुषांनीं श्रम केले होते, त्यांसही शाहानें मोठ्या देणग्या व किताब दिले. या प्रसंगीं मोंगल तिरंदाज फार उपयोगीं पडले. म्हणून शाहानें **मलिक उत् तुजार** यास ३,००० तिरंदाजांचें एक नवीन पथक करून देऊन त्यांत **इराक+, खोरासान, मावेरलन्हेर, तुर्कस्तान** आणि **अरबस्थान** येथील लोकांस ठेवावें असा हुकूम दिला. आणि आपल्या सर्व कामगारांस असा हुकूम दिला कीं, त्यांनीं स्वतः, त्यांच्या मुलांनीं व पदरच्या लोकांनीं तिरंदाजी* शिकावी.

यानंतर अहंमदशाहानें विजयानगरच्या आसपासचा सर्व मुलूख उध्वस्त करून विजयानगराकडे कूच केलें; व त्यास असा कडेकोट वेढा दिला कीं, विजयानगरचे लोक अत्यंत संकटांत पडले. तेव्हां आपल्या लोकांचा बचाव करण्यासाठीं देवरायानें तहाचें बोलणें कर-

---

+ सिरिया, इराण व तार्तरी या तिहींस इराक म्हणतात.

* यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, या वेळीं तोफा किंवा बंदुका या दोहोंचाही उपयोग करीत नव्हते.

ण्यास शाहाकडे वकील पाठविले; व पुढील शर्तीवर तह करण्याचें शाहानें मान्य केलें. त्या शर्ती येणें प्रमाणेः– कित्येक वर्षांची खंडणीची जी बाकी तुंबली आहे, ती आपल्या उत्तम हत्तींवर लादून नगारे नौबत व करणें वाजत मोठ्या स्वारीच्या थाटानें आपल्या मुलाबरोबर शाहाच्या छावणींत देवरायानें पाठवावी. ही शर्त अमान्य केली असतां चांगला परिणाम होणार नाहीं, असें समजून तुंबलेल्या बाकीचा सर्व ऐवज ३० हत्तींवर लादून देवरायानें आपल्या मुलाबरोबर शाहाच्या छावणींत पाठविला. शाहानें कांहीं सरदार सामोरे पाठविले, आणि त्यांनीं छावणीच्या बाजारांतून व मुख्य रस्त्यांतून फिरवीत त्यांस शाहाच्या हुजूर नेलें. शाहानें देवरायाच्या मुलाची भेट घेऊन त्यास तक्तानजीक बसण्यास परवानगी दिली, आणि त्यास मोठा पोषाख देऊन व रत्नजडित जंब्या नजर करून निरनिराळ्या देशचे २० सुंदर घोडे, एक नर हत्ती, कांहीं शिकारी कुत्रे, व कांहीं बहिरी ससाणे नजर केले. कर्नाटकच्या लोकांस तोंपर्यंत बहिरी ससाणे माहीत नव्हते. नंतर शाहाचें सैन्य विजयानगराहून विजयानगरच्या राजपुत्रासहवर्तमान निघालें. कृष्णानदीच्या किनारीं पोहोंचल्यावर शाहानें राजपुत्रास परत जाण्यास निरोप दिला, आणि शाहाचें सैन्य कल्बुर्ग्यास परत गेलें.

विजयानगरच्या राजाशीं तह.

या सालीं मोठें आवर्षण पडून सर्व दक्षणेंत मोठा भयंकर दुष्काळ पडला; आणि पाण्याच्या तुटवड्यामुळें हजारों गुरें रुक्ष मैदानांत पटापट मेलीं. यामुळें शाहानें फौजेंतील लोकांचे रोजमुरे वाढविले, आणि गरीब लोकांस सरकारी कोठारांतील धान्य देण्यास सुरुवात केली. दुसऱ्या वर्षींही आवर्षण पडलें. तेव्हां लोकांचा धीर गेला, व ते दंगे बखेडे करूं लागले. आणि सर्व असें म्हणूं लागले कीं, प्रस्तुतचें राज्य हतभागी असून शाहाचें वर्तन परमेश्वरास आवडत नाहीं. तेव्हां शाहास फार दुःख झालें, आणि मशीदींत जाऊन परमेश्वरानें प्रजेवर दया करावी एतदर्थ त्यानें प्रार्थना केली. परमेश्वरानें त्याची प्रार्थना ऐकिली. कारण लौकरच खूब पाऊस पडला. तेव्हां ज्यांनीं शाहाची निंदा केली होती, तेच शाहाची फार स्तुति करून वली (साधु) म्हणजे अद्भुत गोष्टी करणारा असें म्हणूं लागले. असा चमत्कार घडल्यावर शाहा अल्लाचे गुण गात व आभार मानीत मोठ्या आनंदानें महा-

दक्षणेंत मोठा दुष्काळ.

त्नांत आला, व लोकांनींही जयजयकार केला; व आपल्या अविचाराचा त्यास पश्चात्ताप झाला.

मागील लढाईंत वरंगूळचा राजा विजयानगरच्या राजास मिळाला होता. म्हणून तेलंगण प्रांत सर करून त्याचें पारिपत्य करावें, या इराद्यानें हिजरी सन ८२८ (इसवी सन १४२५) या सालीं शाहानें फौज घेऊन तेलंगणाकडे कूच केलें. गोंवळकोंड्यास पोहोंचल्यावर **अझीमखानास** कांहीं सैन्य देऊन पुढें पाठविलें, व आपण २७ दिवस पर्यंत मुख्य फौजेसुद्धां तेथें राहिला. या काळांतच त्यास अशी खबर येऊन पोहोंचली कीं, अझीमखानाबरोबर जरी सैन्य थोडें होतें, तरी त्यानें शत्रूचा पराभव करून ७,००० हिंदूंस ठार मारिलें; आणि राजा लढाईंत पडल्यामुळें वरंगूळचा प्रांत ताब्यांत घेतला. तेव्हां शाहा लागलाच वरंगूळ प्रांतांत गेला, आणि राजाचा सर्व जामदारखाना त्यानें ताब्यांत घेतला. कित्येक काळपर्यंत भर पडत जाऊन जमविलेलें द्रव्य जामदारखान्यांत असून अद्याप पर्यंत कोणाचा हात त्यास लागला नव्हता. शाहानें **खान अझिमास** १० मोठे व १० लहान हत्ती, रत्नजडित कमरबंद, चार पदरी मोत्यांची कंठी, आणि पुष्कळ द्रव्य दिलें. नंतर तेलंगणच्या बाकीचा मुलूख सर करण्यास शाहानें **खान अझिमास** पाठविलें. त्यानें ४ महिन्यांत तें काम समाप्त केलें, आणि **वरंगूळ** येथें शाहास येऊन मिळाला. आणि कैलासवासी रायाच्या वारसांच्या ताब्यांत राहिलेलीं कांहीं बळकट ठाणीं घेण्यासाठीं **खान अझिमास** मागें ठेवून शाहा कलबुर्ग्यास गेला.

शाहा वरंगुळावर स्वारी करितो. हिजरी सन ८२८ इ.स.१४२५.

शाहा वरंगूळ घेतो व राजास मारितो.

माहूरच्या बंडखोर जमेदाराच्या ताब्यांत अद्याप बरींच बळकट ठाणीं राहिलीं होतीं; व तेथील लोकांनीं मुसलमानी फौजेस दाद दिली नव्हती. तीं ठाणीं घेण्यासाठीं हिजरीसन ८२९ (इसवीसन १४२५) सालीं अहंमदशाहा निघाला. बंडखोर जमेदार लौकरच शरण आला, व शाहानें त्यास माफी करण्याचें वचन दिलें, तत्राप तो जमेदार स्वाधीन होतांच वचन मोडून शाहानें त्यास व त्याच्या पांच किंवा सहा हजार लोकांस ठार मारिलें, आणि कैद के-

माहूरच्या बंडखोर जमेदारावर शाहा स्वारी करितो, व माफीचें वचन देऊन त्याच्या ६,००० लोकांसह त्यांस ठार मारितो इ.स.१४२५.

लेल्या सर्व बायकापोरांस जबरीनें मुसलमान केलें. या स्वारींत गोंडवणच्या मुलखांतील **कलम** या ठिकाणीं शाहास एक हिऱ्यांची खाण सांपडली. या प्रांतांत शिरून शाहानें हिंदूंचीं पुष्कळ देवळें जमीनदोस्त केलीं, व त्या ठिकाणीं मशिदी बांधिल्या. आणि प्रत्येक मशिदीस तेथील फकीर लोकांच्या निर्वाहाकरितां व दिवाबत्तीकरितां कांहीं जमिनी लावून दिल्या. या समयीं शाहाचा सुमारें एक वर्षभर **एलिचपूर** येथें मुकाम होता. यावेळीं त्यानें **गावळचा** किल्ला+ बांधिला, आणि **नरनाळच्या** किल्याची दागदुजी केली. नंतर परत कलबुर्ग्यास आला.

कलम येथें हिऱ्यांची खाण सांपडते.

या प्रमाणें अहंमदशाहा जवळ जवळ येत चालला असें पाहून, माळव्याचा सुलतान **हुशंगशाहा** यानें केरळचा राजा **नरसिंगराय** याकडे असें बोलणें लाविलें कीं, आपण उभयतां एकत्र होऊन बाहामिनीशाहावर स्वारी करूं. रायानें हें बोलणें मान्य केलें नाहीं. तेव्हां सुलतान हुशंग यानें याच्या मुलखावर दोन वेळां स्वारी केली, व दोन्ही वेळां त्यास मागें हटावें लागून फार हानि झाली. तथापि तिसऱ्या वेळीं सुलतान हुशंग यानें नरसिंगरायावर असा एकाएकीं हल्ला केला कीं, त्यास आपली फौज जमविण्यास अवधि न मिळाल्यामुळें किल्यांतच आश्रय घेऊन राहणें भाग पडलें. तेव्हां हिजरीसन ८३० (इसवी सन १४२६) सालीं **अहंमदशाहा**कडे कुमक मागितली, व असें कळविलें कीं, **फेरोजशाहा बाहामिनीचा** मांडलिक झाल्या दिवसापासून मी कधीं शाहाची आज्ञा मोडिली नाहीं, व यामुळें सभोंवतालचे सर्व राजे मला आपल्या घराण्याचा ताबेदार असें समजतात. यास्तव या प्रसंगीं मला कुमक पाठविण्यास शाहाकडून हयगय होणार नाहीं, अशी मला खात्री आहे. त्याप्रमाणें **अहंमदशाहानें** **वऱ्हाड**चा

माळव्याचा सुलतान केरळच्या राजावर हल्ला करितो, व तो राजा अहंमदशाहापाशीं कुमक मागतो. इसवी सन १४२६.

---

+ बांधिला याचा अर्थ पुनः बांधिला किंवा दुरुस्त केला असा असावा. जर तो मुसलमान राजांनीं मूळचा बांधिला असता, तर त्यास याहून दुसरें नांव मिळालें असतें. त्याच्या प्रस्तुतच्या नांवावरून तो किल्ला हिंदुराजांनीं बांधला इतकेंच होत नसून शिवाय प्राचीन गौळीराजांच्या कारकीर्दींतला आहे असें सिद्ध होतें.

सुभेदार खान जहान यास नरसिंगरायाचे मदतीस जाण्यास लिहिलें, आणि जरूर पडल्यास आणखी कुमक करण्याकरितां शाहा स्वतः ७,००० स्वार घेऊन एलिचपुरास गेला. बाहामिनी फौजेबरोबर शाहा आला नाहीं तेव्हां तो आपणास भ्याला, असें समजून माळव्याचा सुलतान हुशंगशाहा केरळास गेला, आणि सभोंवतालचा प्रदेश लुटून अहंमदशाहाच्या धिमेपणास अनुलक्षून त्याची निंदा करूं लागला. हें वर्तमान शाहास कळतांच तो मोठ्या त्वरेनें केरळच्या कुमकेस निघाला.

या समयीं कित्येक सय्यदांनीं अहंमदशाहास असें कळविलें कीं, मुसलमानांविरुद्ध हिंदूंस आजपर्यंत दक्षणेंतील कोणत्याही शाहानें मदत दिली नाहीं, आणि असें करणें म्हणजे धर्माविरुद्ध आचरण आहे. यास्तव होईल तितकें करून हें टाळावें. या वेळीं शाहा जरी शत्रूच्या छावणीपासून ४० मैल अंतरावर पोहोंचला होता, तथापि त्या गोष्टी त्याच्या मनांत भरल्या, आणि पुढें जाणें त्यानें थांबविलें. परंतु त्याच वेळीं सुलतान हुशंग यास असें पत्र लिहिलें कीं, नरसिंगराय हा आमचा मांडलिक आहे, यास्तव त्यांवर हल्ला न करितां जर स्वदेशीं परत जाणें होईल तर आम्हां उभयतांमधील दोस्ती वाढण्यास ही गोष्ट कारणीभूत होईल. त्यानें असेंही कळविलें कीं, तुझ्याविषयीं सय्यदांनीं मध्यस्थी केल्यामुळें जासूद हें पत्र घेऊन आपल्या छावणींत पोंहोचण्यापूर्वींच मी मागें जावयास निघालों आहें. सुलतान हुशंग यानें अहंमदशाहाकडून आलेल्या पत्राचा उपमर्द केला, आणि आपल्याजवळ फौजेची संख्या जास्त आहे, अशा घमेंडीवर तो अहंमदशाहाच्या पाठोपाठ अशा त्वरेनें निघाला कीं, दक्षणची फौज ज्या मुक्कामाहून सकाळीं पुढें जाई, त्याच जागीं येऊन हुशंग उतरूं लागला. हें त्याचें वर्तन पाहून अहंमदशाहास राग आला, व त्यानें सय्यदांस असें सांगितलें कीं, धर्माविरुद्ध आचरण आपल्या हातून नव्हावें म्हणून मी जितकी खटपट करावी तितकी केली. आतां मात्र नाइलाज आहे. असें सांगून आपलें सामानसुमान पुढें रवाना करून त्यानें मुक्काम केला, आणि लढाईची तयारी केली. उजव्या फळीवर खानजहान यास नेमिलें, डावीवर, इस्माएल फत्तेखानाचा नातु अबदुल्लाखान यास नेमिलें; आणि मध्यभागीं शाहाजादा अल्लाउद्दिन यास ठेविलें. या

प्रमाणें व्यवस्था करून खुद्द शाहा २,००० निवडक स्वार आणि १२ लढाऊ हत्ती घेऊन शत्रूची वाट पाहात दडून राहिला.

या तयारीची वार्ता सुलतान **हुशंग** यास कळली नव्हती, व त्यास अद्याप पर्यंत कोणी प्रतिबंध केला नव्हता. म्हणून दक्षणी मुसलमान अद्याप पळतच आहेत, असें अनुमान करून तो अव्यवस्थितरीतीनेंच पुढें निघाला. आणि एकाएकीं शत्रूच्या समीप जाऊन पोहोंचला. फौजेची व्यवस्था करण्यास वेळ न सांपडल्यामुळें त्याची फौज जशी अस्ताव्यस्त होती, तशाच स्थितींत त्यानें १७,००० लोकांनिशी दक्षणी फौजेवर हल्ला केला.

माळव्याच्या सुलतानाबरोबर लढाई, व सुलतानाचा पराभव.

जेव्हां दोहों फौजांची लढाई जुंपली, तेव्हां **अहंमदशाहानें** दडून राहिलेल्या ठिकाणापासून माळव्याच्या फौजेच्या पिछाडीवर २,००० लोक व हत्ती यांसह हल्ला केला. असे दोहों बाजूंनीं हल्ले होतांच माळव्याची फौज अगदीं घाबरून गेली, व तिनें पोबारा केला. तेव्हां दक्षणी फौजेनें त्यांचा पाठलाग करून सुमारें २,००० लोकांस ठार मारिलें, आणि त्यांचें सर्व सामानसुमान हस्तगत केलें. सुलतान **हुशंगाच्या** जनानखान्यांतील सर्व स्त्रिया आणि सुमारें २०० हत्ती अहंमदशाहाच्या हातीं लागले. माळव्याच्या फौजेचा असा पराभव झाल्याचें ऐकून **नरसिंगराय** किल्यांतून बाहेर आला, आणि ती फौज आपल्या मुलखांतून परत जात असतां तिला त्यानें अडविलें; आणि त्यांच्या पुष्कळ लोकांची कत्तल केली. मुसलमानावर हल्ला करण्याची जरूरी पडली म्हणून जरी **अहंमदशाहा**स जय मिळाला; तरी त्यास फार वाईट वाटलें. सुलतान **हुशंग** याच्या स्त्रियांस व मुलांस चांगल्या नजरा देऊन कांहीं खंडणी न मागतां कांहीं सरदार व विश्वासू खोजे यांस बरोबर देऊन शाहानें माळव्यास पोहोंचविलें. **नरसिंगराय** आपल्या मुलांसह वर्तमान शाहाच्या भेटीस आला, व त्यानें आपला आनंद प्रदर्शित केला. केरळास येण्याविषयीं शाहास विनंति केली, व शाहा केरळास आल्यावर त्यास मोठी मेजवानी करून मौल्यवान हिरे, माणकें आणि मोत्यें वगैरे देणग्या दिल्या. शाहा परत निघाला तेव्हां त्यास पोंहोंचवीत माहूर शहरापर्यंत **नरसिंगराय** गेला व तेथें त्यास पोषाख वगैरे देऊन परत जाण्यास शाहानें निरोप दिला.

**अहमदशाहानें** केरळास वेढा दिला तेव्हां **नरसिंगरायानें** सुलतान **हुशंग** यास कुमकेस बोलाविलें होतें. तेव्हां **अहमदशाहा** व हुशंगया उभयतांमध्यें आणखी एक लढाई झाली, असें माळव्याच्या इतिहासांत लिहिलें आहे. परंतु या विषयीं दक्षणच्या इतिहासांत कोठें उल्लेख नाहीं; यास्तव खरा प्रकार समजण्यास मार्ग नाहीं. या स्वारीहून परत आल्यावर **अहमदशाहा** बाहामिनी बेदरास असतां शिकारीस गेला. शिकार करीत असतां जेथें स्वच्छ पाणी आहे असें एक सुंदर ठिकाण त्याणें पाहिलें. तेव्हां तेथें एक शहर वसवावें, असा त्यानें निश्चय केला. व तेथें एक मोठा बळकट व विस्तीर्ण असा किल्ला बांधून त्यास **बेदर** हें नांव दिलें, व शहरास **अहमदाबादबेदर** नांव दिलें,व हें शहर शाहानें आपली राजधानी केली. येथें बेदर+ नांवाची हिंदुराजांची फार प्राचीन राजधानी होती, आणि सुमारें ५,००० वर्षांपूर्वी लिहिलेल्या हिंदु पुस्तकांवरून असें समजतें कीं, **महाराष्ट्र, कर्नाटक** आणि **तेलंगण*** या तिहीं देशांवर त्या राजांचा अंमल होता. या घराण्यांत राजा **भीमसेन** हा फार प्रसिद्ध होऊन गेला. त्याची कंन्या **दमयंती** आणि माळव्याचा **नळ** राजा या दोघांविषयीं सर्व हिंदुस्थानांत फार प्रसिद्ध अशा गोष्टी सांगतात. **अकबर** बादशाहाच्या हुकुमावरून शेख **फेजी** यानें नळदमयंतीच्या गोष्टीचें फारसी भाषेंत भाषांतर केलें आहे.

अहंमदाबादबेदर हें नवीन शहर वसवून तें शहर शाहा आपली राजधानी करितो.

परदेशच्या राजाशीं शरीरसंबंध करून आपल्या घराण्यास बळक-

---

+ बेदरचा किल्ला फार बळकट आहे, व हा ज्या खडकावर आहे, तें खडक फोडून खंदक केलेला आहे. यामुळें दक्षणेंतील प्रसिद्धकामांपैकीं हें एक काम आहे. हा किल्ला छापा घालून कधीं कोणास घेतां आला नाहीं, असें वाटतें. **बेदर** शहरांत जे अवशेष आहेत व सभोंवती ज्या मशिदी आहेत त्यांवरून हें शहर मोठें शोभायमान होतें, असें स्पष्ट होतें. हिंदुस्थानांतील मुसलमानी धर्माच्या दुसऱ्या कामांप्रमाणें हें शहर पडक्या स्थितींत असून दिवसेंदिवस अधिकच मोडकळीस येत आहे.

* महाराष्ट्र, कर्नाटक आणि तेलंगण हीं तिन्हीं राज्यें एका हिंदूराजाच्या अमलाखालीं कधीं होतीं असा संभव दिसत नाहीं. मात्र बेदर ही हिंदू राजाची कदाचित् राजधानी असेल.

टीं आणावी या हेतूनें खानदेशाचा शाहा **नसीरखान फरूकी** यांच्या कन्येस शाहाजादा **अल्लाउद्दिन** या करितां शाहानें मागणें केलें. **ओमर फरूक** यापासून आपली उत्पत्ति आहे, याबद्दल **नसीरखान** फारबढाई मारीत असे. गुजराथचा शाहा फार बलाढ्य होत चालल्यामुळें **नसीरखानाच्या** मनांत भीति उत्पन्न झाली होती, म्हणून त्यानें हें मागणें एकदम कबूल करून आपल्या मुलीस वकीलांबरोबर मोठ्या थाटानें **अहमदाबादबेदर** येथें पाठविली. **अहंमदशाहानें** तिच्या करितां एक वाडा बांधून त्यांत तिला ठेविलें, आणि लग्नाची सर्व तयारी झाल्यावर मोठ्या थाटानें लग्न झालें. लग्नसमारंभ २ महिनेपर्यंत चालला होता.

आपलें राज्य आपल्या मुलांस वांटून द्यावें, असें अहंमदशाहाच्या मनांत आलें. त्या प्रमाणें **रामगड, माहूर, कलम** आणि **वऱ्हाडचा** कांहीं भाग त्यानें **महंमदखानास** दिला; **दाऊदखानास** बादशाही छत्र देऊन कांहीं सरदारांसहवर्तमान तेलंगणांत राज्य करण्यास पाठविलें; आणि वडील शाहाजादा **अल्लाउद्दीन** यास आपल्या गादीचावारस ठरवून राज्यकारभारावर देखरेख ठेवण्यास सांगितलें, आणि त्याच्याच बरोबर त्याच्या कनिष्ठ भावासही बेदर येथें ठेविलें. याच प्रसंगी ही व्यवस्था आपणास मान्य आहे, अशा विषयीं सर्व कामगार व सरदार यांजकडून शपथा घेवविल्या. तेव्हां त्यास असें वाटलें कीं, आतां केलेली व्यवस्था कायम राहील. परंतु असें होणें अशक्य होतें. याच प्रसंगीं **मलिक उत् तुजार** यास २,००० स्वारांची सरदारी देऊन दौलताबादच्या सुभेदारीवर नेमिलें.

हिजरी सन ८३३ (इसवी सन १४२९) या सालच्या अखेरीस **मलिक उत् तुजार** यास हिंदीमहासागराच्या किनाऱ्याबरील कोंकणपट्टींत कित्येक बंडखोर व बदमाष लोक होते, त्यांचें पारिपत्य करण्याकरितां शाहानें पाठविलें. हें काम अल्प काळांतच त्यानें असें फत्ते केलें कीं, सर्व देशांत अम्मल बसवून सोनें रुपें लादलेले कित्येक हत्ती व उंट हुजूर पाठविले. या नौकरीबद्दल त्यास अहंमदशाहानें आपला स्वतःचा एक

कोंकणपट्टींतील बंडखोरांच्या पारिपत्यास शाहा सैन्य पाठवितो इ. सन १४२९

+ यापूर्वी सर्व कोंकण प्रांतावर हल्ला झाला होता, याविषयीं फार (पुढें चालू.)

पोषाख व रत्नजडित एक तलवार अशा देणग्या दिल्या. अशा देणग्या यापूर्वी कोणासही मिळाल्या नव्हत्या. गुजराथच्या शाहाच्या ताब्यांतील माहिम बेट **मलिक उत् तुजार** यानें याच वेळीं ताब्यांत घेतलें होतें. यास्तव तें परत ताब्यांत घेण्याकरितां **अहंमदशाहा गुजराथी** यानें आपला मुलगा **जाफरखान** यास सैन्य देऊन पाठविलें. या नवीन घेतलेल्या ठाण्याचें रक्षण करणें जरूर आहे, असें समजून **अहंमद शाहा बाहामनी**नेंही **शाहाजादा अल्लाउद्दीन** यास **मलिक उत् तुजार** याच्या कुमकेस पाठविलें. समुद्राचा एक फांटा जमिनींत आला होता, त्याच्या दोहों बाजूंस समोरासमोर दोन्ही फौजा छावण्या देऊन राहिल्या. परंतु कोणाचीच हल्ला करण्याची छाती झाली नाहीं. शेवटीं तेथील हवा व पाणी रोगट असल्यामुळें शाहाजादा **अल्लाउद्दीन** याची प्रकृति बिघडली. तेव्हां तो हवा पालटण्याकरितां तेथून कांहीं मुकामावर गेला. **अल्लाउद्दीन** गेल्यावर **जाफरखानानें मलिक उत् तुजार** यावर हल्ला केला, आणि मोठी निकराची लढाई होऊन दक्षणच्या फौजेचा अगदीं पराभव झाला, आणि तुजाराचा भाऊ कैद झाला. दुसरे दोन मोठे सरदार लढाईंत पडले, आणि तंबू हत्ती व घोडे यांसकट सर्व बाजारबुणगे गुजराथी सैन्याच्या हातीं लागले. दुसऱ्या एका ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, या लढाईंत शाहाजादा **अल्लाउद्दीन** हजर असून त्यानें फार शौर्य प्रकट केलें; परंतु जयापजय येणें हें केवळ मनुष्याच्या श्रमावरच अवलंबून नसतें, यामुळें शाहाजादा व **मलिक उत् तुजार** या दोघांसही रणांतून पळून जावें लागलें.

गुजराथच्या शाहाबरोबर लढाई व त्यांत बाहामिनी शाहाचा पराभव.

---

संदेह दिसतो, आणि हल्लींची स्वारी ही कोंकण जिंकण्याकरितां नसून केवळलुटीकरितां असावी असें वाटतें. दाभोळें आणि चौल हीं बंदरें मुसलमानांच्या हातीं होतीं, असें पुष्कळ ठिकाणीं आढळतें. परंतु त्या पलीकडचा प्रदेश मुसलमानांच्या अमलाखालीं होता, या विषयीं शंका येते.

* मुंबई. हा हल्ला फार अन्यायाचा होता, म्हणजे यास कांहीं कारण घडलें नव्हतें. आणि याचा परिणाम असा झाला कीं, येथें व दुसऱ्या ठिकाणीं एकामागून एक असे दक्षणी लोकांचे अनेक वेळां पराभव झाले.

हा पराभव झाल्यावर थोड्याच वेळानें अहंमदशाहा बाहामिनीनें आणखीं फौज ठेवून गुजराथेकडे कूच केलें. अहंमदशाहा गुजराथीही त्यावर चालून आला. दक्षणी फौजेनें प्रथमतः बागलाणांतील तुंबोल या नांवाच्या एका पहाडी किल्यास वेढा दिला; परंतु अहंमदशाहा गुजराथी समीप आल्याचें ऐकतांच तो वेढा उठवून त्या गुजराथच्या शाबरोबर लढण्यास बाहामिनीशाहा निघाला. कांहीं काहाबरोबर तह. ळपर्यंत दोन्हीं सैन्यें शस्त्र न उचलतां जवळ जवळ छावणी देऊन राहिलीं. आणि शेवटीं दोहों सैन्यांतील विद्वान काजींनीं त्यांची एकी केली, आणि असें ठरविलें कीं; प्रत्येकाच्या ताब्यांत जो मुलूख व जे किल्ले असतील, त्यांत त्यानें तृप्त राहावें, व दुसऱ्याच्या मुलखास उपद्रव देऊं नये.

तवारिख अलफी या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, हिजरी सन ८२५ या सालीं गुजराथच्या शाहाचा पुत्र महंमदखान हा नंदूरबारास एका स्वारींत गुंतला आहे, असें ऐकून अहंमदशाहानें त्यावर हल्ला केला. त्या बरोबर अहंमदशाहा गुजराथी आपल्या मुलाच्या कुमकेस आला. तो समीप येतांच दक्षणी फौज चार मुक्काम मागें हटली. तेव्हां गुजराथचा शाहा आपल्या राजधानीकडे परतला, आणि तापीनदीच्या कांठीं छावणी देऊन राहिला. तेथें त्यास अशी बातमी लागली कीं, दक्षणी फौजेनें तुंबोळ किल्यास वेढा दिला. म्हणून तो त्याजवर पुनः निघाला. एके ठिकाणीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत दोहों फौजांची लढाई झाली; परंतु अमक्या सैन्यास जय मिळाला, असें म्हणतां येईना. रात्रीं तह वगैरे कांहीं न करितां दोघेही शाहा आपापल्या मुलखीं गेले. दुसऱ्या इतिहासकारांनीं तुंबोळच्या वेढ्याचें तपशीलवार वर्णनही केलें आहे; तें सर्व येथें देऊं लागल्यास पाल्हाळ होईल.

हिजरी सन ८२६ सालीं अमदाबाद बेदरचा दगडी किल्ला समाप्त झाला. या वेळीं सर्वांनीं उत्साह करावा; असा शाहानें हुकूम दिला. याच सालीं शाहानें आपल्या बहिणीचा

+ दक्षणचें सैन्य गंगथडीच्या प्रदेशांतून खानदेशांत गेलें.

पुत्र शीररवान+ यास ठार मारिलें. कारण तो आपल्या मुलास मोठा प्रतिस्पर्धी होईल, अशी शाहास भीति वाटत होती.

गुजराथ व दक्षण या दोहोंप्रांतांमधील शाहांमध्यें लढाई जुंपली आहे, असें ऐकून माळव्याचा सुलतान हुशंगशाहा यानें नरसिंग रायावर हल्ला केला, आणि त्यास लढाईंत ठार मारिलें. तसेंच केरळ-

माळव्याचा सुलतान केरळच्या राजावर हल्ला करितो. व लढाईत राजा पडतो.

चा किल्ला व त्याखालील प्रांतही त्यानें आपल्या ताब्यांत घेतला. ही खबर अहंमदशाहा बाहामिनीस कळतांच माळव्याच्या फौजेवर तो निघाला; परंतु खानदेशचा शाहा नशीरखान फरूकी यानें मध्यस्थी करून दोहों शाहांमधील लढाई बंद केली, आणि कांहीं बोलाचाली होऊन असें ठरलें कीं, केरळचा किल्ला माळव्याचा सुलतान हुशंगशाहा याजकडे असावा. आणि वऱ्हाड प्रांत अहंमदशाहा बाहामिनीकडे असावा. या मतलबाचा तह होऊन व त्या विषयीं उभयतांनीं आणा शपथा घेऊन दोघेही शाहा आपापल्या राजधानीस परत गेले. या नंतर कांहीं दिवसांनीं कांहीं बलाढ्य हिंदू सरदारांचें बंड मोडण्यासाठीं शाहा तेलंगणास गेला, आणि अल्प काळांतच त्यांस ताब्यावर आणिलें.

माळव्याच्या सुलतानाबरोबर तह.

राजधानीस परत येत असतां अहमदाबाद बेदरपासून एक मुकामावर असतां कर्बला येथील सय्यद नासिरुद्दीन यास ५०० रुपये धर्मार्थ दिले, आणि कर्बला* येथील दुसऱ्या सय्यदांस धर्मार्थ वांटण्याकरितां आणखी २०,००० रुपये दिले. शेवटल्या पैगंबराच्या रूपानें अहंमदशाहास जो स्वप्नांत दिसला, तोच हा मनुष्य होय. शेख अझुरी यानें आपल्या ग्रंथांत यांचें फार स्तुतिपर वर्णन के-

+ शाहास आपला वडील भाऊ फेरोज यास मारण्याकरितां यानेंच चेतविलें, असा यावर आरोप आहे. याचा घातकी स्वभाव जाणून गादीस हा एक भयंकर हक्कदार होईल असें त्यानें स्वाभाविक अनुमान केलें.

* मिसापाटामिया प्रांतांत कर्बला हें ठिकाण आहे. महंमद पैगंबराचा नातू हुस्सेन यास येथें मारिलें व पुरलें आहे.

लें आहे. वर सांगितल्या प्रमाणें **नासिरुद्दिना**स द्रव्य देऊन त्याची दरबारांत भेट घेतली, व **कर्बाला**स जाण्यास त्यास निरोप दिला. हा मुसलमान सय्यद घोड्यावर बसून परत घरीं जात असतां मार्गांत **शीरमलिक** हा सरदार दुसऱ्या कित्येक सरदारांबरोबर ज्या ठिकाणीं बसला होता तेथें आला. परंतु त्याजकडे कांहीं लक्ष न देतां सय्यद पुढें जाऊं लागला. तो घोड्यावरून उतरला नाहीं, यामुळें **शीरमलिक** यास आपली त्यानें बेअदबी केली असें वाटलें, आणि **शीरमलिक** यानें आपल्या लोकांस सय्यदास घोड्यावरून खालीं ओढण्यास सांगितलें. तेव्हां आपला असा उपमर्द झाल्याबद्दल सय्यद **नासिरुद्दिना**स त्वेष आला, व त्यानें लागलीच जाऊन शाहाकडे कागाळी केली. शाहानें त्यावेळीं त्याचें शांतवन करून त्यास सांगितलें कीं, अल्ला व त्याचा पैगंबर योग्यकाळीं या गुन्हेगाराचा सूड घेतील. कांहीं दिवसांनंतर शाहाची स्वारी **अहमदाबाद बेदर** येथें आली, आणि फौजेची व सरदारांची आपापल्या ठिकाणीं रवानगी होऊं लागली. अशा समयीं सरदार परत जाण्यापूर्वी त्यांस पोषाख देण्याची वहिवाट असे. या समयीं **शीरमलिक** याकडे त्याचें लक्ष गेलें, आणि सय्यद **नासिरुद्दीन** याचा उपमर्द केल्याची त्यास आठवण होऊन कसाब या नांवाच्या हत्तीस शाहानें आणविलें. आणि सय्यद **नासिरुद्दिना**चा कोणत्या रीतीनें त्यानें उपमर्द केला होता, याची **शीरमलिक** यास आठवण देऊन त्यास हत्तीच्या पायांखालीं देण्याविषयीं शाहानें हुकूम दिला. तेव्हां हत्तीनें एका क्षणांत चिरडून त्यास ठार केलें.

शाहाचा मृत्यु. हि. स. ८३८ छ. २८ रज्जब इ. स. १४३५ ता. १९ फेब्रुवारी.

**अहंमदशाहा वली बाहामिनी** यानें १२ वर्षें २ महिने राज्य केलें, आणि हिजरीसन ८३८ चंद्र २८ रज्जब (तारीख १९ फेब्रुवारी सन १४३५ इसवी) रोजीं तो मरण पावला.

धार्मिक व विद्वान लोकांस **अहंमदशाहा** फार मान देत असे. अ-

+ हिंदू राजांच्या कारकीर्दींत लष्करी सरदारांचा उद्दामपणा किती असे, हें या हकीकतीवरून स्पष्ट समजतें. त्याच प्रमाणें सय्यद लोकांविषयीं अहंमदशाहाची जी पूज्य बुद्धि होती, तीही वरील हकीकतीवरून समजते.

सें लिहिलें आहे कीं, इराणांतील **कर्मान** या पवित्रस्थानीं शाहा **निमत उल्ला** हा मोठा साधु रहात असे. त्यास हिंदुस्थानांत बोलावण्याकरितां दोघां सच्यदास यानें पाठविलें होतें. त्यांचीं नांवें **शेख हबीबउल्ला जुनेदी** आणि **मीरशमसुद्दीन** हीं होतीं. शाहा **नीमत उल्लानें** यांचा मोठा सन्मान व सत्कार केला, आणि जरी त्यानें स्वतः हिंदुस्थानांत येण्याचें कबूल केलें नाहीं, तथापि आपल्या शागिर्दांपैकीं करमानचा **मुल्ला कुतुब उद्दीन** यास त्यांबरोबर पाठविलें, व त्याजबरोबर **अहंमदशाहा**करितां १२ टोकांचा एक हिरवा किरीट पेटींत घालून दिला. ते परत आले तेव्हां शाहा त्यांस सामोरा गेला, आणि **मुल्ला कुतुब उद्दीन** यास पाहतांच मोठ्यानें असें म्हणाला. 'पहा तक्तावर बसण्यापूर्वीं स्वप्नांत मी याच दरवेशास पाहिलें होतें, आणि यानेंच मला १२ टोकांचा हिरवा किरीट नजर दिला. त्यानें जी पेटी बरोबर आणिली आहे, त्यांत जर मी झोपेंत पाहिलेला हिरवा किरीट असला, तर माझें स्वप्न मोठ्या अद्भुतरीतीनें खरें झालें असें होईल॰' तो साधु जवळ आला, आणि जेव्हां त्यानें शाहास किरीट नजर दिला, तेव्हां तो आश्चर्यानें अगदीं चकित होऊन गेला. तेव्हां त्या पूज्य मुल्लानें शाहास सांगितलें कीं, आश्चर्य किंवा भय मानण्याचें कांहीं कारण नाहीं. जो किरीट तुम्हीं स्वप्नांत पाहिला होता, तोच हा मी आपणास नजर केला आहे, व खरोखर मीच तो त्या वेळीं आणिला होता. **शाहा निमत उल्लानें** शाहास पत्र लिहितेवेळीं **शाहाबुद्दीन अहंमदशाहा वली** असा किताब त्यास दिला होता. येणेंकरून **अहंमदशाहास** त्याचा इतका गौरव वाटला कीं, तो किताब त्यानें आपल्या मोहरेवर कोरविला. **मुल्ला कुतुब उद्दिनाची** भेट परत करण्याकरितां शाहानें **खवाजा इमाद उद्दीन समनानी** आणि **सैफ उल्ला अहस-**

(मार्जिन: त्याचा स्वभाव.)

+ जू लोकांचा जरुशलेम येथील मोठा धर्माधिकारी यास पाहतांच स्वप्नांत पाहिलेला तोच हा पुरुष असें शिकंदर बादशाहानें ओळखिलें, अशी जी गोष्ट ग्रंथांतरीं आढळतें, तिचें व या गोष्टीचें विलक्षण साम्य आहे. अहंमदशाहास वली (साधू) म्हणवून घेण्याची फार इच्छा होती, व शिकंदरास जुपिटरचा पुत्र असें म्हणवून घेण्याची इच्छा होती.

**नाबादी** यास दुसऱ्यानें **करमानास** पाठविलें, आणि या वेळीं आपल्या मुलांपैकीं एका मुलास तरी बाहामिनी दरबारीं पाठवावें, अशी **शाहा नीमत उल्लास** विनंति करण्यास सांगितलें. त्या महंतास **शाहा खलील उल्ला** हा एकच पुत्र होता. म्हणून त्यानें आपला नातू **मीरनूर उल्ला** यास दक्षणेंत जाण्यास परवानगी दिली.

हा चौलबंदरीं येऊन पोहोंचला, तेव्हां शाहानें आपली पालखी देऊन **मीर अब्दुल कासिम जुरजानी** आणि **सय्यद महंमद संजर** यांस त्या महंतास राजधानीस आणण्याकरितां पाठविलें. तो समीप येतांच **अहंमदशाहा** आपल्या मुलासहवर्तमान त्यास सामोरा जाऊन भेटला. जेथें भेट झाली, त्या ठिकाणीं एक मशीद बांधून खेडें वसविलें, व त्यास **नीमताबाद** असें नांव दिलें. कांहीं दिवस गेल्यावर **शाहा नीमत उल्ला**च्या नातवास **मलिक उल्ल मुशाईक** (धार्मिक लोकांचा मुख्य) हा किताब दिला. तसेंच त्यास दरबारांत सर्व सरदारांवर जागा दिली. **सय्यद महंमद जिसू दुराज** याच्या वंशजांसही त्याच्या खालीं बसविलें. कांहीं दिवस गेल्यावर **मीर नूर उल्ला**चा शाहानें आपल्या मुलीशीं निका लाविला.

हिजरी सन ८३४ (इसवी सन १४३१) या सालीं **शाहा नीमत उल्ला** निवर्तल्यावर त्याचा पुत्र **शाहा खलील उल्ला** हिंदुस्थानांत आला. त्याचा दुसरा पुत्र **मोहिदीन उल्ला** हा दक्षणेंत लष्करी खात्यांत मोठा अधिकारी झाला, व त्यानें मोठ्या नोकऱ्या बजावल्या. या नोकरीकरितां **बीड** प्रांत त्याच्या तैनातीस लावून दिला, आणि शाहाची नात म्हणजे शाहाजादा **अल्ला उद्दीन** याच्या मुलीशीं त्याचा निका लाविला. हा प्रांत तेव्हांपासून या प्रसिद्ध साधूच्या कुटुंबाकडे चालू लागला. आणि **बीड** शहरच्या बाहेर जो दर्गा बांधिला होता, तो अद्याप आहे. तो त्या साधूच्या दफनाकरितांच मुख्यत्वें बांधिला होता. **शाहा मोहिब उल्लानें** आपल्या शौर्यानें व पराक्रमानें **गाझी** हें नांव मिळविलें होतें.

---

# अल्लाउद्दीन शाहा बाहामिनी.

इ० स० १४३५ ते १४५७ प०

शाहाचा भाऊ शाहाजादा महंमद यास विजयानगरास खंडणी वसूल करण्यास पाठवितात.—— शाहाजादा छावणींत असलेल्या प्रधानांस व सरदारांस आपणास स्वतंत्रता मिळण्याकरितां मदत करण्यास सांगतो —— ते रुकार देत नाहींत, आणि शाहाजादा त्यांस मारेकऱ्यांकडून मारवितो.—— विजयानगरचा राजा शाहाजाद्यास मदत करितो.—— आणि शाहाजादा मुदकल, रायचूर, नळदुर्ग आणि सोलापूर हीं ठाणीं व त्याखालील मुलूख घेतो.—— शाहाजाद्याचा पराभव होऊन बळकाविलेल्या मुलखाच्या ऐवजीं फक्त रायचूर परगणा घेऊन राहणें त्यास भाग पडतें.—— कोंकणावर स्वारी होते —— कांहीं कोंकणपट्टी सर होते —— वऱ्हाडांत बंड —— मलिक उत् तुजार मुख्यत्वें परदेशी फौजेच्या सहाय्यानें तें बंड मोडितो.—— दक्षणी लोकांवर दरबारांत परदेशी लोकांस मान मिळतो —— विजयानगरचा राजा आपल्या सैन्यांत मुसलमानांस ठेवितो, व दक्षणच्या शाहाबरोबर लढाई करितो.—— तीन मोठ्या निकराच्या लढाया होतात —— अखेरीस तह होतो.—— मलिक उत् तुजार कोंकणपट्टी जिंकण्यास जातो.—— त्याच्या फौजेचा नाश होऊन तो मरतो.—— दक्षणी कामगार व परदेशी कामगार यांमध्यें वैमनस्य.—— शाहाचें सरकारी कामाकडे दुर्लक्ष.—— त्यास दुःखकारक रोग होतो —— त्याच्या मरणाची कंडी उठते.—— वऱ्हाड आणि तेलंगण प्रांतांत बंडें होतात —— माळव्याचा शाहा दक्षणेकडे स्वारी करितो.—— राज्याच्या बचावाकरितां लष्करी व्यवस्था.—— शाहाचा मृत्यु —— त्याचा स्वभाव.

---

**अल्लाउद्दीनशाहा अमदाबाद बेदरच्या** तक्तावर बापाच्या इच्छेप्रमाणें बसला. यानें आपला भाऊ **महंमदखान** याकडे दुर्लक्ष न करितां हत्ती, घोडे व पुष्कळ नेमणूक त्यास दिली. दरबारच्या कामगारांत मुख्य जो दिलावरखान यास **वकील उस् सलतनद** हा किताब देऊन पेशवा केला, आणि **खवाजा जहान अस्तराबादी** यास वजीर केलें. **इमाम उल् मुल्क घोरी** हा एक जुना खानदानीचा सरदार असून यानें मोठमोठ्या नोकऱ्या बजाविल्यावर तो काम सोडून घरीं बसला होता. त्यास **अमीर**

उल् उमराव हें काम पत्करण्यास सांगून आपला भाऊ **महंमदखान** आणि **ख्वाजा जहान** यांसहवर्तमान मोठी फौज देऊन विजयानगरास पाठविलें. या राजानें ५ वर्षीची खंडणी दिली नव्हती, व ती बाकी आतां देत नाहीं, असें राजानें सांगितलें होतें. या मुसलमानी सैन्यानें त्याचा प्रदेश लुटून उध्वस्त केला, व फार धूळधाण केली. तेव्हां विजयानगरच्या राजानें शाहाजादा **महंमद** यास पुष्कळ मोठमोठ्या देणग्या देऊन २० हत्ती, पुष्कळ द्रव्य, गाण्याबजावण्यामध्यें निष्णात अशा २०० नायकिणी शाहाकरितां विजयानगरच्या राजानें दिल्या, तेव्हां राजाशीं तह झाला.

शाहाजादा महंमद यास विजयानगरास खंडणी वसूल करण्यास पाठवितो.

तेथून **मुद्कल** नजीक फौज माघारी आली. तेव्हां शाहाशीं नाराजी असलेले कित्येक कामगार **महंमदखाना**स म्हणाले कीं, "आपले वडील जिवंत होते, तेव्हां त्यांनीं आपणास राज्यकारभार करण्यास बरोबर घेतलें होतें. म्हणून आपणास **अल्लाउद्दीन शाहानें** आपल्या बरोबर तक्तावर बसूं द्यावें, आणि उभयतांनीं मिळून राज्यकारभार करावा, किंवा राज्याच्या वांटण्या तरी कराव्या हें यथान्याय होतें. परंतु या दोहोंपैकीं एकही करण्याचा शाहाचा झोक दिसत नाहीं. यास्तव अर्धें राज्य जबरीनें ताब्यांत घेण्यास आपणास पूर्ण हक्क पोहोंचतो." असें त्यांनीं त्याच्या मनांत भरवून दिलें. **महंमदखाना**स हे विचार पसंत पडले, आणि हा आपला हेतु सिद्धीस नेण्यास सहाय्य करण्याकरितां **ख्वाजा जहान** आणि **इमाद उल् मुल्क घोरी** यांचें मन वळविण्यास तो यत्न करूं लागला; परंतु त्या दोघांनीं ही या कृत्यास आपणाकडून मदत होणार नाहीं, असें स्पष्ट सांगितलें. आणि असें करण्यांत मोठा अपराध होईल, असेंही त्यांनीं त्यास कळविलें. तेव्हां शाहाजाद्यानें त्यांवर मारेकरी घालून त्यांस ठार मारविलें. नंतर विजयानगरच्या राजाकडून मोठी फौज कुमकेस घेऊन **मुद्कल, रायचूर, सोलापूर, विजापूर** आणि **नळदुर्ग** हे प-

शाहाजादा महंमद आपणास स्वतंत्रता मिळण्याकरितां छावणींतील सरदारांचीं मनें वळवितो.

ते त्यास रुकार देत नाहींत, व शाहाजादा त्यास मारेकऱ्यांकडून ठार मारवितो.

रगणे त्यानें आपल्या ताब्यांत घेतले.

या सर्व कृत्यांत **इमाद उल् मुल्क घोरी** या जुन्या पुराण्या सरदारास मारल्याचें ऐकून **अल्लाउद्दीनशाहा**स फार वाईट वाटलें. तो म्हणाला कीं, यानें आजपर्यंत सरकारचीं मोठमोठीं महत्वाचीं कामें करून जिचें मोल करितां येणार नाहीं, अशी सरकारची नोकरी केली होती. तो आपल्यास बापाप्रमाणें प्रिय होता; यास्तव अशा योग्य व प्रसिद्ध पुरुषाचा वध करणाराचें कोणत्याही तऱ्हेनें हित होणार नाहीं, हें मी खचित जाणतों. सर्व पादशाही फौज जमविण्याची तजवीज करून लढाईची तयारी करण्यास पुष्कळ पैसा खर्च केला, आणि या बंडवाल्यांची खोड मोडण्यास शाहा राजधानीहून निघाला. दोघां भावांमध्यें लौकरच लढाई झाली, आणि **अल्लाउद्दीनशाहास** जय मिळाला. ज्यांनीं हें बंड उभारिलें होतें, ते बहुतेक कामगार कैद झाले, आणि शाहाजादा **महंमदखान** थोडेसे लोक घेऊन पहाडांत व जंगलांत आश्रा घेण्यास पळून गेला. नंतर शाहा **अमदाबाद बेदरा**स परत आला, आणि गुन्हेगार कामगारांपैकीं कित्येकांस माफी करून कैदेंतून मुक्त केलें. माफी करण्याविषयीं व जिवास इजा करणार नाहीं, अशाविषयीं खात्रीपूर्वक वचनें देऊन आपल्या भावाचेंही स्वाधीन होण्याविषयीं शाहानें मन वळविलें. तो आल्यावर शाहानें मोठ्या प्रीतीनें त्याचा सत्कार केला, आणि नंतर थोड्याच दिवसांनीं रायचूरचा किल्ला व त्या खालील मुलखाचा वसूल त्याच्या नेमणुकीस लावून दिला. त्याचा भाऊ शाहाजादा **दाऊद** हा तेलंगणच्या सुभेदारीवर होता, व त्या सुभेदारींत रायचूर परगणाही होता. तो मरण पावल्यामुळें हा परगणा शाहानें त्यास दिला. येथें चैनबाजींत काळ घालवीत शाहाजादा **महंमदखान** पुष्कळ वर्षेपर्यंत होता, व त्या काळांत त्यास कोणत्याही तऱ्हेचा उपद्रव झाला नाहीं.

शाहाजादा महंमद याचा पराभव होतो व तो पळून जातो.

तो शाहाच्या स्वाधीन होतो, व रायचूर परगणा त्यास जहागीर मिळतो.

**अल्लाउद्दिनशाहानें** हिजरी सन ८४० चंद्र १ मोहरम रोजीं **दिलावरखानास** पोषाख देऊन कोंकणपट्टी जिंकण्याच्या कामावर नेमिलें, व त्याच्या हवालीं पुष्कळ सैन्य केलें. कोंकणपट्टींतील रहिवाशी

लोक मोठे काटक व बळकट अशी त्यावेळींही प्रसिद्धि होती. **राय-री** व **सोनखेड** येथील राजे लौकरच शरण आले, व नियमितपणानें खंडणी देण्याचें त्यांनीं कबूल केलें. नंतर **दिलावरखान** शाहा करितां सोनखेडच्या राजाची सुंदर कन्या व कांहीं दिवसांची खंडणीची बाकी घेऊन राजधानीस परत आला. या नोकरीबद्दल शाहा खानावर फार खुष झाला, आणि राजाच्या मुलीशीं अगदीं मोहित होऊन गेला. कारण त्या मुलीसारखी रूपानें सुंदर, स्वभावानें उत्तम आणि गाण्याबजावण्यामध्यें निष्णात अशी दुसरी मुलगी कोठें आजपर्यंत त्यास आढळली नव्हती. तिला त्यानें **पेरीचेर** (स्वर्गींची रंभा) हा किताब दिला, व त्या उभयतांची प्रीति अतिशय जडली. परंतु शेवटीं कोंकणच्या राजापासून **दिलावरखानानें** लांच खाल्ला, व त्याचे किल्ले घेण्यासाठीं यानें आपली परकाष्ठा केली नाहीं, असें शाहानें ऐकिलें, तेव्हां **दिलावरखाना**वरून त्याचें लक्ष उडालें; तेव्हां त्यानें आपल्या कामाचा राजीनामा दिला, आणि आपला बचाव करून घेतला. नंतर या महत्वाच्या कामावर **दस्तुर उल् मुल्क** या खोज्यास शाहानें नेमिलें.

कोंकणप्रांतादर स्वारी. इसवी सन १४३६ जुलई तारीख १५.

या शाहाच्या उद्धट वर्तनामुळें सर्व दर्जाचे लोक लौकरच त्यास कंटाळले. ही गोष्ट दररोज शाहाच्या कानावर जरी जाऊं लागली, तरी तिकडे तो लक्ष देईना. शाहास असें वाटलें कीं, या कागाळ्या केवळ मत्सरामुळें असून हें सर्व एका फळीच्या लोकांचें कृत्य आहे. यामुळें तो खोज्यावर अधिकाधिक कृपा करूं लागला. शेवटीं ऐके दिवशीं शाहाजादा **हुमायून** यानें एक अर्ज केला होता, त्याचा निकाल लौकर करण्यास खोज्यास त्यानें सांगितलें. त्यास त्यानें असें उत्तर दिलें कीं, त्या अर्जाचा विचार करण्यास तूर्तच मला सवड नाहीं; परंतु एक दोन दिवसांत त्याचा विचार करीन. आणखी दोन तीन दिवस गेल्यावर शाहाजाद्यानें पुनः त्यास निरोप पाठविला कीं, तें काम अद्याप तसेंच भिजत पडलें आहे, या करितां विलंब न लावितां त्याचा निकाल कर. तेव्हां त्या वजिरानें असें उत्तर पाठविलें कीं, तो खटला शाहाजाद्याच्या हुकमतींतील नाहीं; यास्तव त्यांत हात घालणें हें तुम्हांस अयोग्य आहे.

शाहा दस्तुर उल्मुल्कास वजिरीचे कामावर नेमितो.

शाहाजादा स्वभावाचा तापट होता, यामुळें खोज्याचें हें असें बेअदबीचें उत्तर ऐकतांच त्याचें माथें खवळलें. आणि आपल्या शिपायांपैकीं एकास बोलावून खोज्याचा वध करण्याविषयीं त्यास त्यानें हुकूम दिला, व यामुळें त्याच्या जिवावर कांहीं बेतल्यास बचाव करण्याचेंही वचन दिलें. त्या शिपायाचेंही मधानानें कांहीं नुकसान केलें होतें, यामुळें त्यानें तें काम पतकरिलें. आणि त्याच दिवशीं **दस्तुर उल् मुल्क** दरबारांतून घरीं येत असतां हा मारेकरी अर्ज देण्याच्या निमित्तानें म्हणून त्याजवळ गेला, आणि एकाएकीं कमरेची कठार काढून त्याच्या उरांत भोंसकली. शाहाजाद्याचे लोक या गोष्टीच्या पाळतीवरच होते. त्यांनीं मारेकऱ्यास पळून जाऊं दिलें, आणि त्यांमध्यें व वजीराच्या लोकांमध्यें झटपट लागली. तो गोंगाट शाहास आपल्या महालांत ऐकूं आला, आणि शाहाजादा **हुमायून** गडबड कशाची चालली आहे, याचा तपास करण्याकरितां म्हणून बाहेर गेला. तिकडून परत आल्यावर त्यानें शाहास असें कळविलें कीं, फार दिवस सरकारची नोकरी ज्यानें केली होती, आणि त्याबद्दल शाहाची कृपा होईल अशी ज्यास आशा होती, त्याचा **दस्तुर उल् मुल्कानें** अपमान केला, व आतां त्यास शिवीगाळ केली. यामुळें कठारीनें त्यानें त्याचा प्राण घेतला. म्हणून सरकारच्या लोकांनीं त्यास धरिलें आहे, आणि त्याची काय अवस्था करावी, या विषयीं आपल्या हुकुमाची वाट पाहात आहेत. कोणास देहान्त शिक्षा देणें शाहास आवडत नव्हतें, आणि शाहाजाद्यानें ज्या रीतीनें खबर कळविली, त्यावरून त्याच्या खरेपणाविषयीं अंदेशा येऊन मारेकऱ्यास फक्त कैद करण्याविषयीं त्यानें हुकूम दिला. आणि **फेरोजशाहा**च्या वेळच्या पंडितांपैकीं **मैमन उल्ला डक्कनी** यास वजिरीच्या कामावर नेमिलें.

दस्तुर उल् मुल्कास मारेकऱ्याकडून व शाहाजादा मानविलो.

खानदेशचा शाहा **नसीरखान** याची मुलगी **मल्लिका जहान** ही शाहाची पट्टराणी होती. शाहाचें प्रेम **परीचेहेरे**वर फार बसल्यामुळें आपणास शाहा विचारीत नाहीं, असें पाहून तिला राग आला, व याबद्दल तिनें आपल्या बापाकडे हिजरी सन ८४१ या सालीं कागाळी केली. **नसीरखानानें** हेंच निमित्त करून **अल्लाउद्दिनशाहा**शीं लढाई आरंभिली. गुजराथच्या **अहंमदशाहानें** कुमक दिली, आणि वऱ्हाड प्रांत जिं-

कण्याचा त्यानें घाट घातला. त्यानें प्रथमतः त्या प्रांतांतील कामगारांशीं गुप्तपणें बोलणें लाविलें, आणि त्यांस असें वचन दिलें कीं, जर तुम्हीं मला येऊन मिळाल, तर मी तुम्हांस मोठीं बक्षिसें देईन. हें त्याचें बोलणें त्यांनीं मान्य केलें, आणि सर्व दक्षणी सरदारांनीं त्यास जाऊन मिळण्याचा निश्चय केला. त्यांनीं असा विचार मनांत आणिला कीं, **नसीरखान** हा प्रसिद्ध **ओमरच्या** वंशांतला आहे, यास्तव जर आपण त्याच्या शत्रूबरोबर लढत असतां लढाईंत पडलों, तर धर्मासाठीं आपले देह अर्पण केले असें होईल. नंतर **नसीरखान खानदेशा**ची सर्व फौज घेऊन वऱ्हाडांत शिरला व **गोंडवण**च्या राजानेंही त्याच्या कुमकेस बरीच फौज पाठविली. वऱ्हाडचा सुभेदार **खानजहान** हा खरा एकनिष्ठ असून फितूर होईना. तेव्हां तेथील दगलबाज कामगारांनीं त्यास कैद करण्याचा बेत केला. याची गुणगुण त्यास कळतांच तो **परनाळ**च्या किल्यावर पळून जाऊन किल्याची नाकेबंदी करून आंत राहिला, आणि सर्व हकीकतीचें पत्र हुजूर पाठविलें. इतक्यांत फितूर कामगार **नसीरखा**नास मिळाले, त्यांनीं त्यास वऱ्हाडचा शाहा असें पद देऊन त्याच्या नांवानें खुतबा वाचिला. आणि त्या बरोबर **परनाळ**च्या किल्यास वेढा घालण्यास निघाले.

खानदेशचा शाहा वऱ्हाडावर स्वारी करितो. हि. सन ८४१ इ. स. १४३७.

**अल्लाउद्दिनशाहा**स ही बातमी पोहोंचतांच या आणीबाणीच्या प्रसंगीं कशी तजवीज करावी याचा विचार करण्याकरितां त्यानें आपले प्रधान व सरदार यांचा दरबार भरविला. त्यांनीं अशी सल्ला दिली कीं, शत्रूच्या तोंडावर शाहाची खासा स्वारी जावी. कारण **गुजराथ** व **माळवा** येथील सुलतान आणि गोंडवणचा राजा हेही **नशीरखाना**स कुमक करण्यास तयार आहेत, असा संभव दिसतो. तथापि शाहास आपल्या सरदारांच्या इमानीपणाविषयीं संशय येऊन सुभेदार **मलिक उत् तुजार** यास या कामगिरीवर नेमिलें.

**मलिक् उत् तुजार** यानें हें काम पत्करिलें; आणि म्हणाला,"आम्हां चाकर लोकांस नाहीं होय म्हणण्याचा अधिकार नाहीं. सरकार सांगतील तें काम केलेंच पाहिजे, आणि सरकारची आज्ञा झाल्यास जीवही देण्यास तयार होणें हें चाकर लोकांचें काम आहे. परंतु दक्षणी आणि हबशी कामगारांच्या केवळ द्वेषामुळेंच माहीम (मुंबई) येथें

माझा पराभव झाला, हें सर्वांस महशूर आहे. कारण परदेशीय कामगार प्रसिद्धीस येतो, हें त्यांस सहन झालें नाहीं." यास्तव त्यानें मोठ्या नम्रतेनें शाहास अशी विनंति केली कीं, खानगीकडील फौज आणि दक्षणी व हबशी खेरीज करून बाकी सर्व परदेशी लोक माझ्या स्वाधीन करावे, म्हणजे अल्लाच्या आशिर्वादानें आणि सरकारच्या कृपेनें वऱ्हाडांतील सर्व बंदोबस्त यथास्थीत रीतीनें करीन, अशी मला उमेद आहे. या गोष्टीस **अल्लाउद्दिनशाहा**चा रुकार पडला, आणि खानगीकडील ३,००० मोंगल तिरंदाज आणि **फेरोजशाहा** व **अहमदशाहा** यांच्या पदरीं वाढलेले पुष्कळ मोंगल कामगार यांस त्या बरोबर जाण्याचा हुकूम दिला. यांमध्यें शाहाजादे **मंजु सुलतान** आणि **शाहा कुली सुलतान** असे दोन **जंगिजखान** या प्रसिद्ध योध्याचे सरळ वारस होते. **मलिक उत् तुजार** प्रथम दौलताबादेस गेला, आणि तेथून गुजराथ, व माळवा या प्रांताच्या सरहद्दीवर कांहीं फौज पाठवून ७,००० कसलेली मोंगैल फौज घेऊन कडूया तयारीनें वऱ्हाडांत शिरला. **खानजहान** यानें ही संधि साधून **खपरनाळा** किल्ला सोडून हुजूरच्या फौजेस **मेरवर** येथें येऊन मिळाला. **मलिक उत् तुजारानें खानजहानास** त्याच्या फौजेसुद्धां **एलिचपुरास** पाठविलें; आणि येणें करून **गोंडवण**च्या राजाची त्या मार्गानें वऱ्हाडांत येण्याची वाट बंद केली. आणि स्वतः मुख्य फौज घेऊन रोहणखेडा घांटाकडे गेला. कारण तेथें शत्रूची छावणी होती. घांटाच्या पायथ्याशीं खानदेशच्या फौजेपैकीं एक टोळी होती. तिनें त्यावर हल्ला केला. त्या टोळीची यानें अगदीं दुर्दशा उडवून कत्तल केली. हा पराभव एक अपशकुनच झाला, असें समजून नसी-

मलिक उत् तुजार हा परदेशी फौजेच्या सहाय्यानें वऱ्हाडांतील बंड मोडितो.

---

+ खलिप हसन मलिक उत् तुजार हा पूर्वी सांगितल्या प्रमाणें परदेशीय व्यापारी होता. दक्षणेंतील मुसलमानी राजाच्या कारकीर्दींत याचें इराणी आणि तुर्की लोकांशीं वैमनस्य होतें.

* आरबी, इराणी, आणि तातार या सर्व परदेशीय मुसलमानांस दक्षण इतिहासकारांनीं मोंगल हें नांव दिलें आहे. परंतु वास्तविक तें नांव एका विशेष जातीस देणें बरोबर होतें.

**खान** मार्गे हटत **बऱ्हाणपुरास** गेला. त्या शहरापर्यंत **तुजारानें** त्याचा पाठलाग केला. तेव्हां तेथें राहणें निर्भय होणार नाहीं, असें समजून तो **तेलंग** किल्यावर पळून गेला.

बऱ्हाणपूरच्या लोकांकडून जवाहीर, द्रव्य व दुसरे उंची जिन्नस अशारूपानें **मलिक उत् तुजारानें** जबर खंड घेऊन खानदेशचा मुलूख उध्वस्त करण्यास त्यानें सुरू केलें. हें कृत्य इच्छेनुरूप घडल्यावर बऱ्हाणपुरास परत आला, आणि तेथील पादशाही महाल जाळून टाकून त्याचे पायेसुद्धां खणून टाकिले. नंतर दक्षणेकडे जाण्यास म्हणून त्यानें कूच केलें. परंतु रात्रीं ती वाट सोडून व मोठा जबरा मुक्काम करून एकाएकीं ४,००० स्वारांनिशी तेलंग किल्यापाशीं जाऊन थडकला. **नासेरखाना**पाशीं त्यावेळीं १२,००० फौज होती. म्हणून त्यास वाटलें कीं, थकून भागून आलेल्या छोट्या फौजेवर आपणास जय मिळेल, म्हणून त्यानें लढाईचीतयारी केली. खानदेशच्या फौजेचा अगदीं पराभव होऊन **नसीरखानाच्या** कामगारां पैकीं बरेच कामगार व वऱ्हाडचे बंडखोर ठार झाले, आणि **मलिक उत् तुजार** मोठी लूट घेऊन विजयी होत्साता **अमदाबादबेदरास** परत आला. या लुटींत ७० हत्ती व कांहीं तोफा होत्या.

यानें जी मोठी महत्वाची कामगारी बजाविली, ती हुजुरच्या पसंतीस आली आहे, असें दाखविण्याकरितां **मलिक उत् तुजार** समीप आला तेव्हां **अल्लाउद्दिनशाहानें** शाहाजादा **हुमायून** यास लवाजम्यासह पुष्कळ अंतरावर त्यास सामोरें पाठविलें. शहरांत येऊन पोहोंचल्यावर आपल्या पोषाखांपैकीं एक पोषाख एक हत्ती व रत्नजडित जंब्या नजर करून तुजारास आपल्या दौलताबादच्या सुभेदारीवर जाण्यास निरोप दिला. त्याच प्रमाणें जे सरदार बरोबर गेले होते, त्यांसही किताब बदल्या व इनामें दिलीं. **शाहा कुली सुलतानानें** विशेषें करून जा-

---

+ हा छोटा किल्ला हल्लीं जरी अगदीं यःकश्चित दिसतो, तथापि त्यावेळीं नसीरखानाच्या आश्रय घेण्याच्या स्थळांपैकीं हें एक स्थळ होतें, असें दिसतें. बागलाणचा पहाडी देश मुसलमानांनीं अद्याप जिंकला नव्हता. परंतु असीरगडावर त्यानें आश्रय घेतला नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. कारण त्या ठिकाणीं जर याची थोडीशी तयारी असती, तर त्यानें दक्षणच्या फौजेस मुळींच दाद दिली नसती.

स्त कर्तबगारी दाखविली होती म्हणून शाहानें आपल्या कन्येशीं त्याचा निका लावला, आणि दक्षणी व हबशी या लोकांवर मोंगल लोकांस दरबारांत जागा द्यावी, असा हुकूम दिला. या वेळेपासून दक्षणी आणि मोंगल यां मध्यें हाडवैर जुंपलें; आणि संधि सांपडली तेव्हां दक्षणी लोकनीं मोंगलांचा सूड घेण्यास कमी केलें नाहीं.

दक्षणीलोकांवर परदेशी लोकांस मान मिळतो.

याच समयास विजयानगरच्या देवरायानें आपले बडे लोक व ब्राम्हण यांचा दरबार भरविला, आणि त्यांस असें विचारिलें कीं, आपला कर्नाटक देश बाहामिनी राज्यापेक्षां क्षेत्रानें वसुलानें, व लोकसंख्येच्या मानानें मोठा आहे. आपली फौजही त्यांच्याहून फार मोठी आहे. असें असतां मुसलमानांस वारंवार जय प्राप्त होतो, आणि आपणास खंडणी देणें भाग पडतें, याचें कारण काय? तेव्हां कित्येक म्हणाले, हिंदु लोकांवर म्लेंछांचें ३०,००० वर्षें वर्चच राहावें, असा ईश्वरी संकेत आहे, व हें भविष्य आपल्या ग्रंथांतरींही आढळतें. म्हणून हिंदु लोकांचा त्यांच्या हातून पराभव होतो. दुसरे कित्येक म्हणाले कीं, मुसलमानांचा वरचढपणा दोन गोष्टींमुळें आहे. (१) कर्नाटकच्या निर्बळ घोड्यांपेक्षां अधिक काटक व अधिक बळकट असे मुसलमानांचे घोडे असतात. (२) बाहामिनी शाहाच्या पदरीं नेहमीं पुष्कळ उत्तम तिरंदाज असतात, परंतु आपल्या फौजेंत फार थोडे आहेत.

हें ऐकून देवरायानें मुसलमानांस फौजेंत ठेवण्याचा हुकूम दिला. त्यांच्या खर्चाकरितां जमिनी दिल्या, व त्यांस निमाज पढण्याकरितां विजयानगर+ शहरमध्यें एक मशीद बांधिली. मुसलमान लोक स्वधर्माप्रमाणें आचरण करतील, तर त्यांस कोणी हरकत करूंनये, व उपद्रव देऊंनये, आणि आपल्या सिंहासनापाशीं एका सुंदर मौल्यवान

---

+ ही मोठी चमत्कारीक व लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. परधर्मी व परदेशी लोकांबरोबर व्यवहार करण्याविषयीं जो हिंदु लोकांस स्वभावतः तिटकारा आहे, तो ते नेहमीं स्वतःच्या हिताकरितां एकीकडे ठेवितात. यास्थळीं हिंदु राजानें मुसलमानांचा पराभव करण्याकरितां मुसलमानांस आपल्या पदरीं ठेविलें. वरील म्हणण्याच्या पुष्टिकरणार्थ याहून दुसरें ठळक उदाहरण सांपडणें फार कठीण आहे.

पीठावर कुराण ठेवावें, असा हुकूम केला. कारण येणेंकरून आपल्या स्वधर्मविरुद्ध आचरण न करितां मुसलमानांस आपल्या समक्ष मुजरा करितां यावा. आपल्या सर्व हिंदु शिपायांस तिरंदाजी शिकण्यास हुकूम दिला, आणि आपण स्वतः आपल्या सर्व सरदारांस घेऊन अशा आस्थेनें तिरंदाजी शिकूं लागला कीं, त्याच्याजवळ लौकरच २,००० मुसलमान व ६०,००० हिंदु इतकी फौज तिरंदाजींत तयार झाली. याशिवाय ८०,००० स्वार आणि २,००,००० पायदळ इतकी फौज भाले, बरच्या व तरवारी वापरणारी होतीच.

विजयानगरचा राजा आपल्या सैन्यांत मुसलमानांस चाकरीस ठेवितो.

हें जंगी सैन्य घेऊन बाहामिनी शाहाचें राज्य जिंकण्याचा त्यानें निश्चय केला, आणि या हेतूनें हिजरी सन ८४७ या सालीं एकाएकीं तुंगभद्रा नदी उतरून मुद्कलचा किल्ला घेतला. आपल्या मुलास रायचूर आणि बंकापूर या किल्ल्यांस वेढा देण्यास पाठविलें, आणि आपण कृष्णेच्या कांठीं सैन्यासह छावणी देऊन राहिला. तेथून सैन्याच्या टोळ्या रवाना करून सागर आणि विजापूर पर्यंत मुलूख लुटून उध्वस्त करविला, व लोकांची कत्तल उडविली. अल्लाउद्दिनशाहास ही बातमी लागतांच देवरायावर त्यानें स्वारी करण्याची तयारी केली, आणि तेलंगण, दौलताबाद व वऱ्हाड येथील आपल्या फौजेस विलंब न करितां अमदाबाद बेदर येथें येण्याविषयीं हुकूम पाठविला. सर्व फौज जमा झाल्यावर मोजदाद करितां ५०,००० स्वार आणि ६०,००० पायदळ आणि पुष्कळ तोफा इतकी फौज आपल्या जवळ आहे, असें त्यास समजलें. ही फौज घेऊन तो शत्रूच्या पारिपत्यास निघाला. शाहा समीप आला तेव्हां मुद्गल किल्ल्याच्या आश्रयास देवरायानें आपली छावणी दिली, आणि शाहा येत असतां मार्गांत उपद्रव दे-

विजयानगरचा राजा बाहामिनी शाहावर स्वारी करितो. इसवी सन १४४३.

---

+ मुसलमानांसही परधर्मी हिंदूंस मुजरा करणें प्रशस्त वाटत नव्हतें. यास्तव त्यांची समजूत घालण्याकरितां हिंदुराजानें आपल्या सिंहासनापुढें कुराण ठेवूं दिलें, आणि त्यास त्यांणीं सलाम केला म्हणजे त्यांनीं आपला मान राखिला अशी राजानें आपली समजूत घातली. कारण येणेंकरून दोघांच्याही मनाची समजूत करून (पुढें चालू.)

ण्याकरितां पुष्कळ सड्या फौजेस पाठविलें. मुदूगलापासून १२ मैलांवर शाहाची फौज थांबली, आणि शाहानें **मलिक उत् तुजारास** दौलताबादच्या पथकासह देवरायाच्या मुलावर पाठविलें आणि विजापुरचा सुभेदार **खानजहान** आणि वऱ्हाड व तेलंगणच्या फौजेवरील सेनापति **खान अझीम** यांस **देवरायाच्या** मुख्य फौजेवर जाण्यास सांगितलें. **मलिक उत् तुजारानें** प्रथमतः **रायचुरास** जाऊन देवरायाच्या वडील मुलाबरोबर लढाई केली, तो लढाईंत जखमी होऊन **बंकापुरास** पळून गेला. तेथें वेढा उठवून त्याचा धाकटा भाऊही त्यास येऊन मिळाला.

मोठ्या निकराच्या तीन लढाया होतात.

सुमारें दोन महिन्याच्या अवकाशांत या दोहों जंगी फौजांमध्यें तीन लढाया झाल्या. पहिल्या लढाईंत दोहोंबाजूंकडील पुष्कळ लोक पडले, आणि हिंदुलोकांचाच जय होऊन मुसलमानांचें बरेंच नुकसान झालें. दुसऱ्या लढाईंत शाहास जय प्राप्त झाला, आणि तिसरींत **खान झमन** यानें फेकलेल्या भाल्यानें देवरायाचा ज्येष्ठ मुलगा मेला. यामुळें हिंदु लोकांमध्यें धांदल उडून ते मुद्गलच्या किल्ल्यांत घाईघाईनें पळाले. **मशीर उल् मुल्क** आणि त्याचा भाऊ हे दोघे मोठे कामगार पळत असलेल्या हिंदूंच्या पाठीस लागले. हिंदूंनीं त्यांच्या शौर्याची वाहवा करून त्या दोघांसही जिवंत धरून देवरायापुढें नेलें. हें वर्तमान कळतांच **अल्लाउद्दिनशाहानें** रायास असें पत्र लिहिलें कीं, या दोहों सरदारांचे जीव दोन लाख साध्या माणसांच्या जिवाबरोबर आहेत, असें मी समजतों. आणि आमच्या घराण्याची अशी वहिवाट आहे कीं, एका मुसलमानाच्या जिवाकरितां एक लाख हिंदूचे जीव घ्यावयाचे. यास्तव जर आपले लोक या दोघां कैदी कामगारांचे जीव घेतील, तर प्रत्येकाच्या जिवाकरितां एकेक लाख हिंदूंची कत्तल केल्याशिवाय मी सोडणार नाहीं, अशी प्रतिज्ञा केली आहे.

**देवरायास** मागील अनुभवावरून माहीत होतेंच कीं, बाहामिनी वंशांतील राजे आपल्या प्रतिज्ञा दृढनिश्चयानें खऱ्या करण्यास

---

कोणास वाईट वाटण्यास जागा ठेविली नाहीं.

कधीं चुकत नाहींत. म्हणून राजानें आपल्या विश्वासू वकिलांस शाहाकडे पाठविलें, आणि असें कळविलें कीं, यापुढें माझ्या मुलखास उपद्रव देणार नाहीं, असें वचन मिळेल तर पूर्वी ठरलेली खंडणी दरसाल देत जाईन, आणि दोघां कैद्यांसही मुक्त करीन. शाहानें या शर्ती कबूल केल्या व तह ठरला. नंतर देवरायानें लागलीच **मशीर उल् मुल्क** आणि त्याचा भाऊ यांस परत पाठविलें, आणि शिवाये ४० लढाऊ हत्ती, व दुसऱ्या कांहीं मौल्यवान् चिजा नजर केल्या, आणि कांहीं वर्षांची तुंबलेली खंडणीही दिली. शाहानेंही देवरायास सुंदर पोषाख दिला, व रत्नजडित सामान घातलेले असे कित्येक घोडे नजर केले. यानंतर शाहा राजधानीस परत निघाला. या पुढें या शाहाची कारकीर्द संपेपर्यंत देवराय दरसाल नियमानें खंडणी पाठवीत असे, व शाहानेंही या प्रसंगीं झालेला तह अक्षरशः पाळला.

विजयानगरच्या राजाशीं तह.

**अल्लाउद्दिन शाहानें** तक्तावर बसल्यानंतर लौकरच अमदाबाद बेदर येथें एक भिक्षान्गृह बांधिलें. त्याच्या खर्चाकरितां मोठ्या जमिनी नेमून दिल्या, आणि भिकाऱ्यांस दवापाणी देण्याकरितां हिंदु व मुसलमान वैद्य तेथें ठेविलें. आपल्या राज्याच्या सर्व भागीं लोक धर्माचरणानें चालत आहेत किंवा नाहींत, हें पाहण्याकरितां काजी व मौलवी यांस तो वरचेवर पाठवीत असे. तो स्वतः जरी दारू पीत असे, तथापि त्यानें तिची इतरांस मनाई केली होती. त्याच प्रमाणें जुगार खेळण्याचेंही त्यानें बंद केलें होतें. तो दरवेशी लोकांच्या गळ्यांत सांखळ्या घाली, आणि त्याशिवाय जे आळशी व बदमाष लोक आढळतील, त्यांस रस्त्यांतील केरकचरा काढून टाकण्यास, मोठे दगड वाहण्यास व दुसऱ्या सर्व प्रकारचीं श्रम व साहसाची मजुरी करण्यास लावून त्यांस शिक्षा करीत असे. यांत त्याचा हेतु असा असे कीं, येणेंकरून त्यांनीं आपलें वर्तन सुधारावें, आणि उद्योग करून पोट भरावें; किंवा राज्यांतून निघून जावें. एक दोन वेळ ताकीद केल्यावर व थोडीशी शिक्षा करून कानउघाडणी केल्यावरही जर कोणी दारू पिईल, किंवा तो आरोप त्यावर शाबीद होईल, तर त्याच्या घशांत वितळलेलें शिसें ओतावें, अ-

शाहाचीं उपयुक्त कृत्यें.

सा त्यानें कायदा केला होता. गुन्हेगार कोणच्याही दर्जाचा असला तरी ही शिक्षा अमलांत आणीत असे.

राज्यांत सुधारणा.

सय्यद **महंमद जिसू दुराज** याच्या नातवां पैकीं एक नातू एका कलावंतिणीशीं फिदा होऊन तिच्या संगतीनें दारू पिण्यास प्रवृत्त झाला, आणि निशा चढल्यावर तिच्याशीं भांडूं लागला. आणि त्यानें त्या कलावंतिणीस मारिलें, व तिच्या केंसत्या उपटल्या. हा दंगा कोतवालाच्या कानीं जातांच त्यानें दोघांसही कैद केलें. परंतु सय्यदाचा दर्जा मनांत आणून तो खटला कोतवालानें शाहाच्या हुजूर निकालास पाठविला. शाहास त्याचा फार राग आला, आणि त्यानें असा हुकूम केला कीं, शहरच्या एका मोठ्या चवाठ्यावर ह्या मोठ्या गुन्हेगारास नेऊन त्याच्या पायाच्या तळव्यावर २०० फटके मारावे, आणि पुनः दारू कधींही पिणार नाहीं, अशाबद्दल त्याजकडून कुराणाची शपथ घ्यावी. त्या कलावंतिणीच्या आंगावर गादवाचें कातडें घालून तिची रस्त्यांतून धिंड काढिली, आणि तिला शहरांतून हद्दपार केलें. शाहानें मुलकी व लष्करी खात्यांतील कामाची अशी उत्तम शिस्त ठेविली होती कीं, **फरीदून** आणि **नवशीर वन** यांच्या राजकीय कारभाराची व कायद्यांची याच्या पुढें कांहीं मातबरी राहिली नाहीं. दर शुक्रवारीं व सर्व सणावारीं मशिदींत जाऊन शाहा खुतबा ऐके. मनुष्याचा जीव घेणें हें त्यास मनापासून आवडत नसे. त्यानें शेंकडों मूर्तिपूजकांचीं देवळें पाडून त्या ठिकाणीं मशिदी बांधिल्या. नाझरीन किंवा ब्राम्हण लोकांशीं तो कधीं बोलत चालत नसे, व त्यांस राज्यांत कामावरही नेमूं देत नसे.

अखेरचें वर्तन.

विजयानगरची लढाई झाल्यानंतर शाहानें आपलें आचरण बदललें, आणि चैनबाजींत अगदीं गर्क झाला. सर्व राज्यकारभार प्रधानावर सोंपवून त्यानें अती सुंदर अशा १,००० स्त्रिया गोळा केल्या. त्यांस राहण्याकरितां एक मोठा सुंदर महाल बांधिला, आणि एका तळ्याच्या कांठीं क्रीडेकरितां एक सुरेख बाग केला. या महालास तो 'स्वर्गाचा महाल' म्हणे. या ठिकाणीं तो आपला ब-

+ हे दोन इराणचे प्राचीन राजे होते.

हुतेक काळ दारू पिण्यांत व वारांगनांचें मुखचुंबन करण्यांत, आणि त्यांचें गाणें बजावणें ऐकण्यांत घालवीत असे. या चैनबाजींत गर्क असतां चार किंवा पांच महिन्यांतून एकादे वेळीं कचेरीस येत असे, आणि दक्षणी कामगार सर्व राज्य सूत्रें मन मानेल तशीं चालवीत.

याच समयास समुद्रकिनाऱ्यावरील सर्व किल्ले ताब्यांत घेण्याचा **मेमून उल्ला दक्षणी** यानें बेत केला. हा बेत सिद्धीस नेण्याकरितां शाहानें **मलिक उत् तुजारास** आपली फौज घेऊन पश्चिमेकडे जाण्यास नेमिलें, व शिवाय त्याजबरोबर सात हजार दक्षणी पायदळ आणि तीन हजार आरबी घोडे दिले. **मलिक उत् तुजारानें चाकणास** आपलें मुख्य ठाणें करून **जुन्नर** शहराजवळचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला, आणि तेथून निरनिराळ्या वेळीं फौजेच्या टोळ्या कोंकणांत पाठवून त्यानें पुष्कळ राजांस जिंकिलें. शेवटीं तो स्वतः कोंकण प्रांतीं गेला, आणि **शिर्के**+ घराण्यांतील एका राजाच्या किल्ल्यास त्याणें वेढा घातला; व त्यानें लौकरच त्यास शरण येण्यास लाविलें, आणि आपल्या सर्व कुटुंबसुद्धां तो राजा तुजाराच्या स्वाधीन झाला.

मलिक उत् तुजारास कोंकणपट्टी जिंकण्यास पाठवितात.

मलिक उत् तुजारानें **शिरक्यास** आग्रहपूर्वक असें सांगितलें कीं, तूं मुसलमान हो नाहीं तर तुझा जीव घेतों. तेव्हां त्या धूर्त हिंदूनें बाह्यात्कारी मोठा नम्रपणा दाखवून मुसलमान सरदारास असें कळविलें कीं, **खेळण्याचा*** राजा **शंकरराय** याच्या व माझ्या घराण्यामध्यें फार दिवसांचें वांकडें आहे. यास्तव जर मी एकटाच मुसलमान झालों, आणि तो आपल्या मुलखांत अप्रतिबंध रीतीनें राज्य करीत राहिला, तर आपली स्वारी परत गेल्यावर धर्मांतर केल्याबद्दल तो माझी फार अप्रतिष्ठा करील व टर उडवील, आणि माझ्या घराण्यांतील सर्व माणसांस व प्रजेस बंड करण्यास चिथावून देईल. यास्तव जो मुलूख त्याच्या घराण्याकडे आज कित्ये-

+ शिरके हें कोंकणांतील फार प्राचीन घराण्यांपैकीं एक घराणें आहे. सातारच्या एका राजाची आई या घराण्यांतील होती.

* विशाळगड.

क काळ चालला आहे, तो त्याजकडे राहूनये, म्हणून शिरकेया-नें असा अर्ज केला कीं, आपला प्रतिस्पर्धी जो **खेळण्याचा शंकरराय** त्याचा मुलूख जिंकून माझ्या किंवा माझ्या सरदारांच्या स्वाधीन कराल, (असें करण्यास आपणास कांहीं अवघड जाणार नाहीं.) तर मी मुसलमानी धर्म स्वीकारून शाहाच्या नोकरांत आपली गणना करीन. आणि दरसाल शाहाच्या हुजूर खंडणी पाठवून शिवाय जे दुसरे राजे आपल्या कर्तव्यास व राजनिष्ठेस चुकतील, त्यांसही ताव्यावर आणण्यास सहाय्य करीन.

**मलिक उत् तुजारा**नें उत्तर केलें कीं, त्या राजाच्या मुलखांत जाण्याची वाट गडद जंगलांतून आहे, व वाटेंतील घांटही बिकट आहेत. त्यास **शिरक्या**नें असें उत्तर दिलें कीं, मजसारखा इमानी व माहितगार सैन्यास वाट दाखविण्यास हजर असतां सैन्यांतील माणसांच्या एका केंसासही इजा होऊं देणार नाहीं. या शिरक्याच्या वचनावर भरंवसा ठेवून हिजरीसन ८५८ सालीं मलिक उत् तुजार खेळण्यावर स्वारी करण्यास निघाला. आरंभींच कांहीं दक्षणी व हबशी कामगारांनीं पहाडांत शिरण्याचें नाकबूल केलें, आणि ते आपल्या फौजेसह तुजारास सोडून मागें राहिले. शिरक्यानें पूर्वींचें वचन दिल्याप्रमाणें पहिल्या दोन दिवस एका रुंद व चांगल्या वाटेनें मुसलमानी सैन्यास नेलें, तेणेंकरून मुसलमान सरदारानें त्याची तारीफ केली. परंतु तिसऱ्या दिवशीं त्यानें अशा बिकट वाटेनें त्यांस नेलें कीं, त्या घोर अरण्यास भिऊन मर्द वाघही गर्भगळित होईल, आणि त्याचें पुरुषत्व जाईल. चढण्याच्या घांटांतील वाटा इतक्या वांकड्या तिकड्या होत्या कीं, त्यांची तुलना कुरळ्या केंसांच्या कुरळेपणाशीं केली तरी बरोबरी होणार नाहीं. एखाद्या सुंदर स्त्रीच्या मोहपाशांत सांपडल्यापेक्षांही तेथून सुटून जाणें जास्त बिकट व दुर्धर होतें. त्या पर्वतांचा भयंकर देखावा पाहून प्रत्यक्ष राक्षस व भुतें ही तेथील कड्यांपाशी व गुहांपाशीं आल्यावर दचकून जातील, आणि प्रत्यक्ष भुतें किंवा ब्रम्हराक्षससुद्धां गर्भगळीत होऊन जातील. या अरण्यांत

मलिक उत् तुजार शिरक्याच्या सांगण्यावरून खेळण्याचा राजा शंकरराय यावर स्वारी करण्यास निघतो. हिजरी सन ८५८ इ-स-१४५३.

कधींही सूर्याचा कवडसासुद्धां पडत नसे. जणू काय परमेश्वरानें त्याची अशी रचना केली होती कीं, त्यांत उन्हाच्या कवडशाचा कधींही प्रवेश होऊनये. तेथें वाढलेलें गवतसुद्धां सर्पाच्या सुळ्या दांतांप्रमाणें चिंवट व तीक्ष्ण होतें, आणि हवा तर अजगराच्या श्वासासारखी दुर्गंध होती. तेथील पाण्यामध्यें मृत्यूच मूर्तिमंत वास करीत होता, आणि प्रत्येक वाऱ्याची झुळुकही विषानें प्रफुल्लित होती. अशा वांकड्या तिकड्या भयंकर वाटेनें जाऊन मुसलमान लोक अगदीं भिऊन व थकून गेल्यावर पुढें याहून गडद व घोर अरण्यांत शिरले. तेथील वाटतर अशी बिकट होती कीं, त्यावरून वाऱ्यास सुद्धां वाहतां येण्याजोगें नव्हतें. त्या वाटेच्या तिहीं बाजूस गगनचुंबित पर्वत होते, आणि चवथ्या बाजूस एक समुद्राची खाडी आली होती. यामुळें तेथून पुढें जाण्यास मार्ग नव्हता, किंवा ज्या वाटेनें तेथें गेले, त्या वाटेशिवाय मागें परतण्यासही मार्ग नव्हता.+

या घोरप्रसंगीं मलिक उल् तुजार आजारी पडून त्यास रक्ताची हगवण लागली. यामुळें त्यास नियमितपणानें कुच करितां येईना, व सैन्यांत शिस्त राखण्याविषयीं हुकूमही देतां येईना. सैन्यांतील लोक दिवसभर थकून जागा सांपडेल तेथें विश्रांति घेण्यास पडत. कारण जवळ जवळ दोन तंबू मारण्यास सुद्धां जागा सांपडत नसे. याप्रमाणें थकून भागून अव्यवस्थित रीतीनें मुसलमानी फौज विश्रांति घेत पडली असतां, विश्वास घातकी शिरका शंकररायाकडे गेला, आणि सर्व मुसलमानांस तुझ्या जबड्यांत आणून सोडिलें आहे, असें त्यानें त्यास कळविलें. शंकरराय मोठी फौज घेऊन निघाला, आणि शिरक्यानें ज्या ठिकाणीं मुसलमानांस आणिलें होतें, त्या ठिकाणीं शंकररायास त्यानें नेलें, व त्याजकडून सर्व बाजूंनीं मुसलमानांवर हल्ला करविला. आपणावर कोणीकडून एकाएकीं छापा येईल, अशी मुसलमानांस

---

+ ग्रंथकाराच्या वर्णनाच्या शैलीचा मासला देण्याकरितां वरील वर्णन अक्षरशः दिलें आहे. हें वर्णन कोंकण घांटमाथ्याच्या साधारण देखाव्याचें लाक्षणिक आहे. परंतु मुसलमानी सैन्य अमक्याच वाटेनें आलें, व अमक्याच वाटेनें त्यांचा नाश झाला, असें ठरवितां येत नाहीं.

बिल्कुल धास्तीही नसल्यामुळें सारा दिवस श्रम करून व थकून ते गाढ झोंपी गेले होते. अशा या पराधीन व दुर्बल स्थितींत असतां में- द्यांप्रमाणें कठारींनीं व तरवारींनीं **शंकररायाच्या** लोकांनीं ७,००० मुसलमान शिपायांस कापून काढिलें. त्या वेळीं वारा जोराचा सुटला होता, त्यामुळें झाडांच्या खांद्या एकमेकांवर आदळून जो मोठा गोंगाट चालला होता, त्यांत मुसलमानांच्या किंकाळ्यासुद्धां एकमेकांस ऐकूं आल्या नाहींत. **मदिना, कर्बला** आणि **नजफ** येथील बड्या बड्या ५०० सय्यदांसहवर्तमान **मलिक् उत् तुजार** या कत्तलींत ठार झाला. त्याच प्रमाणें जे कांहीं दक्षणी व हबशी कामगार आपल्या २,००० लोकांसह बरोबर होते, त्यांचीही हीच अवस्था झाली. उजाडण्यापूर्वीच हें रक्तस्रावाचें काम पुरें करून त्या अरण्यांतून आपल्या लोकांसहवर्तमान **शंकरराय** परत गेला.

त्याच्या फौजेची कत्तल होते, व तो ठार मारला जातो. इसवी सन १४५३.

या भयंकर कत्तलींतून जे थोडे वांचले, त्यांनीं मोठ्या कष्टानें आलेला मार्ग शोधून काढला, व तेथून बाहेर गेले. आणि घांटमाथ्यावरील मैदानांत मागें राहिलेले जे दक्षणी आणि हबशी कामगार छावणी देऊन होते, त्यांस जाऊन मिळाले. त्यांनीं त्या परदेशी कामगारांस अशी सल्ला दिली कीं; तुम्हीं आपापल्या घरीं जाऊन थकवा घालवावा, आणि पुढें नौकरी करण्यास सज्ज व्हावें. हें म्हणणें मोंगलांनीं मान्य केलें नाहीं. ते म्हणाले कीं, **चाकण**चा किल्ला नजीकच आहे, तेथें आम्हीं जातों, आणि पुनः ताजे तवाने झालों, म्हणजे फौजेंत येऊन मिळतों. त्यांपैकीं कित्येक मोंगलांनीं अविचारानें असें म्हटलें कीं, दक्षणी कामगारांच्या भ्याड व फितूर वर्तनामुळें **मलिक् उत् तुजार** आणि **सय्यद** यांवर हा दुर्घट प्रसंग आला. **चाकण** येथें पोंहोंचल्यावर मोंगलांनीं अशी भीति घातली कीं, दक्षणी लोक फौज सोडून मागें राहिले, याबद्दलची सर्व हकीकत आम्हीं हुजूर लिहून कळवितों.

परदेशी व दक्षणी कामगार यांमध्यें वैमनस्य.

दक्षणी लोकांस याची भीति वाटली, व आपणच यांवर दोषारोप करावा, असा त्यांनीं निश्चय केला. म्हणून त्यांनीं शाहास अशा खबरीचें पत्र पाठविलें कीं; **शिरके** या नांवाच्या जमेदाराच्या चि-

थावणीवरून, आम्ही तसें न करण्यास नानाप्रकारें विनवणी करीत असतां तें न जुमानतां सय्यद व मोंगल यांच्या सल्यानें, एक भलतेंच अविचाराचें कृत्य करण्यास **मलिक् उत् तुजार** प्रवृत्त झाला. त्यांत त्यास मृत्यू येऊन त्याच्या अविचारीपणाचें शासन तर त्यास झालेंच. त्याबरोबर असलेले बहुतेक लोकही त्याच पंथास गेले. जे कांहीं थोडे परदेशी लोक वांचले, त्यांनीं फौजेवर दुसऱ्या सरदाराची नेमणूक होईपर्यंत आम्हांबरोबर न राहतां मोठ्या उद्धटपणाचें वर्तन केलें; हुजूरच्या पायांस टाकून बोलले; आणि ते सर्व निघून चाकणच्या किल्यावर गेले. आणि कोंकणच्या राजांस बंड करण्यास प्रवृत्त करून त्यांस सहाय्य देण्यास सिद्ध झाले आहेत.

शाहा परदेशी लोकांस ठार मारण्याचा हुकूम देतो.

**शीर उल् मुल्क** दक्षणी व **इमाद उल् मुल्क घोरी** याचा मुलगा **निजाम उल् मुल्क** या दोघां कामगारांचें मोंगलांशीं वांकडें होतें, व ते मोंगलांस आपले प्रतिस्पर्धि असें समजत. यांच्या विद्यमानें दक्षणी लोकांनीं शाहास पत्रें पाठविलीं. **अल्लाउद्दीन शाहा** जेव्हां दारू पिऊन तर्र झाला होता, तेव्हां हीं पत्रें त्यांनीं त्यास दिलीं, आणि मलिक् उत् तुजार याच्या पराभवाची हकीकत सांगून त्या कत्तलींत वांचलेल्या मोंगल लोकांच्या उद्धट वर्तनाविषयीं कळविलें. ही सर्व हकीकत अशी मीठ तिखट लावून द्वेषमूलक शब्दांनीं शाहाच्या मनांत भरवून दिली कीं, शाहा परदेशीयांवर अतिशय संतापला, आणि क्षणभर सुद्धां विचार न करितां त्याच दोघां मनसबदारांस चाकणच्या किल्यावर जाऊन सर्व परदेशी लोकांस ठार मारावें, असा त्यानें हुकूम दिला. पैगंबरांचे वंशजांस मारण्याकरितां **अबदुल्ला झियत** किंवा **शमस उल् जोषन**ज्या प्रमाणें तयारीनें निघाला, त्याच प्रमाणें हे कामगारही मोठी फौज घेऊन चाकणास निघाले. दक्षणी फौज समीप आली,

---

+ चाकण येथील सय्यदांवरील हल्ल्याची पैगंबराचा नातू हुसेन आणि त्याचे ७० अनुयायी यांवर कर्बलानजीक अबदुल्ला झियत व शमसुल ज्योषन यांनीं जो हल्ला केला होता, त्याशीं फेरिस्तानें तुलना केली आहे. यांनीं पैगंबराचा नातू व त्याजबरोबर असणाऱ्या थोड्या लोकांवर मैदानांत हल्ला करून त्यांची कत्तल केली.

असें ऐकतांच **सय्यद** आणि **मोंगल** किल्याचे दरवाजे बंद करून आंत राहिले, आणि आपण निरपराधी आहों, अशा मजकुराचा अर्ज खरी हकीगत लिहून हुजूर पाठविला. परंतु **शीर उल् मुल्कानें** त्यांच्या जासुदास अडवून त्याच्या जवळचीं पत्रें फाडून टाकिलीं. तेव्हां त्यांनीं दुसरीं पत्रें पाठविलीं, त्यांचीही अवस्था तीच झाली. तेव्हां आपल्यापैकीं कोणास जाऊं देत नाहींत, असें पाहून आपणाजवळ कित्येक वर्षें नोकरीस असलेल्या हिंदूपाशीं त्यांनीं आपला अर्ज दिला. हे दोघे दुष्ट बाहेरून तसे आंतूनही काळे होते. त्यांनीं तीं पत्रें नेऊन **शीर उल्मुल्का** पाशींच दिलीं. तीं ही त्यानें पूर्वीप्रमाणेंच फाडून टाकिलीं, व त्या विश्वास घातकी लोकांस इनामें दिलीं. चाकणास जाण्यायेण्याच्या सर्व वाटांची अशी नाकेबंदी केली कीं, कोणाही मनुष्यास झाडा घेतल्याशिवाय आंत किंवा बाहेर सोडीनात. तेव्हां या दुर्दैवी सरदारांची **हुसेना** प्रमाणेंच पुरी निराशा झाली. परंतु त्यांनीं अखेरपर्यंत आपला बचाव करण्याचा दृढ निश्चय केला. या प्रमाणें सय्यद अगदीं हटास पेटले, असें पाहून कोंकणांतून कांहीं दक्षणी सरदारांस कुमकेस बोलाविलें, आणि चाकण किल्यापुढें त्यांनीं मोठी फौज जमविली. दोन महिनेपर्यंत वेढा पडला तरी कांहीं उपयोग झाला नाहीं. या काळांत **शीर उल् मुल्कानें** बरेच वेळां हुजूर अशीं पत्रें पाठविलीं कीं, सय्यद आणि मोंगल बंडवाले हटास पेटले आहेत, आणि मी गुजराथच्या शाहापाशीं कुमक मागितली आहे, व त्या कुमकेबद्दल त्यास चाकणचा किल्ला देण्याचें कबूल केलें आहे. हुजूर असलेल्या दक्षणी प्रधानांचें यांस पूर्ण पाठबळ होतें. म्हणून ते दुसऱ्यांस दहशत पडावी, अशा रीतीनें या बंडखोरांस शासन करावें, अशा मतलबाचे शाहाचे हुकूम घेऊन वारंवार पाठवीत. जर यदाकदाचित् एखादें पत्र सय्यदांकडून राजधानींत आलेंच, तर तें शाहाच्या दृष्टीस पडूं देत नसत, व पत्र आणणारास असें सांगत कीं, शाहा त्यांजवर इतका रागावला आहे कीं, त्यांकडून आलेला एक शब्दही ऐकून घेणार नाहीं.

दक्षणी सरदार परदेशी लोकांस चाकण किल्यांत कोंडितात.

किल्यांतील सामग्री जेव्हां संपत आली, तेव्हां आपल्या कुटुंबाच्या

रक्षणाकरितां हवे तितके लोक ठेवून, बाकीच्यांनीं शत्रूंवर एकदम हल्ला करावा, असा किल्यांतील सय्यद व मोंगल यांनीं बेत केला. यांत त्यांचा असा हेतु होता कीं, लढतां लढतां त्यांमधून निसटून राजधानीस जावें, आणि शाहास खरी हकीकत कळवावी. हा त्यांचा बेत दक्षणी लोकांस कळला, तेव्हां त्यांस भय वाटलें. कारण त्यांस पक्कें माहीत होतें कीं, सय्यद व मोंगल अगदीं जिवावर उदार होऊन लढतील, आणि कांहीं असामी बहुतकरून हुजूर जाऊन पोहोंचतील, आणि आपलें सर्व कृष्ण कारस्थान उघडीस येईल. यास्तव त्या सय्यद व मोंगल लोकांस पकडण्यासाठीं त्यांनीं दुसरीच युक्ति योजिली. आपला मतलब साधण्याकरितां दक्षणी कामगारांनीं सय्यदांस असा निरोप पाठविला कीं, तुम्हीं पैगंबराचे अनुयायी असल्यामुळें तुम्हां सय्यदांची व तुमच्या मुलाबाळांची आम्हांस फार कींव आली, व शाहापाशीं तुम्हांस माफी करण्याकरितां आम्हीं फार मध्यस्थि केली. तेव्हां शेवटीं आमचा अर्ज कबूल करून राज्यांतून मुलांबाळांसुद्धां इजा न देतां तुम्हांस जाऊं द्यावें, असा शाहानें हुकूम केला आहे. आपल्या बोलण्याच्या पुष्टिकरणार्थ या मतलबाचा एक बनाऊ हुकूम त्यांस दाखवून **शीर उल् मुल्क** आणि **निजाम उल् मुल्क** या दोघां सरदारांनीं **येझिद खलिपा**+ प्रमाणें अल्लाची व कुराणाची शपथ घेऊन त्यांच्या जिवास व जिंदगीस इजा करणार नाहीं, असें सांगितलें.

या देवधर्माच्या शपथांवर विश्वास ठेवून ते सुमारें २५०० दुर्दैवी परदेशी लोक आपल्या बायकामुलांसुध्दां किल्यांतून बाहेर आले, आणि निघून जाण्याची तयारी करण्याकरितां कांहीं दक्षणी सरदा-
अंतरावर जाऊन राहिले. यांत १२०० लोक पवित्र स- र परदेशी लोकां-
य्यद होते. दक्षणी मनसबदारांनीं ३ दिवस आपलीं ची कपटानें क-
वचनें पाळिलीं, आणि त्यांस सहाय्य करून व हरए- त्तल करितात.
कारें उपयोगीं पडून आपल्यावर त्यांचा विश्वास बसवून घेतला, व त्यांच्या मनांत आपल्याविषयीं अंदेशा येण्यास कांहीं जागा ठेविली नाहीं. चवथ्या दिवशीं त्यांतील मुख्य सरदारास आग्रह करून किल्यांत

---

+ खलीप येझिद यानें हुसेनावर हल्ला करविला होता.

मेजवानीस बोलाविलें. त्या प्रमाणें **कासिमबेग**, **करारखान कुर्द**, आणि **अहंमद बेग** हे तिघे शिवाय करून बाकी सुमारें ३०० ठळक ठळक सय्यद व मोंगल मेजवानीस गेले. त्यांचें जेवण चाललें असतां **शीर उल् मुल्कानें** इशारा करितांच पुष्कळ हत्यारबंद लोकांनीं त्यांवर हल्ला केला, व सर्वांस ठार मारिलें. याचवेळीं किल्याबाहेर ४,००० दक्षणी लोकांनीं त्या परदेशियांच्या छावणीवर हल्ला करून प्रत्येक पुरुषास ठार मारिलें, आणि आंगावरच्या मुलांस सुद्धां जिवंत ठेविलें नाहीं. अशी कत्तल केल्यावर त्यांनीं त्यांचे तंबू लुटले, व स्त्रियांची अत्यंत विटंबना केली. **हुसेनास** मारल्यापासून सय्यदांचा असा छळवाद कधीं झाला नव्हता. जे आपणास पैगंबराचे सेवक म्हणवितात, त्यांनीं त्यांच्या वंशजांचा असा नीचपणानें छळवाद करावा, हें मोठें आश्चर्य नाहीं काय?

**कासिम बेग** आणि **मोंगल** यांनीं आपल्या दुर्दैवी सोबत्यांपासून सुमारें २ मैलांवर आपली छावणी दिली होती. त्यांस या क्रूरकृत्याची वार्ता समजतांच ते हत्यारबंद झाले, आणि आपल्या बायकांस सुद्धां शिपायाचा वेष देऊन राजधानीकडे पळाले. लागलीच **शीर उल् मुल्कानें दाऊदखाना**स २,००० स्वार देऊन त्यांचा पाठलाग करण्यास पाठविलें, आणि त्या बंडखोरांस अडवून पकडावें, किंवा ठार मारावें, नाहीं तर शाहाची मर्जी खप्पा होईल, अशीं पत्रें सर्व जाहागीरदार व मक्तेदार यांस पाठविलीं. फक्त ३०० लोकांनिशीं कोठें मुकाम न करितां **कासिम बेग** एकसारखा टपाला प्रमाणें चालला होता. जेव्हां दक्षणी अतिशय जवळ येऊन पोहोंचत, तेव्हां मात्र त्यांची फळी फोडून त्यांस अस्ताव्यस्त करण्यासाठीं मध्यें केव्हां केव्हां थांबे, व हें काम जिवाची आशा न धरितां त्यानें मोठ्या शौर्यानें फत्ते केलें. तो उघड्या शेतांत रात्र घालवी, आणि या प्रमाणें कांहीं दिवस प्रवास करून तो पुढें गेला. **बीड** शहरापाशीं पोहोंचल्यावर तेथील जाहागीरदार **हसनखान** याची कुमक घेऊन दाऊदखानानें मोंगलांस घेरिलें. विजयानगरच्या एका स्वारींत कासिमबेग यानें हसनखानास मोठ्या संकटानें वांचविलें होते, म्हणून या प्रसंगीं आपण त्याच्या उपयोगीं पडा-

परदेशी सरदार कासिमबेग पळून जातो व दक्षणी सरदार त्याचा पाठलाग करितात.

बीडचा जाहागीरदार त्यास मदत करितो.

वें, असा हसनखानानें निश्चय केला. तो दाऊदखानास ह्मणाला कीं, मोंगल लोक आपण होऊन राजधानीस जात आहेत, तेव्हां त्यांस बं-डवाले ह्मणणें हें वेडेपण होय. इतक्यांत **शीर उल् मुल्क** १,५०० लो-कांनिशी दाऊदखानास स्वतः येऊन मिळाला, व त्यांनीं मोंगलांवर ह-ल्ला केला. जीव वांचविण्याकरितां ज्या प्रमाणें लोक लढतात, त्या प्रमाणें **कासिम बेग** आणि त्याबरोबरचे लोक या वेळीं लढले. पहिल्याच ह-ल्यांत तीर लागून दाऊदखान सुदैवानें मेला. परंतु येणेंकरून सूड घे-ण्याकरितां दक्षणी लोक अधिकच चेवले, आणि त्यांनीं मोंगलांस बहु-तेक जेरदस्त केलें. परंतु इतक्यांत हसनखान त्यांच्या सहाय्यास आ-ला, तेव्हां दक्षणी लोक दाऊदखानाचें प्रेत घेऊन चाकणाकडे मागें ह-टले. हसनखानानें त्या शूर पण हतभागी मोंगलांस आपल्या घरीं नेलें, व त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था केली, आणि शिवाय शा-हासही त्यांच्या तर्फे लिहून पाठविलें. तेव्हां शाहानें **कासिम बेग** व त्याच्या बरोबरचे लोक यांस हुजूर येण्याविषयीं हुकूम केला.

ते येतांक्षणीच **अल्लाउद्दीन शाहानें** त्यांस बोलावून समक्ष भे-ट घेतली, आणि या सर्व कारस्थानाची खरी हकीकत समजतांच आ-पल्या विश्वासघातकी प्रधानाच्या वर्तनाचा त्यास राग आला; व आ-पण निमूटपणें त्यांवर विश्वास ठेवून हें घातक कृ-त्य होऊं दिलें, त्याचाही त्यास फार पश्चात्ताप झाला. नंतर ज्या **युस्तपारखानानें** सय्यदांचीं पत्रें शाहास वा-चूं दिलीं नाहींत, त्याचें डोकें त्याच स्थळीं उडविण्या-चा हुकूम दिला, व त्याचें धड सर्व मोठ्या रस्त्यांतून फि-रविलें. **कासिमबेग** यास दौलताबाद आणि जुन्नर या दोहों सुभ्यांच्या सुभेदारीवर नेमिलें, आणि **मलिक उत् तुजाराचे** सर्व किताब व अधिका-र त्यास दिले. कासिमबेगाबरोबरच्या सर्व लोकांस सरदाऱ्या देऊन त्यां-च्या हाताखालीं नवीन मोंगल लोक ठेवण्यास हुकूम दिला. **निजाम उ-ल् मुल्क** व **शीर उलमुल्क** यांचीं घरेंदारें व चीजवस्त जप्त करून त्यांस व दुसऱ्या गुन्हेगारांस बेड्या घालून पायीं चालत राजधानीस आ-णावें असा हुकूम केला. ज्यांनीं अगदीं खोटे आरोप आणिले होते, त्यांचे प्राण अनेक रीतीनें घेतले, आणि त्यांच्या मुलांस अन्नास सुद्धां

हसनखान शाहास भेटून खरी हकीकत सांगतो. व शाहा पस्तावतो.

महाग केलें. त्याच सालीं **शीरउल् मुल्क** आणि **निजामउल् मुल्क** यांस महारोग झाला, आणि त्यांचीं मुलें रस्त्यांतून दारोदार भिकाऱ्यां प्रमाणें भिक्षा मागत फिरूं लागलीं.

याच वर्षी (इसवीसन १४५२) शाहाचा गुरु शेख **अझरीन** यानें एक **खोरासान** येथून उपदेशपर लांब पत्र शाहास लिहिलें. लहानपणीं या गुरूविषयीं शाहाची पूज्यबुद्धि होती. हें पत्र पाहून शाहाच्या मनास फार खेद झाला, आणि त्यानें इतःपर दारू प्यावयाची नाहीं, अशी शपथ वाहिली. आणि त्याचें उत्तर स्वतः लिहून रवाना केलें, व त्याबरोबर मौल्यवान् नजराही रवाना केल्या. शाहानें आतां **अहंमदशाहा**ची शिस्त व कायदे कानू अंमलांत आणिले. राज्यकारभाराचीं कामें नियमानें पाहूं लागला, व सर्व महत्वाच्या कामावरून दक्षणी लोकांस दूर केलें.

हिजरी सन ८५९ या सालीं शाहाच्या पायांवर एक भयंकर पुळी उठली, व वैद्यांनीं कितीही उपाय केले तरी गूण येईना. यामुळें त्यास खानगी महालांतून बाहेर जातां येईना. यामुळें शाहा मरण पावला, अशी खोटी बातमी अनेक वेळां मुलखांत पसरली. शाहाचा जांवई **जलालखान** याची शाहाच्या मृत्यूविषयीं कोणी खात्री केल्यावरून आपल्या नवलगुंदच्या सुभ्याच्या सभोंवारचे कांहीं प्रांत बळकावून, आपला पुत्र व अल्लाउद्दिनशाहाच्या आतेचा मुलगा आणि माजी अहंमदशाहाचा नातू शिकंदरखान यांच्या स्वाधीन केला. तेलंगणचा सुभेदार **खान अझीन** हाही यासमयास मरण पावला, आणि त्याच्या जागीं नेमण्याजोगा वजनदार सरदार तेलंगणांत नसल्यामुळें त्या प्रांतातील कामगारांनीं **शिकंदरखान** यासच सुभेदार केलें.

*शाहाच्या मरणाची कंडी उठते. इ. स. १४५५ हिजरी सन ८५९.*

*तेलंगण व वऱ्हाड येथें बंडें होतात.*

शाहाची प्रकृति नादुरुस्त होती, तरी या बंडखोरांच्या पारिपत्याकरितां कुच करण्याची त्यानें तयारी केली. तेव्हां **जलालखान** आणि **शिकंदर खान** या दोघांनीं मिलाफ करून पहिला तेलंगणांत राहिला, आणि शाहाच्या फौजेस वाटेंत उपद्रव देण्याकरितां दुसरा माहुरास गेला. बंडवाले हत्यारें ठेवून शरण येतील तर माफी मिळेल, असें शाहानें त्यांस सांगून पाठविलें. परंतु **शिकंदरखान** हा पूर्वी शाहाजादा **महं-**

**मदरखान** याच्या बंडांत सामील झाला होता, व यानें दुसरे कित्येक गुन्हे केले होते. म्हणून शाहाच्या वचनावर त्याच्यानें विश्वास ठेवितां येईना. म्हणून त्यानें माळव्याचा सुलतान **महंमद कुली** यास असें लिहून पाठविलें कीं, **अल्लाउद्दीनशाहा** मरून बरेच दिवस झाले, तथापि तो अद्याप जिवंत आहे, असें उठवून त्याच्या प्रधानांनीं असा बेत केला आहे कीं, मुख्य सरदार व बडे लोक यांचा नाश करून सर्व राज्य आपणांमध्यें वांटून घ्यावें. म्हणून जर आपण यावेळीं तिकडे स्वारी कराल तर वऱ्हाड आणि तेलंगण हे प्रांत कांहीं खटपट न करितां आपल्या हातीं लागतील. सुलतान **महंमद** हा मोठा महत्वाकांक्षी होता; व त्याच्या महत्वाकांक्षेस अनुकूल अशा या बातमीवर विश्वास ठेवून खानदेशच्या सुलतानासहवर्तमान त्यानें दक्षणेंत कूच केलें. **शिकंदरखान** १,००० स्वारांनिशी पुढें जाऊन त्यास मिळाला.

माळव्याचा सुलतान दक्षणेवर स्वारी करितो. इ.स.१४५५.

अल्लाउद्दीनशाहास ही बातमी समजतांच तेलंगणांत स्वतः जाण्याचा बेत बदलून त्यानें पुष्कळ सैन्य देऊन जनानखानावर हल्ला करण्यास **खाजेखान महंमद गवान** यास पाठविलें. तसेंच वऱ्हाडचा सुभेदार **खानजहान** यासही खानदेशचा सुलतान कोणत्या मार्गानें येतो, वगैरेवर लक्ष ठेवण्यास हुकूम पाठविला; आणि दौलताबादचा सुभेदार **कासिमबेग**+ यासही माळव्याचा सुलतान ज्या मार्गानें फौज घेऊन येत होता तिकडे प्रतिबंध करण्यास पाठविलें; आणि शाहा स्वतः विजापूर सुभ्यांतील फौज घेऊन १० मैलांच्या अंतरानें त्या मागून निघाला.

दक्षणचा शाहा अद्याप जिवंत असून आपणावर चालून येत आहे, अशी जेव्हां माळव्याचा सुलतान **महंमद** याची खात्री झाली; तेव्हां तो आपली बरीच फौज घेऊन माघारा गेला, आणि शिकंदरखानास सहाय्य करण्यास म्हणून एका कामगारास मागें ठेविलें. परंतु त्यास गुप्तपणें असा हुकूम दिला कीं, जर तो दक्षणी लोकांस जाऊन मिळूं लागला, तर त्यास कैद करून मांडूस आणावें. **शिकंदरखानास** या

माळव्याचा सुलतान परत जातो, व शिकंदरखान स्वाधीन होतो.

+ चाकण येथें परदेशीयांची जी कत्तल झाली, त्यांतून हा वांचला होता.

गुप्त बेताची खबर लागतांच तो २,००० अफगाण व रजपूत लोकांस घेऊन माळव्याच्या फौजेंतून पळून नवलगुंदास गेला. **ख्वाजेखान महंमद गवान** या किल्यास नुक्ता वेढा घालणार होता, परंतु माफी मिळण्याच्या शर्तीवर किल्ला त्यानें गवानाच्या हवालीं केला. गवानाबरोबर **शिकंदरखान** हुजूर जातांच त्यावर शाहाची पुनः कृपा झाली, व त्यास पुनः नवलगुंदावर नेमिलें. **फकीर उल्मुल्क तुर्क** यास माहूर मातांच्या सुभेदारीवर आणि **फरूख उल् मुल्क** यास माहूरच्या सैन्यावर नेमून शाहा राजधानीस परत आला. येथें हिजरी सन ८६२ साली त्याच्या पायांतील व्रण फार चिघळून तो मरण पावला. त्यानें २३ वर्षें ९ महिने २० दिवस राज्य केलें.

शाहाचा मृत्यु. हिजरी सन ८६२ इ. स. १४५७.

**अल्लाउद्दीनशाहा** मोठा वक्ता, मोठा नकल्या व धूर्त असून विद्येची त्यास फार आवड होती. तो कधीं कधीं मशिदीच्या व्यासपीठावर चढून शुक्रवारीं व सणावारीं स्वतः खुतबा वाची. त्यावेळीं तो आपले पुढील किताब उच्चारीत असे.

त्याचा स्वभाव.

"परमेश्वराच्या सेवेसाठीं न्यायानें, दयाळूपणानें, सहनशीलतेनें व उदारपणानें वागणारा, ऐहिक व पारमार्थिक कृत्यांत मुख्य, सर्व बादशाहांमध्यें मोठा प्रसिद्ध असा जो अहंमदशाहा अल्ली बाहामिनी त्याचा पुत्र मी."

एके दिवशीं एक अरबस्थानचा व्यापारी खुतब्याच्या वेळीं हजर होता. त्यानें शाहास कांहीं घोडे विकले होते, व त्याच्या किंमतीचा पैसा देण्यास खानगीकडील कामगारांनीं विलंब लाविला होता. त्यानें हे वरील किताब ऐकतांच त्यास फार राग आला. शाहाच्या कामगारांनीं खुद्द त्याच्याशीं दुवर्तन केलें होतें, व नुक्तीच निरपराधी सय्यदांची कत्तल झाली होती. या दोहों गोष्टींबद्दल फार त्वेष येऊन, तो मशिदींत मोठ्यानें म्हणाला कीं, "आपण न्यायी, दयाळू, उदार व सहनशील पादशाहा नसून क्रूर व घातकी आहां. पैगंबराच्या वंश

+ ज्यांनीं जिवाची आशा सोडिली आहे, ते आपणास मृत्यू लौकर यावा, म्हणून किंवा आपण जो जुलूम सहन करण्यास खुषी नसतों, त्याचा शेव (पुढें चालू.)

जांची कत्तल केल्यावर त्याच्या मशिदींत येऊन असे बढाईचे किताब धारण करण्यास छाती तरी कशी होते?" शाहास हें ऐकून फार पश्चात्ताप झाला, व त्या व्यापाऱ्याचा पैसा त्यानें त्याच ठिकाणीं देवविला. आणि म्हणाला ज्यांनीं आपल्या कीर्तीस या प्रमाणें कलंक लावून घेतला आहे, त्यांवर ईश्वराचा कोप झाल्याशिवाय राहणार नाहीं. यावेळीं तो आपल्या महालांत गेला, व पुनः मशिदीची पायरी चढला नाहीं. मात्र तो मरण पावल्यावर त्याचें प्रेत दफन करण्याकरितां मशीदींत आणिलें. शाहा मरावयास टेंकला तेव्हां त्यानें दरबारच्या सर्व सरदारांच्या इच्छेविरुद्ध हुमायुनानें आपल्या मागून गादीवर बसावें असें ठरविलें. हुमायून मोठा क्रूर व घातक स्वभावाचा होता, म्हणून सर्वांस त्याची भीति वाटत होती. कित्येक सरदार शाहा मरण्याच्या पूर्वींच गुजराथेंत पळून गेले, आणि त्यांनीं हुमायुनाच्या जुलमी व क्रूर वर्तनापासून आपला बचाव करून घेतला.

---

ट करण्याकरितां ते पुरुष उघडपणें जुलमी राजांस कधीं कधीं मोठ्या धैर्यानें टाकून बोलतात, व त्यांची निंदा करितात, त्याचें हें एक उदाहरण आहे.

# हुमायूनशाहा झालिम[+] बाहामिनी.

इ॰ स॰ १४५७ ते १४६१प.

माजी शाहाचा कनिष्ठपुत्र शाहाजादा हसन यास प्रधान गादीवर बसवितात, व हुमायुन स कैद करण्यास यत्न करितात.—— हा बेत फसतो.—— हसनास पदच्युत करून हुमायून तक्तावर बसतो.—— शाहाजादा हसन याचे डोळे फोडून त्यास अंध करितात.—— ख्वाजेखान महंमद गवान यास पेशवाईचीं वस्त्रें मिळतात.—— दुसरे फेरफार ——नवलगुंदचा सुभेदार शिकंदरखान बंड करितो.—— तो लढाईंत पडतो.—— देवरकोंड्याच्या किल्यावर हल्ला.—— हिंदूलोकांस कुमक मिळते.—— शाहाच्या फौजेचा पराभव होतो.—— शाहा फौजेवरील सेनापतीस देहांत शिक्षा करितो, व त्याच्या हाताखालच्या सरदारांचा दर्जा कमी करितो.—— देवरकोंडा घेण्यासाठीं पुनः यत्न होतो.—— शाहाचा भाऊ पळून गेल्याचें वर्तमान आल्यामुळें तें काम तसेंच राहतें.—— शाहाचा भाऊ बंड करितो.——त्यास विजापूर येथें पकडतात.—— शाहाचें त्याशीं व त्यास मिळाफी असणारांशीं क्रूर वर्तन. प्रजेवर शाहाचा जुलूम व क्रूरपणा.—— त्याचा आजार व मृत्यु.

---

*माजी शाहाचा कनिष्ठपुत्र शाहाजादा हसन यास गादीवर बसवितात.*

**अल्लाउद्दिनशाहा** मरणोन्मुख झाला तेव्हां शाहाजादा **हुमायून** हा आपल्या माहालांत होता. **सैफखान** आणि **मल्लुखान** या दोघां बड्या सरदारांनीं शाहा मेल्याची बातमी बाहेर न फोडतां गुसपणें **हसनखानास** तक्तावर बसविलें. या मसलतीस त्यांस **हबीबउल्लां**[*] हा पंडित व दुसरे कांहीं सरदारही मिळाले. कारण हें एक अकल्पित वरदानच झालें असें त्यांस वाटलें. या बंडवाल्यांची एक टोळी हुमायुनाचा महाल लुटण्यास व त्यास कैद करण्यास निघाली. **हुमायुनानें** मोठ्या दृढनिश्चयानें त्यांस मागें हटविलें, आणि त्यांचा पाठलाग करीत तक्ताच्या दिवाणखान्याकडे निघाला. मार्गीत

---

+ क्रूर.

* ख्वोरासान येथें शाहा नीमतउल्लाकडे ज्या सय्यदांस पूर्वी पाठविलें होतें, त्यांपैकीं हा होता. दरबारच्या कारस्थानांत विद्वान व धार्मिक मुसलमान अनेक वेळां शिरत असें दिसतें.

त्यास म्हात, पडदेदार, शिलेदार, रक्षक व दुसरे खानगीकडील लोक येऊन मिळाले. कारण हुमायुनाच्या नाशाकरितां पूर्वी ठरलेल्या बेताची यांस वार्ताही नव्हती. **हुमायून** यांसहवर्तमान तक्ताच्या दिवाणखान्यांत शिरला, व त्यानें आपल्या भावास कैद केलें. तो बिचारा लोकांच्या आग्रहास्तव तक्तावर कांपत कांपत बसला होता. त्याच्या जागीं हुमायून लागलाच तक्तावर बसला, आणि कोणीही हरकत न करितां सर्वांनी त्याचा हक्क कबूल करून मुजरे केले. या प्रमाणें ताबडतोब उपाय योजून या सर्व कारस्थानाचा मूळ उत्पादक जो **सैफखान** यास हत्तीच्या पायीं बांधून रस्तोरस्तीं फिरविलें, व या प्रमाणें त्यास ठार मारिलें. **हबीब उल्ला** यास कैदेंत टाकिलें, आणि शाहाजादा **हसन** यास अंध केलें*

हसनखानास कैद करून हुमायून तक्तावर बसतो.

हसनखानास अंध करितात.

आपल्या वडिलांच्या इच्छेनुरूप **ख्वाजेखान महंमद गवान** यास **वकील उस् सलतनद**चें काम सांगितलें, व **मलिक् उत् तुजार** हा किताब देऊन विजापुरची सुभेदारी दिली. **मलिकशाहा** आपण **झेंगिजखाना**चा वंशज आहें, असें प्रतिपादन करी. यास तेलंगणच्या सुभेदारीवर नेमून **ख्वाजा जहान** हा किताब दिला, आणि १,००० स्वारांची सरदारी दिली. **इमाद उल् मुल्क** या नवीनच प्रसिद्धीस आलेल्या सरदारास **निजाम उल् मुल्क** हा किताब दिला. शाहा तक्तावर बसण्यापूर्वी त्याच्या अगदीं प्रीतींतला स्नेही **जलालखान** याचा पुत्र **शिकंदरखान** यास तेलंगणची सुभेदारी मिळेल, अशी आशा होती. ती निर्फळ झाल्यामुळें शाहाचा निरोप* सुद्धां न घेतां तो दरबारांतून गेला; आणि नवल-

ख्वाजेखान महंमद गवान यास पेशवाईचीं वस्त्रें मिळतात.

---

+ जनानखान्यावरील व ख्वाबगाहावरील (निजण्याचा महाल) कामगार.

* सैफखानास ठार मारिलें, शाहाजाद्याचे डोळे काढिले, आणि **हबीब उल्ला** हा सय्यद होता, म्हणून त्यास फक्त कैदेंत टाकिलें.

* हिंदुस्थानांतील दरबारचा असा रिवाज आहे कीं, जरी एक दिवस बाहेर जावयाचें असलें, तरी त्या पूर्वी सरकारची भेट घेऊन सर्व कामगारांनीं रजा किंवा निरोप घेतला पाहिजे, आणि कोणी निरोप घेतला नाहीं म्हणजे तो बंड (पुढें चालू.)

गुंदास आपल्या बापाकडे जाऊन फौज ठेवूं लागला.

**हुमायूनशाहा** तक्तावर बसल्यामुळें आपला आनंद प्रदर्शित करण्याकरितां वऱ्हाडचा सुभेदार **खानजहान** हुजूर आला होता. त्यास शाहानें एकदम **शिकंदरखानावर** पाठविलें, परंतु **खानजहाना**चा पराभव झाला, तेव्हां बंडखोरांवर स्वतः जावें असा शाहानें विचार केला. नवलगुंदाच्या समीप पोहोंचल्यावर **जलालखान** व **शिकंदरखान** यांचे डोळे उघडतील व ते शरण येतील असें वाटलें होतें, परंतु त्यांत त्याची निराशा झाली. कारण **शिकंदरखानानें** शाहाच्या छावणीवर रात्रीं एकाएकीं हल्ला केला, व त्यांत त्यास यश आलें. तेणेकरून त्या किल्यास वेढा देणें शाहास भाग पडलें. आपल्या लोकांच्या शौर्यावर व एकनिष्ठेवर अवलंबून **शिकंदरखान** ८,००० दक्षणी व रजपूत घेऊन लढाईस बाहेर आला. परंतु पूर्वीचा निकट स्नेहसंबंध मनांत आणून शाहानें त्यास असा निरोप पाठविला कीं, पादशाहावर शस्त्र धरणें हा जरी महत् अपराध आहे, तथापि माझी इच्छा तुझा नाश करण्याची नाहीं. म्हणून तुला अगदीं माफी करून दौलताबाद परगण्यांत चरितार्थाकरितां जमीन देईन. तेव्हां शिकंदरखानानें उत्तर पाठविलें कीं, जसे तुम्हीं (हुमायून) **अहंमद**शाहाचे नातू आहां, त्याच प्रमाणें मी त्यांच्या मुलीचा मुलगा असून नातूच आहें. म्हणून आम्हा उभयतांच्या आज्याच्या राज्यांत मी एक भागीदार आहें. म्हणून अपण तेलंगण प्रांतावरील सर्व अधिकार माझ्या स्वाधीन करावा, किंवा लढाईची तयारी करावी.

हें उद्धट उत्तर ऐकून **हुमायूनशाहा** कंपायमान झाला, आणि त्यानें आपल्या फौजेस हल्ला करण्यास एकदम हुकूम दिला. **शिकंदरखान**ही मागें सरला नाहीं, आणि शाहाच्या फौजेनें खूब निकरानें केलेले हल्ले अनेक वेळां त्यानें मागें हटविले. लढाई पुष्कळ वेळ चालली, तरी

---

करण्यास प्रवृत्त झाला, असें समजतात.

+ राजघराण्याचे प्रजेशीं शरीरसंबंध झाले म्हणजे जी अडचण येते, त्याचें हें एक स्पष्ट उदाहरण आहे. या ठिकाणीं शिकंदरखानाचें मागणें खचित फार फाजीलपणाचें व धाडसाचें होतें.

अमक्यासच जय आला, असें म्हणतां येईना. शेवटीं **मलिक उत् तुजार महंमद गवान** यानें विजापुरच्या सैन्यानिशीं आणि **ख्वाजा जहानानें** तेलंगणच्या फौजेनिशीं जेव्हां एकदांच शत्रूच्या अनुक्रमें उजव्या वडाव्या फळीवर हल्ले केले, तेव्हां मात्र बंडवाले कचरले. या प्रमाणें त्यांच्या मध्यें धांदल झालेली पाहतांच शाहानें सैन्याच्या मध्यभागांतून ५०० तिरंदाज व ५०० भालेवाले घेऊन शत्रूंवर हत्तीवर बसून एकदम हल्ला केला, तेव्हांही शत्रूनीं अशा दृढ निश्चयानें त्यांस मागें हटविलें कीं, शाहाचे लोक धांदलीनें त्यास सोडून मागें हटले. ही संधी साधून शिकंदरखानानें खुद्द शाहावर भाला घेऊन हल्ला केला. इतक्यांत हुमायूनशाहा ज्या हत्तीवर बसला होता, त्या हत्तीनें **शिकंदरखानास** सोंडेंत धरून घोड्यावरून ओढिलें, व जोरानें जमिनीवर आदळलें. त्याच्या सहाय्याकरितां जे त्याचे लोक मागून दौड पळत येत होते, त्यास आपले घोडे आवरतां न आल्यामुळें **शिकंदरखान** चिरडून मरून गेला. या प्रमाणें आपला मुख्य मरण पावतांच बंडखोर पळाले, व शाहानें आपल्या फौजेची थावराथावर करून रणांगणापासून पुष्कळ अंतरापर्यंत तो त्यांच्या मागें लागला, व त्यांची खूब कत्तल केली.

निकराची लढाई होऊन शिकंदरखान मारला जातो.

दुसऱ्या दिवशीं शाहानें **नवलगुंदास** वेढा घातला. सुमारें ८ दिवस वेढा पडल्यावर शरण जाण्याशिवाय मार्ग उरला नाहीं, असें पाहून **जलालखान** शरण आला. नंतर **मलिक उत् तुजार** व **ख्वाजा जहान** यांच्या मध्यस्थीनें शाहानें त्यास माफी केली. तेव्हां मोठ्या अमलदारीचें व फायदेकारक काम करून ४० वर्षेपर्यंत सांठविलेलें सर्व द्रव्य शाहाच्या चरणीं अर्पण करून त्यानें शाहाच्या पायांवर डोकी ठेविली. शाहानें त्यास जिवदान दिलें, परंतु एका किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. तेथें तो पुढें मरण पावला.

नवलगुंद घेतल्यावर **देवरकोंडा** किल्ला सर करण्याचा हुमायूनशाहानें विचार मनांत आणिला. हा किल्ला तेलंगणच्या एका जमीदाराच्या ताब्यांत होता, व त्यानें **शिकंदरखानास** कुमक केली होती. हें काम बजावण्यास त्यानें **ख्वाजा जहान** व **निजाम उल्मुल्क** यांस पाठविलें, आणि स्वतः **वरंगुळास** गेला. साऱ्या तेलंगी लोकांनीं मैदानांत येऊन अनेक लढाया केल्या, परंतु त्या सर्वांमध्यें **ख्वाजा ज-**

देवरकोंडा किल्यावर हल्ला.

हान यानें त्यांचा पराभव केला. शेवटीं ते किल्यांत पळून गेले. तेव्हां तो किल्ला जरी उंच पहाडामध्यें व गडद झाडींत होता, तरी त्यास सर्व बाजूंनीं ख्वाजाजहान यानें कडेकोट वेढा दिला. तेव्हां तेलंगी लोकांनीं ओंडिसा प्रांताच्या राजाकडे कुमक मागितली. यांनीं जें पुष्कळ द्रव्य देऊं केलें, त्यास भुलून तेलंगी लोकांच्या कुमकेस कित्येक लढाऊ हत्तींसह बरीच मोठी फौज त्यानें पाठविली, व लौकरच मागून आपली सर्व फौज घेऊन आपण स्वतः येतों असें कळविलें. तेणेंकरून तेलंगी लोकांस दम आला, आणि ते किल्यांत तसेच नेटानें राहिले. ओडिसा प्रांतांतून येणारी कुमक नजीक आली असें ऐकतांच पुढें काय युक्ति योजावी, याच्या विचारांत दोघे दक्षणी सरदार पडले. निजामउल् मुल्कानें अशी सल्ला दिली कीं, वेढा उठवून पाहाडांतून व घांटांतून बाहेर जावें, आणि मैदानांत कुमकेस आलेल्या फौजेशीं लढाई करून किल्यांतील फौजेस जाऊन मिळण्यास या सहाय्यकारी फौजेस प्रतिबंध करावा. ही युक्ति ख्वाजा जहानास पसंत पडेना, तो म्हणाला आम्हीं मागें हटलों म्हणजे भ्यालों; असें समजून कूच करीत असतां आम्हांवर हल्ला करितील. म्हणून वेढा तसाच ठेवून साहाय्यकारी फौजेचा किल्यांतील फौजेशीं संयोग न होऊं देण्यासाठीं येथेंच राहून तयारी करावी. दुसऱ्या दिवशीं ओडिसाची फौज येऊन पोहोंचली. तेव्हां त्या फौजेनें बाहेरून व आंतील फौजेनें किल्यांतून एकदम शाहाच्या फौजेवर हल्ला केला. पहाडामुळें घोडेस्वारांचा इलाज चालेना, आणि मुसलमानांचा अगदीं पराभव झाला. दोघे सरदार रणांतून मोठ्या कष्टानें जीव घेऊन पळाले. त्यांचा पाठलाग शत्रूनीं ८० मैल पर्यंत केला. तेव्हां शेवटीं ते बरंगुळास जाऊन सुखरूप पोहोंचले. असा पराभव होण्याचें कारण काय? अशी चौकशी हुमायूनशाहानें केली, तेव्हां ख्वाजाजहान यानें आपला जीव वाचविण्याकरितां असा खोटा मजकूर शाहास सांगितला कीं, निजाम उल्मुल्क याच्या सल्यानें मी वागलों, म्हणून हा अनर्थ झाला. परंतु वास्तवीक निजाम उल् मुल्कास याचें करणें नापसंत असून यानें उलट दुसरा सल्ला दिला होता. जास्त तपास न करितां रागाच्या भरांत शाहानें त्या सरदारा-

हिंदु लोकांस कुमक मिळते. व शाहाच्या फौजेचा पराभव होतो.

शाह सेनापतीस मारितो, व दुसऱ्या सरदारास कैदेंत टाकितो.

स ठार मारविलें. तेव्हां त्याचे आससोयरे सर्व पळून गेले; व माळव्याचा सुल्तान **महंमद** याच्या पदरीं नोकरीस राहिले. **ख्वाजा जहान** याचीही अप्रतिष्ठा करून त्यास एका किल्ल्यांत कैदेंत टाकिलें.

आपल्या फौजेस जो हा कालिमा लागला, तो काढून टाकण्याचा निश्चय करून **हुमायूनशाहा देवरकोंड्यावर** नवी फौज घेऊन जाण्याची तयारी करूं लागला. इतक्यांत त्यास राजधानीहून अशी बातमी आली कीं, **कोणी युसफ तुर्क** यानें शाहाजादा **हसनखान** आणि शाहा **हबीब उल्ला** यांस कैदेंतून मुक्त करून त्यांसहवर्तमान खानदेशांत पळून गेला. हें ऐकतांच शाहाचा धर सुटला, आणि तेलंगणच्या रक्षणार्थ **महंमद गवान** या आपल्या प्रधानास ठेवून मोठे मुक्काम करीत हिजरीसन ८६४ सालीं शाहा राजधानीस परत आला. तेथें आल्यावर त्याचा राग अनावर झाला. परंतु त्यावेळीं जीं त्यानें क्रूर कृत्यें केलीं तीं लिहिण्यापूर्वीं त्याचें प्रथम मूळ कारण येथें सांगणें जरूर आहे.

हबीबउल्ला व हसनखान यांस कैदेंतून मुक्त केल्याची बातमी शाहास लागते, व तो राजधानीस परत येतो. इ.स. १४५९.

शाहा **हबीब उल्ला** या मोठ्या मौलवीचें शाहाजादा **हसनखान** यावर प्रेम असल्यामुळें त्यास कैदेंत टाकिलें होतें. नवलगुंदाकडे **शिकंदरखानावर** शाहा निघाला तेव्हां हबीबउल्लाच्या ७ शागिर्दांनीं जिवावर उदार होऊन त्यास मुक्त करण्याचा निश्चय केला होता. याकृत्याकरितां माजी **अल्लाउद्दिनशाहा**चा + तुर्की गुलाम **युसफ** यास त्यांनीं वश केलें. **युसफ** याची लोकांत साधारणपणें बरीच मान्यता होती. व त्याचे सद्गुण, प्रामाणिक-

---

+ शाहाच्या रक्षक सैन्यांत विकत घेतलेले गुलाम असत. त्यांस फार मान देत, व ते मोठ्या अधिकारासही चढत. यारक्षक फौजेंतूनच शाहा आपले हुजरे व आपले निरोप व हुकूम सांगणारे निवडीत असे. पुढें बढती मिळणें किंवा न मिळणें हें केवळ शाहाची मर्जी संपादण्यावर अवलंबून आहे, असें त्यांस मुळापासून शिकवीत. नोच रिवाज हिंदुस्थानांतील दरबारीं नेहमीं आढळतो. रोमच्या बादशाहापाशीं, फ्रान्सच्या बादशाहापाशीं आणि कानस्टांटिनोपलच्या सुलतानापाशीं याप्रमाणेंच रक्षक फौज असे, व सार्वभौम राजेलोकांसही रक्षण करण्याची व अधिकार चालविण्याचीं साधनें किती आवडत असत, याविषयीं इतिहासांत प्रमाणें आढळतात.

पणा व धर्मनिष्ठा, त्याचा मोठा दानधर्म, याबद्दलही लोकांत त्याची फार प्रसिद्धि होती. याशिवाय तो शाहा **हबीब उल्ला**चा दोस्त व पट्टा शागिर्द होता. यानें सहाय्य देण्याचें वचन दिलें, आणि माहालांतील पाहारेवाले व देवडीवाले यांस लांच देऊन वश केलें. या कटांत १२ स्वार व ५० शिपाईच मात्र होते. परंतु या सर्वांनीं शाहा **हबीब उल्ला** याच्या सेवेकरितां आपले जीव बळी देण्याचा निश्चय केला होता. हा आपला बेत अमलांत आणण्याजोगा पक्का झाला. असा विचार करून एके दिवशीं संध्याकाळीं आपल्या मित्रांसहवर्तमान तो जनानखान्याच्या दरवाज्यापाशीं गेला. तेव्हां बहुतेक पाहारेकरी पाहऱ्यावर नव्हते; आणि जे कोणी होते, त्यांपैकीं थोड्यांनींच यांस कोठें जातां म्हणून विचारिलें. तेव्हां **युसफा**नें असें उत्तर दिलें कीं, 'मला शाहाकडून असा हुकूम आला आहे कीं, 'अमुक अमुक कैद्यांस अंध करावें.' या जबाबाच्या खरेपणाकरितां त्यानें एक बनावट हुकूम दाखविला. तो पाहतांच पाहरेवाल्यांनीं त्यांस आंत जाऊं दिलें. तेथून आंतील दुसऱ्या दरवाज्यावर पोंहोंचतांच तेथील दुसरे पाहरेकरी त्यास आंत सोडीनात. ते म्हणालेजरी तुम्हीं आम्हांस हुजूरचा हुकूम दाखविला, तथापि आंत सोडण्यास आम्हांस कोतवालाचा हुकूम पाहिजे. आपला बेत आतां कदाचित् उघाडकीस येईल, या भीतीस्तव **युसफ** व त्याच्या बरोबरीचे लोक पाहरेकऱ्यांच्या आंगावर घुसले, आणि त्यांस ठार करून पुढें गेले. युसफ प्रथमतः बड्या कैद्यांच्या खोलींत गेला आणि शाहा **हबीब उल्ला** याची बिडी त्यानें तोडिली. तेव्हां माजी शाहाचे पुत्र शाहाजादा **हसन** आणि **येह्यारखान** यांनीं व त्याच प्रमाणें **जलालखान बोखारी** यांनींही आपल्या बिड्या तोडून बराबर नेण्यास विनंति केली. त्याप्रमाणें त्यांच्याही बिड्या तोडल्या. या नंतर प्रत्येक कोठडींत जाऊन ज्यांची कैदेंतून मुक्त होण्याची इच्छा असेल त्यांनीं महालाच्या दरवाजाजवळ येऊन मिळावें, असें सर्वांस सांगितलें. तेव्हां सुमारें ७००० दुर्दैवी कैदी आपल्या पाहरेकऱ्यांवर उठले. आणि सोटे किंवा जें दुसरें कांहीं हा-

तास सांपडलें तें घेऊन पूर्वीं सांगितल्याप्रमाणें दरवाजावर येऊन उभे राहिले. इतक्यांत शहरच्या कोतवालास ही खबर लागून तो शहरांतील रक्षक शिपाई घेऊन बंदोबस्ताकरितां आला. परंतु कैद्यांनीं जिवावर उदार होऊन दगडांचा व सोट्यांचा असा वर्षाव केला कीं, ते मागें हटले. रात्रभर कैदी आपल्या स्नेह्यांच्या घरीं गेले. परंतु **जलालखान** आणि शाहाजादा **येह्याखान** हे मात्र कोतवालाच्या हातीं सांपडले, व माणास मुकले. शाहाजादा **हसनखान** आणि शाहा **हबीबउल्ला** यांनीं एका न्हाव्याच्या घरीं आश्रय घेतला व तेथें त्यांनीं आपली दाढी काढून फकीराचा वेष धारण केला. येथून पळून जावें असें शाहा **हबीबउल्लानें** शाहाजाद्यास सांगितलें. परंतु शाहाजाद्यास अशी घमेंडी वाटली कीं, सर्व लोक आपल्या भावाच्या क्रूर वर्तनास कंटाळले आहेत व त्यांची प्रीति आपल्यावर आहे. म्हणून आपणास लौकरच फौज जमवून तक्तावर बसतां येईल. शाहा **हबीब उल्लानें** त्याचे बेत नडीस नेण्यास सहाय्य करण्याचें कबूल केलें, व त्या दोघांनींही बेदर सोडलें, व शहरापासून कांहीं अंतरावर गेले.

शाहाजादा हसनखान बंड करितो.

शाहाजादा **हसनखान** यानें आपण कोण हें सर्वांत प्रसिद्ध केलें; तेव्हां चोहोंकडून शाहाशीं नाखुष झालेले लोक येऊन त्यास मिळाले. त्यांतच **युसफ तुर्क**ही होता. थोडे दिवस गेले नाहींत तोंच ३,००० स्वार आणि ५,००० पायदळ इतकी फौज शाहाजाद्याजवळ जमली. ही फौज घेऊन राजधानीपासून ६ मैलांवर **कंतन** येथील तटबंदी असलेला महाल ताब्यांत घेण्याकरितां शाहाजादा निघाला. हें काम पूर्वीं वाटलें होतें, त्याहून जास्त दुर्घट आहे, असें पाहतांच तो मागें हटून **बीड**+ शहरास गेला, आणि तें शहर व त्या सभोंवतालचा प्रदेश ताब्यांत घेऊन त्यानें आणखी नवी फौज ठेवण्याचें काम पुढें चालविलें. जेव्हां शाहा फौज घेऊन अमदाबाद बेदर येथें परत आला तेव्हां तेथील अहवाल अशी होती.

शाहानें प्रथमतः शहरच्या रक्षक लोकांस त्यांच्या हयगयीक-

+ शाहा नीमतउल्लाच्या वंशजांकडे यावेळीं बीड शहर होतें, व त्यांचें लक्ष स्वाभाविकच शाहा हबीब उल्लाकडे होतें.

रितां शासन केलें. ते सुमारें २,००० होते. त्या सर्वांस फार हाल हाल करून ठार मारिलें. त्यानें कोतवालासही लोखंडी पिंजऱ्यांत घालून दररोज त्या-

शहरच्या रक्षकलोकांशीं त्याचें क्रूर वर्तन.

चा एकेक अवयव कापून तो त्याजकडून खाववी. येणेंकरून तो लौकरच मरण पावला. इतक्यांत त्यानें शाहाजाद्यावर ८,००० स्वार व पायदळ अशी फौज पाठविली. आरंभीं शाहाजाद्यानें त्यांस मागें हटविलें. हें ऐकतांच शाहाचा कोप अनावर झाला. त्यानें आणखीं फौज कुमकेस पाठविली. आणि सैन्यांतील कामगारांच्या मुलाबाळांस कैद करून ओलीस ठेविलें, आणि अशी भीति घातली कीं, जर सैन्याचा पराभव झाला, किंवा कोणी कामगार शाहाजादा **हसनखान** यास मिळाला तर बायका मुलांस ठार मारीन.

दुसऱ्याच लढाईंत शाहाजाद्याचा पराभव झाला. त्यानें लढण्याची पराकाष्ठा करून नंतर आपल्या लोकांसहवर्तमान तो रणांतून पळाला, आणि विजयानगराकडे आश्रय घेण्यास गेला. विजापूरच्या किल्यानजीक सुमारें ८०० स्वारांनिशी येऊन पोहोंचला. तेव्हां तेथचा सुभेदार **शिराजखान जुनेडी** यानें त्यास असा निरोप पाठविला कीं,

विजापूरचा सरदार शाहाजाद्यास कपटानें पकडतो.

तुम्हीं किल्यांत याल तर किल्ला व त्याखालील मुलूख तुमच्या ताब्यांत देईन. शाहा **हबीबउल्ला** आणि **युसफ तुर्क** यांच्या सल्ल्यानें तो विजापूरच्या किल्यांत शिरला. हा किल्ला तेव्हां फक्त मातीचा बांधलेला होता. शिराजखानानें बाह्यात्कारी त्याचा मोठा सत्कार करून त्याची वागपूस केली. शाहाजाद्यास मुजरा करण्याच्या निमित्यानें त्याच्या खोलीजवळ आला, आणि खोलीसभोंवार त्यानें पहारा ठेविला. दुसऱ्या दिवशीं त्यानें आपल्या पाहुण्यास कैद करण्याचा यत्न केला. शाहा **हबीबउल्ला** त्याच्याशीं लढून त्यानें आपला जीव सार्थकीं लाविला. परंतु शाहाजादा **हसनखान** आणि **युसफ तुर्क** यांस त्याचे शिपाई, बरोबरचे तंबूवाले, अबदार, भंगी यांसुद्धां कैद करून शिराजखानानें बरोबर पुष्कळ लोक घेऊन त्यांस बंदोबस्तानें अमदाबाद बेदरास पोहोंचविलें. आतां **हुमायूनशाहानें** क्रूरपणा करण्याच्या इच्छेची पूर्ण तृप्ति करून घेतली. तो रागानें अगदीं वेडा झाला, आणि राजवाड्या-

पुढील मैदानांत दोहोंबाजूंस सूळ उभे करविले. मस्त हत्तीस व व्याघ्रादि दुष्ट व हिंसक श्वापदांस चौकांत निरनिराळ्या ठिकाणीं सोडिलें. कित्येक ठिकाणीं कढत्या तेलाच्या व कढत्या पाण्याच्या कढया तयार केल्या. नंतर डोळेभर हाल पाहून तृप्त होण्याकरितां शाहा गद्दीवर बसला; आणि प्रथम आपला बंधु **हसनखान** यास एका क्रूर व्याघ्रापुढें टाकिलें. तेव्हां त्या वाघानें त्या हतभागी शाहाजाद्याचे फाडून तुकडे तुकडे केले, व त्याच ठिकाणीं त्यास गिळून टाकिलें. **युसफ तुर्क** व त्याचे सात मिलाफी यांचीं शाहाच्या देखत डोकीं उडविलीं. नंतर त्यांच्या निरपराधी व निराश्रित कुटुंबांतील बायकांस घरांतून ओढून आणिलें, आणि राजमहालांतील चौकांत गांवांतील दांडग्या व सोटी लोकांकडून त्यांची अशी छलना व विटंबना केली कीं; त्यांच्या वर्णनानें लेखणी विटाळवत नाहीं. नंतर शाहानें यातना व हाल करण्याच्या अगदीं नूतन युक्त्या काढिल्या आणि बायका, पुरुष, लहान, मोठे व म्हातारे यांजवर त्यांचा प्रयोग करून त्यांचे असे हालहाल केले कीं; इराणचा **जोहांक**+ राजा व आरबस्थानांतील क्रूर **हिजाज*** यांस कल्पनाही मनांत आणतां आली नसती. या प्रमाणें सुमारें ७,००० बायका, पुरुष, व नोकर यांस ठार मारिलें. यांपैकीं एकाचाही या बंडांत अर्थाअर्थीं संबंध नव्हता. कित्येकांच्या उरांत जंब्ये खुपसून, कित्येकांचे कुऱ्हाडीनें तुकडे करून आणि कित्येकांस कढत्या तेलांत किंवा पाण्यांत बुडवून मारिलें. हा शोककारक संहार हिजरी सन ८६४ सालीं साबान महिन्यांत झाला.

हसनखान व त्याचे मिलाफी यांजबरोबर शाहाचा क्रूरपणा. आगस्ट इ. स. १४६०.

एका ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, जेव्हां शाहास शाहाजादा **हसनखान** सुटून पळाल्याची खबर लागली, तेव्हां त्याचा संताप व क्षोभ इतक्या विकोपास पोहोंचला कीं, त्यानें आपल्या आंगातील आंगरखे फाडून टाकिले. लोड व तक्ये चावले, आणि ओंठही असे करकरून

---

+ हा इराणचा प्राचीन राजा होता. या विषयीं असें सांगतात कीं; एका पिशाचास त्यानें आपणास विकून घेतलें. यामुळें त्याच्या खांद्यांतून दोन सर्प निघाले, व ते त्यास उपद्रव देऊं लागले. ते रोज मनुष्याचा मगज खावयास मागत.

* अरबस्थानचा रानटी राजा.

चावले कीं, त्यांतून रक्त वाहिलें. हसनखानाचें साहस पाहून त्यास अशी भीति वाटली कीं, निरनिराळ्या किल्यांवर कैदेंत असलेल्या पुष्कळ निरपराधी पुरुषांसही त्यानें ठार मारविलें. इतकें करूनही त्याचा वहीम गेला नाहीं. दरबारचे पुष्कळ निरपराधी लोक त्याच्या अविचारी क्रूरपणास बळी पडले. यावेळेपासून तर हुमायूनशाहानें ताळच सोडला. आपल्या प्रजेच्या मुलांस त्यांच्या आईबापांपासून ओढून आणून आपल्या इच्छा मनास येईल, त्याप्रमाणें तृप्त कराव्या. रस्त्यांतून लग्नाची व

प्रजेवर शाहाचा क्रूरपणा व जुलूम.

रात जात असली म्हणजे नवरीस धरून आणून तिचा उपभोग करावा, व नंतर तिला नवऱ्याच्या घरीं पाठवावें. आपल्या जनानखान्यांतील स्त्रियांसही क्षुल्लक अपराधाकरितां ठार मारण्याची त्याची वहिवाट होती. कोणा सरदारास त्याच्या भेटीस जाणें भाग पडलें म्हणजे त्यास इतकी भीति वाटे कीं, ते आपल्या कुटुंबांतील माणसांचा शेवटचा निरोप घेऊन मरणाच्या तयारीनेंच त्याजकडे जात.

शेवटीं परमेश्वरास लोकांचे हाल पाहून करुणा आली, आणि त्यानें हतभागी लोकांचें गाऱ्हाणें ऐकिलें. हुमायून शाहा आजारी पडला आणि आतां आपण मरतों असें त्यास वाटलें. तेव्हां आपला आठ वर्षांचा मुलगा निजाम शाहा यानें आपल्या मागें तक्तावर बसावें. असें त्यानें ठरविलें. आणि वऱ्हांडांतून ख्वाजा जहान तुर्कयास बोलावून आणून निजामशाहाच्या अल्पवयांत त्यानें पालन करून राज्याचा कारभार चालवावा, आणि निजामाच्या आईस विचारल्याशिवाय कोणतेंही काम करूंनये, असा त्यानें मृत्युलेख केला. हिजरी सन ८६५ सालीं जिल्कादच्या २८ व्या तारखेस हुमायून शाहा मरण पावला. परंतु कित्येक असें सांगतात कीं, तो या आजारांतून बरा झाला, आणि पुढें दारूच्या गुंगींत असतां त्याच्याच नोकरांनीं त्याच्या अमानुषिक क्रूरपणास कंटाळून त्यास ठार मारिलें. यानें ३ वर्षे ६ महिने ६ दिवस राज्य केले.

शाहाचा मृत्यु. तारीख ३ सपटेंबर इ.स. १४६१. हि.स. ८६५.

---

# निजामशाहा बाहमिनी.

इ० स० १४६१ ते १४६३ पर्यंत.

---

शाहाची आई बेगम, ख्वाजा जहान आणि महंमदगवान हे त्रिवर्ग शाहाच्या अल्पवयांत कारभार करितात.— तेलंगण आणि ओढिसा येथील राजे शाहावर स्वारी करितात, व त्यांस मागें हटावें लागतें.— माळव्याचा सुलतान महमूद दक्षणेवर स्वारी करितो.— दक्षणच्या सैन्याचा पराभव होतो.— शाहा बेदरांत जाऊन आश्रा घेतो.— माळव्याची फौज त्यावर येते.— शाहा फेरोजाबादेस जातो.— बेदर शहर माळव्याचा सुलतान घेतो.— गुजराथचा शाहा दक्षणी लोकांच्या कुमकेस येतो.— माळव्याचा सुलतान मागें हटतो.— त्याच्या फौजेचा अगदीं पराभव होतो.— त्यास आपलें अवजड सामान सुमान टाकावें लागतें.— गोंडवणच्या पहाडांतून तो मागें जातो.— त्याच्या फौजेचे अतिशय हाल होतात.— गुजराथचें सैन्य मागें जातें.— माळव्याचा सुलतान पुनः दुसरी स्वारी करितो.— गुजराथची फौज कुमकेस येते.— माळव्याचा सुलतान मागें जातो.— दक्षणचा अल्पवयी शाहा एकाएकीं मरण पावतो.

---

शाहाची आई व दोन सरदार निजामशाहास गादीवर बसवून कारभार करितात.

जेव्हां परमेश्वरासच मनुष्यजातीची दया आली, तेव्हां त्यानें अति क्रूर व झालिम अशा हुमायुनास इहलोकांतून परलोकास नेलें. आणि त्याचा पुत्र **निजामशाहा** दक्षणच्या तक्तावर बसला, आणि त्याची आई राज्याची कुलमुखत्यार झाली. ही बायको स्वतः मोठी हुषार होती. परंतु **ख्वाजाजहान** आणि **ख्वाजेखानमहंमद गवान** या उभयतांच्या सल्याशिवाय कोणतीही गोष्ट करीत नसे, व दुसऱ्या कोणा सरदारास राज्यकारभारांत हात घालूं देत नसे. **महंमदगवान** विजापूरच्या सुभेदारीचें काम पाहात होता. त्यास तिनें वजीर नेमिलें, आणि **ख्वाजा जहानास** तेलंगणची सुभेदारी देऊन **वकील उस् सलतनद**चें काम सांगितलें. हे दोघे प्रधान दररोज सकाळीं महालांत जात, आणि एका स्त्रीच्या द्वारानें राणीशीं खलबत करीत. नंतर ती एका स्त्रीच्या द्वारानें त्यांचें म्हणणें पसंत किंवा नापसंत करून अल्पवयी शाहास तक्तावर बसण्यास

कचेरींत पाठवी. शाहाचे उजवे बाजूस **ख्वाजा जहान** व डाव्या बाजूस **महंमद गवान** असे उभे राहात. हे दोघे कामगार शाहाच्या देखत हुकूम देत आणि सर्व कामकाज करीत. सुदैवेंकरून ही त्रयी एका मतानें व एका दिलानें कारभार करूं लागल्यामुळें माजी शाहाच्या जुलमामुळें लोकांनीं जो त्रास सोसला होता, तो लौकरच ते विसरले. परंतु दक्षणच्या गादीवर अल्पवयी मूल आहे असें ऐकून सभोंवतालचे मुसलमान व हिंदु राजे, आणि माजी शाहाच्या क्रूरवर्तनानें हवालदील झालेले सरदार व कामगारही बाहामिनी राज्यावर हल्ले करून त्यांतील प्रांत बळकाविण्याचे बेत करूं लागले. प्रथमतः तेलंगणच्या जमेदाराच्या सहाय्यानें ओदिसा प्रांताच्या राजानें **राजमहेंद्री**च्या वाटेनें दक्षणेवर स्वारी केली, आणि कौलासपर्यंत मुलूख लुटून उध्वस्त केला. राणी व प्रधान कोणत्याही रीतीनें न डगमगतां त्यांनीं ४०,००० सैन्य जमविलें आणि छोट्या शाहास बरोबर घेऊन शत्रूवर कुच केलें. ओदिसाचा राजा शाहाच्या फौजेपासून ६ मैलांवर आणि अमदाबाद बेदर या राजधानीपासून १० मैलांवर येऊन पोंहोंचला. छोट्या शाहापाशीं तेलंगणचा मुलूख परत मागावा, आणि त्याजवर खंडणी बसवावी, असा त्याचा बेत होता. अशा मतलबाचें मागणें येतांच दोघां प्रधानांनीं असें उत्तर पाठविलें कीं, ‘ओदिसा आणि त्या प्रांताची महानदीच्या कांठीं असलेली **जाजनगर** ही राजधानी स्वारी करून जिंकण्याचा बेत शाहानें केला आहे. परंतु ज्यापेक्षां स्वतः राजेसाहेब आपली फौज घेऊन इतके दूर आले आहेत, त्यापेक्षां त्या दूरदेशीं जाण्याचे श्रम न घेतां आपला पराभव करण्याचा बेत शाहा येथेंच तडीस नेतील. याशिवाय आणखी शाहानें असा निश्चय केला आहे कीं, राज्याचे जें नुकसान झालें आहे, तें भरून देऊन खंडणी देण्याचें कबूल केल्याशिवाय आपल्याकडील एका मनुष्यासही माघारें जाऊं द्यावयाचें नाहीं. हा निरोप घेऊन करमानचा शाहा **नीमतउल्लाचा** नातु **मोहिबउल्ला** यास पाठविलें. परंतु त्याच्या बरोबर असलेल्या १६० स्वारां-

तेलंगणच्या जमेदाराच्या सहाय्यानें ओदिसाचा राजा दक्षणेवर स्वारी करितो, व त्यास मागें हटावें लागतें.

+ करमानचा प्रसिद्ध शाहा नीमतउल्ला याचा नातु शाहा मोहिबउल्ला हा होता.

स हिंदूंनीं थांबवितांच त्यानें रायाच्या आघाडीवर अशा शौर्यानें हल्ला केला कीं, सर्व फौज आली असें समजून आघाडीचे हिंदुलोक मुख्य फौजेकडे मागें हटले. आणि ओडिसा व तेलंगणचे राजे आपलें अवजड सामान सुमान टाकून रात्रीं मागें गेले. ख्वाजाजहान दुसऱ्या दिवशीं त्यांचा पाठलाग करीत गेला आणि शाहा व महंमदखान त्यांच्या मागून+ सावकाश मुक्काम करीत निघाले. ख्वाजा जहानाच्या चलाखीमुळें आपले दोन किंवा तीन हजार लोक दररोज मरतात, असें पाहून त्यांनीं एका किल्ल्यांत* जाऊन आश्रा घेतला; व तेथून महंमदगवानाकडे माफी मागण्याकरितां वकील पाठविला. नंतर बराच वादविवाद होऊन जेव्हां त्यांनीं खूब खंड दिला, तेव्हां उपद्रव न करितां त्यांस आपल्या मुलखीं परत जाऊं दिलें. निजामशाहा बाहामिनी मोठ्या विजयानें राजधानीस परत आला, आणि त्यानें आपल्या कामगारांस व शिपायांस इनामें व बक्षिसें देऊन आपापल्या ठिकाणीं जाण्यास त्यांस परवानगी दिली.

माळव्याचा सुलतान दक्षणेवर स्वारी करितो.

या स्वारीनंतर लौकरच माळव्याचा सुलतान महंमुद यानें २८००० स्वारांनिशी खानदेशाच्या मार्गानें बाहामिनी राज्यावर स्वारी केली. ओडिसा आणि तेलंगणच्या राजांनींही पुनः तयारी करून मुसलमानांच्या मुलखांत पुंडावा आरंभिला. तेव्हां प्रधानांनीं तेलंगणच्या फौजेस हिंदूविरुद्ध आपल्या प्रांताचें रक्षण करण्यास हुकूम दिला; आणि निजामशाहास बरोबर घेऊन विजापूर, दौलताबाद आणि वऱ्हाड येथील फौजांसहवर्तमान सुलतान महंमुदावर कुच केलें.

निजामशाहा जरी अगदीं लहान होता, तरी त्यानें सैन्याचें आधिप-

---

+ बेदरचा मुल्ला दाऊद आणि बाहामिनी घराण्याचे दुसरे इतिहासकार यांच्या लेखांतून वरील हकीकत घेतांना फेरिस्ता यानें फारसा विचार केला नाहीं असें दिसतें, आणि तसेंच हिंदू लोक एकाएकीं कां मागें हटले, याचें कारण शोधून काढण्याचाही त्यानें यत्न केला नाहीं. कारण तेलंगण प्रांत परत घेण्याकरितां विचारपूर्वक मसलत करून जो जमाव झाला होता, त्याची केवळ १६० लोक दृष्टीस पडतांच फुटाफूट झाली, असें समजणें हें वेडेपण आहे.

* फेरिस्तानें किल्ल्याचें नांव दिलें नाहीं.

त्य स्वीकारिलें. **ख्वाजेखान महंमद गवान** १०,००० स्वार घेऊन उजव्या बाजूस राहिला. **निजामउल् मुल्क** तुर्क हा दुसऱ्या सरदारांस घेऊन डाव्या बाजूस राहिला, आणि **ख्वाजा जहान** आणि **शिंकंदरखान** यांसहवर्तमान ११,००० स्वार आणि १०० लढाऊ हत्ती घेऊन मध्यभागीं शाहा राहिला. माळव्याच्या सुलतानानें आपला पुत्र शाहाजादा **घैसासउद्दीन** यास उजव्या फळीवर आणि चंदेरीचा सुभेदार **महबतखान** व **झरीर उल् मुल्क** या उभयतांस डाव्या फळीवर नेमिलें, आणि निवडक सैन्य घेऊन आपण स्वतः मध्यभागीं राहिला.

**ख्वाजेखान महंमद गवानानें** शत्रूच्या डाव्या फळीवर हल्ला करून लढाईस आरंभ केला. कांहीं चमक उडाल्यावर शत्रूची फळी फुटली, आणि लोक पळाले, व **महबतखान** आणि **झरीर उल् मुल्क** हे दोघेही लढाईत पडले. सर्व हिंदुस्थानांत शौर्याविषयीं जो नावाजलेला होता, तो शाहजादा **घैसास उद्दीन** व त्याच्या हाताखालीं असलेली माळव्याची फौज जी उजव्या बाजूस होती. त्यांवर **निजाम उल् मुल्क** तुर्कयानें हल्ला केला. दोहों सैन्यांतील लोक एकमेकांत मिसळून जेव्हां हातघाईस आले, तेव्हां **निजाम उल् मुल्क तुर्क** आणि शाहाजादा **घैसास उद्दीन** यांचें परस्पर युद्ध जुंपलें. शाहाजाद्यानें निजामाच्या तरवारीचे+ तुकडे तुकडे करून टाकिले; तेव्हां त्यानें आपल्या तरवारीचा दस्ता शाहाजाद्याच्या तोंडावर अशा जोरानें फेंकला कीं, तेणेंकरून त्याच्या डोळ्यास मोठी जखम होऊन रक्त वाहूं लागलें, व त्या वेदनेनें तो घोड्यावरून खालीं पडला. आपला मुख्य पडतांच माळव्याच्या फौजेंतील लोकांची नेहमींप्रमाणें हिंमत खचली, आणि ते पळत सुटले. त्यांच्या मागें दक्षणी फौज ४ मैलपर्यंत लागली, आणि पुष्कळ कत्तल करून ५० हत्तींसह विपूल लूट घेऊन परत आली. आपल्या सैन्याच्या दोन्ही फळ्या मागें हटल्या, असें पाहून सुलतान **महंमुद** यानेंही त्यांचाच कित्ता घेण्याची तयारी केली. परंतु त्याचा दुसरा पुत्र व कांहीं सरदार यांनीं तसें न करण्यास सल्ला दिल्यावरून आपल्या ठिकाणींच राहिला. तेव्हां **ख्वाजा जहान** यानें त्यावर हल्ला केला. या हल्ल्यां-

+ तरवारीचे दस्ते भरीव पोलादाचे केलेले असत, आणि तरवारीच्या जाडी पात्यांचें वजन सहन करण्याजोगे ते जड असत.

त सुलतान **महंमुदानें शिकंदरखान तुर्क** याच्या हत्तीच्या डोक्यांत तीर मारिला. तेणेंकरून तो प्रचंड प्राणी त्या वेदनेनें व्याकूळ होऊन मागें वळला, आणि आपल्याच फौजेंतील लोकांस तुडवीत निघाला. आणि मस्त+ होऊन खुद्द निजामशाहासही सोडेंना धरीत होता. तेव्हां भीतिमुळें किंवा **खवाजा जहाना**च्या द्वेषामुळें **शिकंदरखानानें** आपली फौज मागें घेतली, आणि शाहास घेऊन लढाईच्या मैदानापासून कांहीं अंतरावर जाऊन उभा राहिला. तेव्हां बादशाही जरीपटका* मागें काढलेला पाहतांच दक्षणी फौज मागें पळाली, आणि राजधानीस पोंहोंचेपर्यंत थांबली नाहीं. उजव्या व डाव्या फळींतील लोक पाठलाग करीत गेले आहेत, आणि शाहा दक्षणी लोकांस घेऊन पळाला आहे, असें पाहून आपणही मागें हटून जावें, असा **खवाजाजहानानें** विचार करून तो अशा त्वरेनें निघाला कीं, त्यानें आपले सर्व लोक आणि पादशाही हत्ती, व घोडे या सर्वांस घेऊन तो अमदाबाद बेदर येथें येऊन सुरक्षीत पोंहोंचला. **खाजेखान महंमद गवानानें**ही इतका जय मिळाल्यावर- ही घडी बिघडून अशी विपरीत दशा आलेली पाहिली. तेव्हां तोही पाठलाग टाकून मागें वळला. **शिकंदरखान तुर्क** शाहास सुखरूप घेऊन मागें आला. तेव्हां या कामगिरीबद्दल राणीनें त्यास इनाम दिलें. परंतु **खवाजा जहान** याजकडून खरी हकीकत समजल्यावर त्याच्या भित्रेपणामुळें आणि जय प्राप्त होण्याच्या संधीस रणांगणांतून शाहास काढून त्याची अप्रतिष्ठा केल्यामुळें तिनें **शिकंदरखाना**स कैदेंत टाकिलें. **शिकंदरखाना**चे स्नेही त्याच्या तर्फे असें प्रतिपादन करूं ला-

दक्षणी फौजेचा पराभव होतो, व शाहा बेदरास जाऊन आश्रा घेतो.

---

+ हत्ती चवताळले म्हणजे मस्त होतात. आणि पुष्कळ वेळां एकमेकांच्या आंगावरही धांवतात. असा प्रकार झाला म्हणजे हत्तीवर बसलेल्या लोकांचा बचाव करण्याकरितां महातास अतिशय खटपट करावी लागते.

* बादशाहाबरोबर पादशाही निशाण किंवा जरीपटका हत्तीवर नेहमीं लढाईच्या मैदानांत असतो. हें निशाण नाहींसें होतांना हिंदू सैन्याची कशी धांदल उडते. हें सर्वत्र प्रसिद्ध आहे. परंतु हल्लीं प्रत्येक कंपूंत किंवा पथकांत आणि प्रत्येक तोफेवरही निशाण असतें, यामुळें शिपाई लोकांची हिंमत इतकी लौकर खचत नाहीं.

गले कीं, खानानें यासमयीं वास्तवीक शाहाचा जीव वांचविला. कारण यावेळीं दोहों फळ्यांमधील लोक लूट करीत सुटले होते, आणि यामुळें शाहाजवळ कांहीं फौज राहिली नव्हती. आणि ते दक्षणी लोक असें म्हणाले कीं, ज्या मोगलांनीं राज्याचीं सर्व सूत्रें हातीं घेऊन अधिकार बळकाविला अहे त्यांच्या हातीं अशी अप्रतिष्ठा सहन करणार नाहीं. [illegible]स दिलेली शिक्षा अमलांत आणण्यास प्रस्तुतचा काल अनुकूल नाहीं असें पाहून खवाजा जाहानानें त्यास मुक्त करण्याविषयीं रुकार दिला.

माळव्याचा सुलतान महंमुद यानें हे तंटे व दक्षणी लोकांचा प्रधानाशीं बेबनाव झालेला ऐकून अमदाबाद बेदर शहरास वेढा घालण्याकरितां कुच केलें. राणीस खवाजा जहानाच्या इमानीपणाविषयीं अंदेशा आला, व मागील पराभव मुख्यत्वें याच्याच हयगयीनें झाला, असें तिच्या मनांत भरलें. ख्वाजेखान महंमद गवान यासही तसेंच वाटलें. तेव्हां त्याच्या सल्यानें बेदर किल्ला मल्लूखान दक्षणी याचे स्वाधीन करून शाहास घेऊन राणी फेरोजाबादेस गेली. शाहा गेल्यावर १७ दिवसांनीं सुलतानानें शहर ताब्यांत घेतलें, व बऱ्याच मुलखांत त्यानें आपला अंमल बसविला. आणि बाहामिनी घराण्याचें राज्य खिलजी लोकांच्या हातीं जातें, असें सर्वांस वाटूं लागलें. परंतु इतक्यांत गुजराथच्या महंमुदशाहानें फौज रवाना केल्याची बातमी आली. बेदराहून निघण्यापूर्वी निजामशाहानें गवानाच्या सल्यावरून गुजराथच्या सुलतानाकडे कुमक मागण्याकरितां वकील पाठविले होते. तिकडून फौज निघाल्याची बातमी येतांच शाहानें आपल्या बचावाकरितां अस्ताव्यस्त झालेली फौज पुनः जमविली. आणि शत्रूस उपद्रव देण्याकरितां छोट्या टोळ्या पाठविल्या. इतक्यांत गुजराथचा सुलतान ८०,००० स्वार घेऊन सरहद्दीवर येऊन पोहोंचला. राणीनें महंमद गवानास सामोरें पाठविलें. तेव्हां गुजराथच्या महंमुदानें आपले २०,००० स्वार व कांहीं मुख्य कामगार त्याच्या हवालीं केले. नंतर लौकरच या दोन्ही फौजा एकदम राजधानीकडे निघाल्या.

माळव्याची फौज शाहावर येते.

शाहा फेरोजाबादेस जातो, व सुलतान बेदर घेतो.

गुजराथचा सुलतान दक्षणी लोकांच्या कुमकेस येतो.

+ परंतु किल्ला अद्याप हस्तगत झाला नव्हता.

* नजीकच्या राजेलोकांमध्यें एकमेकांचा वरचढपणा होऊंनये अशाविषयीं (पुढें चालू.)

माळव्याचा सुलतान महंमुद यानें जरी बेदर शहर सर केलें होतें, तरी बेदरचा किल्ला त्याच्या हातीं लागेना. इतक्यांत दोघां दोस्तांचें सैन्य नजीक आलें, असें ऐकून त्यानें वेढा उठविला, आणि घाइघाईनें तो माळव्याकडे परत गेला. ख्वाजेखान महंमद गवानानें शत्रू वऱ्हाडच्या मार्गानें गेल्यास त्यास उपद्रव देण्याकरितां १०,००० दक्षणी स्वार रवाना केले, आणि कंधार व बीड या दोहोंमध्यें असलेल्या एका ठाण्याकडे १०,००० फौज घेऊन स्वतः निघाला. येणेंकरून माळव्याच्या फौजेस चोहोंबाजूंनीं त्यानें अडविलें, आणि त्यास कहीकबाड मिळण्याचें बंद करण्यासाठीं दक्षणी स्वारांच्या टोळ्या पाठविल्या. या टोळ्यांतील दक्षणी लोक छोट्या व चपल तट्टांवर बसून सुलतानाकडील कहीकबाड मिळविण्याकरितां ज्या टोळ्या फिरत होत्या, त्यांवर जिकडे तिकडे झडपा घालून त्यांस उपद्रव देत सुटले, आणि पुष्कळ फौजेचा हल्ला आला म्हणजे जिकडे तिकडे पळून जाऊन दडूं लागले. सुलतान महंमुदापाशीं ३०,००० स्वार होते, व त्यांच्याशीं लढाई करण्याचा त्यानें पुष्कळ वेळां निश्चय केला; परंतु लढाईस उभें न राहतां छोट्या छोट्या टोळ्यांकडून झडपा घालविण्याचा क्रम गवानानें सोडिला नाहीं. यामुळें शेवटीं माळव्याच्या फौजेंत धान्याचा दुष्काळ पडून लोकांचे हाल होऊं लागले. तेव्हां सुलतानास मोठ्या सहनशीलतेनें व सबूरीनें आपल्या त्रासून गेलेल्या फौजेची ओरड ऐकणें भाग पडलें.

माळव्याचा सुलतान मागें हटतो.

या संकटावस्थेंत आपल्या पुष्कळ हत्तींस मारून व अवजड सामान सुमान जाळून माळव्याचा सुलतान सडा गोंडवणाकडे गेला. गोंडवणच्या हद्दीपर्यंत त्याच्या मागें महंमद गवान होता व तो त्यास एकसारखा उपद्रव देत असे. यामुळें सुलतानाचे पुष्कळ लोक मेले, व रा-

---

परस्परांमध्यें जो मत्सर असतो, त्यामुळें कोणाएका राजाचा अधिकार फार वाढण्यास प्रतिबंध होतो असें सर्वकाळीं आढळून येतें. युरोपांतील राजांमध्यें कोणाएकाचा फाजील वरचढपणा होऊंनये म्हणून सर्व राजे टपत राहत, आणि कोणी शिरजोर झाल्यास त्यास मूळच्या स्थितीवर आणीत. अशी जी थोड्या वर्षांमागें युरोपांत वहिवाट होती, तशी मुसलमानांनीही हिंदुस्थानांत पूर्वी ठेविली होती असें दिसतें. जेव्हां सर्वच निर्बल होऊन त्यांची गातचानी झाली, तेव्हां मात्र मोंगलबादशाहास त्यांस जिंकतां आलें.

हिलेल्या सामानापैकीं बरेंच सामान गवानाच्या हातीं लागलें. गोंडवणास पोहोंचल्यावर त्यानें त्या देशांतील एका जमेदारास असें सांगितलें कीं, ज्या मार्गानें दक्षणच्या फौजेस आमचा पाठलाग करितां येणार नाहीं व आपल्या थकलेल्या फौजेस तकलीफ न पडतां कुच करितां येईल, अशा मार्गानें आपणास माळव्यांत पोहोंचवावें. तेव्हां सुलतानास जमेदारानें असें सांगितलें कीं, अगदीं जवळच्या ठिकाणावरून गेल्यास कांहीं मुक्कामाच्या ठिकाणीं पाणी फार थोडें मिळेल. तथापि तें न ऐकतां व ही अडचण केवढी आहे, याचा बरोबर विचार न करितां पाठलाग करणाऱ्या शत्रूंच्या हातून कसें तरी एकदां सुटावें, असा विचार मनांत आणून सुलतान त्याच मार्गानें निघाला. पहिल्याच मुक्कामास होरपळून जाण्याजोग्या उष्ण वाऱ्यासुळें व पाण्याच्या कमताईमुळें त्याचे ६,००० लोक हाल होऊन मेले. दुसऱ्या दिवशीं पहाडी लोकांनीं फौजेची अशी दुःखकारक अवस्था पाहून सामान सुमान घेऊन येणाऱ्या पिछाडीच्या लोकांस लुटलें. कारण फौजेंतील लोक आपल्या हाल अपेष्टेनें बेदम झाल्यामुळें त्यांच्या हातून पिछाडीचें रक्षण झालें नाहीं. त्या दिवशीं पाण्याच्या एका पेल्यास २ रुपये पडूं लागले, आणि पुष्कळांस त्या किंमतीसही मिळालें नाहीं. या क्रमानें ज्याचें वर्णन करितां येत नाहीं असे कष्ट सोशीत जेव्हां या भयंकर पेंचांतून तो बाहेर पडला तेव्हां सर्व संकटें वाटाड्याच्या दगेबाजीपणामुळें आपणांवर आलीं, असा अंदेशा घेऊन सुलतानानें त्यास ठार मारण्याचा हुकूम दिला. गोंडवणाच्या सरदारानें जिवाची आशा सोडून सुलतानास यथास्थित गालिमदान केलें, आणि अशी शेखी मिरविली कीं, जेव्हां ताहानेनें व्याकूळ करून १२,००० लोकांचा मी नाश केला, तेव्हां त्याचा सूड सुलतान घेईल, असें भविष्य मी पूर्वींच केलें होतें. मला मागें तीन मुलगे आहेत. म्हणून मी मेलों तरी त्याची मला फिकीर वाटत नाहीं, आणि मी लौकरच स्वतः आपल्या मुलाच्या पोटीं पुनः जन्मही घेईन. या भाषणावरून असें दिसतें कीं, हिंदुलोकांप्रमाणें गोंड लोकांचा ही पुनर्जन्माव-

आपलें सर्व अवजड सामान सुमान टाकून गोंडवणच्या पहाडांतून तो कुच करितो.

त्याच्या फौजेचे फार हाल होतात.

+ गोंड हे हिंदु नव्हते. हें फेरिस्ता यास माहीत होतें, असें दिसतें. परंतु ही गोष्ट हिंदुस्थानांतील लोकांस आणि विशेषेंकरूनयुरोपियन लोकांस माहीत नव्हती.

र भरंवसा असतो. यामुळें आपल्या पुण्याईनें आपणास लौकरच पुनर्जन्म मिळेल, असें त्यांस वाटत असल्यानें ते जिवाची फारशी पर्वा बाळगीत नाहींत.

अमदाबाद बेदर हें शहर सर होण्यापूर्वी लढाईंतल्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें सुलतान महंमुदानें आपल्या शिपायांस हवेतें फाजील वर्तन करण्यास परवानगी दिली होती. परंतु जेव्हां दक्षणेंत अंमल करण्याचा त्यानें निश्चय केला, तेव्हां आपलें वर्तन त्यानें बदललें आणि दक्षणच्या लोकांस आपल्या मर्जीप्रमाणें वागवूं लागला. धर्मपुस्तकांत शुद्धाशुद्धते विषयीं जे नियम सांगितले आहेत, त्या नियमास अनुसरून आपला पोषाख व आपलें खाणें ठेवण्याविषयीं नेहमी जपत असे. यामुळें स्वारीस जाई तेव्हां ही आपल्या राज्यांतील नियमित शेतांत पिकविलेले गहूं, तांदूळ, तेल इत्यादि जिन्नस मिळवीत असे. आणि लांकडी चौकटींत माती भरून त्यांत लाविलेला भाजीपाला मिळावा म्हणून जेथें जाई तेथें असल्या चौकटी बरोबर नेत असे. अमदाबाद बेदर येथें त्याचा मुक्काम असतां शाहा खलील उल्ला याच्या दर्ग्यांत असलेल्या मौलाना शमसुद्दीन या मौलवीस बोलावून भाजीपाल्याविषयीं आपले फार हाल होतात, असें त्यास सांगितलें; आणि जो माळी आपल्या स्वतःच्या जमिनींत भाजीपाला पिकवीत असेल, अशा एखाद्या माळ्याची शिफारस करा. म्हणजे कुराणांत सांगितल्याप्रमाणें तो मागेल ती किंमत देऊन त्याजकडून माळवें खरेदी करीन, असें कळविलें. तेव्हां मौलवीनें उत्तर दिलें कीं 'शाहा मस्करीनें मला सांगत आहे. कारण मुसलमानांच्या मुलखावर स्वारी करावी, त्यांचीं घरेंदारें लुटून उध्वस्त करावीं, त्याची मालमत्ता चोरावी, आणि पोषाख व खाणेंपिणें या कामांत मात्र कुराणांतील क्षुल्लक नियम अक्षरशः पाळण्याचें ढोंग करावें, या सारखा दांभिकपणा दुसरा कोणताही असणार नाहीं.' सुलतान महंमुदानें त्याचें म्हणणें यथान्याय आहे असें कबूल केलें, व डोळ्यांस अश्रू आणिले. परंतु तो म्हणाला कीं, बाह्यात्कारी विरोधी अशीं पुष्कळ कृत्यें केल्याशिवाय राज्यें चालणार नाहींत.

माळव्याचा सुलतान परत गेल्यावर गुजराथच्या महंमूदशाहाकडे मौल्यवान् नजरा देऊन निजामशाहानें वकील पाठविले, आणि कुमक केल्याबद्दल आपले फारफार आभार कळविले. नंतर महंमूदशाहा गुजरा-

थेस परत गेला, व **निजामशाहा** अमदाबाद बेदरास गेला. दुसऱ्या वर्षी माळव्याच्या सुलतानानें दक्षणेवर पुनः स्वारी केली, आणि अमदाबाद बेदरापर्यंत आला. परंतु या समयींही गुजराथच्या शाहाकडून पुनः कुमक आल्यामुळें सुलतानास मागें हटून जावें लागलें.

माळव्याचा सुलतान दक्षणेवर पुनः स्वारी करितो. इ. स. १४६२.

मुलामुलींचीं लहानपणींच लग्नें करण्याची बाह्मिनी घराण्यांत वहिवाट असल्यामुळें **निजामशाहा**करितां राणीनें आपल्या आप्तांतील मुलगी ठरवून मोठ्या योग्य थाटानें लग्न समारंभ केला. लग्न झालें त्या रात्रीं महाल मौजेंत व आनंदांत असतां राजमहालांतून एकाएकीं किंकाळ्या ऐकूं आल्या, आणि [redacted] प्राणास मुकला, अशी शोककारक वार्ता घेऊन लोक ओरडत आले. हा राजरूपी वृक्ष फुलें येण्यापूर्वींच एकाएकीं घातक अशा वाऱ्यानें उपटून पडला. ही गोष्ट हिजरी सन ८६७ सालीं जिल्काद महिन्याच्या १३व्या तारखेस रात्रीं घडली. **निजामशाहा** तक्तावर बसून दोन वर्षें एक महिना इतका काळ उजाडला नाहीं तोंच ही आकाशची कुऱ्हाड त्याजवर पडली.

शाहाचा मृत्यु. हि. स. ८६७ जिल्काद चं. १३ इसवी सन १४६३ तारीख २९ जुलई.

# महंमदशाहा बाहामिनी.(दुसरा.)

इ. स. १४६३ ते १४८२ पर्यंत.



हुमायून शाहाचा दुसरा पुत्र महंमदशाहा तक्तावर बसतो.—— माळव्याच्या सुलतानाकडून दक्षणचें सैन्य केरळ घेतें.—— केरळ प्रांत परत मिळतो व तह होतो.—— ख्वाजेखान महंमदगवान कोंकणावर स्वारी करितो.—— खेळणा आणि रामगड सर करितो.—— घांट चढून वर जातो, आणि कोल्हापूर येथें बरसात घालवितो.—— कोंकणांत परत जाऊन गोवें घेतो.—— कीश्वरखानास नव्या जिंकलेल्या प्रांतावर नेमून गवान राजधानीस जातो.—— गवानाचा मानपुरःसर सत्कार होतो.—— शाहा स्वतः लढाईस जातो.—— तेलंगण प्रांतांतील राजमहेंद्री आणि कंडापिली हीं ठाणीं घेतो.—— निजाम उल् मुल्क बहिरी याची तेलंगणच्या सुभेदारीवर नेमणूक होते.—— युसफ अहिलखान दौलताबादचा सुभेदार होतो.—— दुरिया इमाद उल् मुल्क वऱ्हाडचा सुभेदार होतो.—— शाहा पश्चिमेकडे कुच करितो, आणि बेळगांव घेतो.—— दक्षणेंत कडक अवर्षण पडून दुष्काळ पडतो.—— तेलंगणांत बंड होतें.—— शाहा तें बंड मोडण्यास कुच करितो.—— तो ओढिसा प्रांतांत जातो, व दक्षणेंत परत येऊन कांजीव्हरम लुटतो.—— ख्वाजेखान महंमद गवान या विरुद्ध कट.—— एक बनावट पत्र करून शाहास फसवितात.—— ख्वाजेखान महंमद गवान ठार मारला जातो.—— त्याचे गूण व स्वभाव.—— शाहास आपली चुकी समजते, व पश्चात्ताप होतो.—— त्याचे सरदार छावणींतून जातात.—— शाहास ताप येतो.—— बरा होऊं लागतो.—— फार दारू पिऊं लागतो.—— तेणेंकरून दुखणें उलटतें, व मृत्यु पावतो.



महंमदशाहा तक्तावर बसतो.

हुमायूनशाहा झालिम यास **निजाम, महंमद** आणि **अहंमद** असे तीन पुत्र होते. निजामशाहा वारल्यावर दुसरा पुत्र **महंमदशाहा** आपल्या वयाच्या ९ व्या वर्षी दक्षणच्या तक्तावर बसला; आणि सर्व राज्यकारभार मागील राज्यांतील वहिवाटीप्रमाणें मातोश्री राणीच्या देखरेखी खालीं **ख्वाजा जहान** आणि **ख्वाजेखान महंमद गवान** हे चालवूं लागले. शाहाचा कनिष्ठ भाऊ **अहंमद** यास खर्चाकरितां निराळी मोठी नेमणूक क-

रून दिलेली होती. **ख्वाजा जहान** याजकडे शाहाच्या शिक्षणाचें मुख्य काम होतें. **शुस्तेरी** या नांवच्या प्रसिद्ध विद्वानास शिकविण्याकरितां शिक्षक नेमिलें असून त्याच्या हाताखालीं शाहाचा विद्याभ्यास फार चांगला होत चालला. फेरोजशाहाच्या खालोखाल याच्या इतका विद्वान् शाहा बाहामिनी तक्तावर बसला नाहीं. राज्याच्या सर्व खात्यांमध्यें **ख्वाजा जहान** याचे अधिकार व वजन वाढून सर्व कारभार त्यानें स्वतः बळकाविला. पुष्कळ जुन्या सरदारांचे सरंजाम त्यानें काढून घेतले, आणि आपण चढविलेल्या अशा क्षुद्र लोकांस दिले. त्याच प्रमाणें त्यानें हुजूर खजिन्यांतील पैशाचीही बरीच अफरातफर केली, आणि आपला साथीदार जो **ख्वाजेखान महंमद गवान** यास सरहद्दीवर कामगारीस ठेवून त्यासही कारभारांत हात घालूं देईना. शाहाची मातोश्री राणी ही मोठ्या खोल स्वभावाची बायको होती. तिला या प्रधानाचा अमर्याद अधिकार सहन होईना. म्हणून तिनें त्याचा नाश करण्याचा निश्चय केला. यास्तव दुसऱ्या दिवशीं दरबारांत येतांच त्यास ठार मारण्याचा हुकूम देण्याविषयीं तिनें आपल्या पुत्राकडून वचन घेतलें. **ख्वाजा जहान** वहिवाटीप्रमाणें कचेरींत आला; परंतु **निजाम उल् मुल्क** तुर्क यास कांहीं पाहारेकऱ्यांसहवर्तमान पाहतांच त्याच्या मनांत अंदेशा आला. परंतु आतां उलट मागें जाण्यास सवड नाहीं, असें पाहून नेहमीप्रमाणें तो शाहाजवळ बसला. या नंतर लौकरच शाहाकडे दोन दासी आल्या, आणि शाहास मोठ्यानें म्हणाल्या कीं, राणीसाहेबांस दिलेलें वचन सरकार पाळतील, अशी त्यांस आशा आहे. त्या बरोबर शाहा निजाम उल् मुल्काकडे वळून मोठ्यानें म्हणाला ' हा दगलबाज मनुष्य फितूर आहे, त्यास ठार मारून टाक.' **निजामउल्मुल्काचें ख्वाजाजहानाशीं** वांकडें होतें, व तो या कामाकरितां तयारच होता. त्यानें **ख्वाजा जहानास** जाग्यावरून ओढून शाहा देखत+ जंब्यानें त्याचा प्राण घेतला.

---

+ फेरिस्तानें या शोकास्पद गोष्टीची तारीख दिली नाहीं. शाहा तक्तावर बसला तेव्हां सारा ८ वर्षांचा होता, आणि १४ वे वर्षी जें त्याचें लग्न झालें, तें ख्वाजा जहानाचे मृत्यूनंतर झालें. म्हणून यावेळीं शाहा अगदीं अर्भक मुलगा होता. यावरून एवढेंच दिसतें कीं, आशियाखंडांतील राजांस अगदीं लहानपणापासून अशीं घातक कृत्यें करण्यास प्रवृत्त करीत असत.

यानंतर कांहीं दिवसांनीं महंमदशाहानें महंमदगवानास बोलावून ख्वाजा जहानाचे सर्व किताब त्यास दिले, आणि वकील उस् सल्तनदचें कामही त्यासच सांगितलें. शाहा १५ वर्षांचा झाला, तेव्हां बाहामिनी घराण्यांतीलच एका शाहाजादीशीं त्याचें मोठ्या थाटानें लग्न झालें, आणि माई राणी राज्यकारभारांतील आपला हात काढून ईश्वरभजनांत काळ घालवूं लागली. तथापि सर्व महलाच्या कामांत तिचा सल्ला घेत, आणि शाहा दररोज तिच्या दर्शनास जात असे.

शाहा प्रौढ होऊन कारभार करूं लागतांच शेजारच्या राजांबरोबर युद्ध करण्याचा त्यानें निश्चय केला. यास्तव निजाम उल् मुल्क यास वऱ्हाडच्या सुभेदारीवर नेमून त्यास त्यानें असा हुकूम दिला कीं, मोठी फौज घेऊन माळव्याच्या सुलतानाच्या ताब्यांत असलेल्या केरळ किल्ल्यावर स्वारी करावी. निजाम उल् मुल्कानें केरळ किल्ल्यास वेढा दिला, आणि त्याच्या बचावाकरितां जी कुमक आली, तिचा त्यानें अनेकवेळां पराभव केला. शेवटच्या प्रसंगीं एक मोठी निकराची लढाई झाली. तिजमध्यें माळव्याच्या फौजेंतील १२,००० रजपूत व अफगाण लोक जिवावर उदार होऊन मोठ्या शौर्यानें लढले, आणि दोहों फौजांतील पुष्कळ लोक पडले. तथापि शेवटीं दक्षणी लोकांसच जय मिळाला. त्यांनीं किल्यावरील कांहीं रक्षक फौजेचा पाठलाग करीत जेथून रक्षक फौजेनें हल्ला केला होता, त्या किल्यांतील ठिकाणापर्यंत पाठलाग करण्याकरितां किल्यांत पळून जाणाऱ्या लोकांबरोबरच दक्षणी लोक किल्यांत शिरले, आणि किल्ला ताब्यांत घेतला. दक्षणच्या शिपायांची अशी वहिवाट होती कीं, ज्यांस जय मिळेल त्यांनीं जिंकलेल्या लोकांस गालिमदान करूं लागावें. येणेंकरून दोघा रजपूत भावांस असा त्वेष आला कीं, त्यांनीं आपल्या आंगीं हिंमत कमी नाहीं, असें शत्रूंस दाखविण्याचा निश्चय केला. जिकडे तिकडे थावराथावर होऊन जेव्हां माळव्याच्या लोकांनीं किल्ला रिकामा केला तेव्हां त्या दोघां रजपूत भावांनीं निजाम उल् मुल्काच्या लोकांस वि-

दक्षणी फौज केरळ किल्ला घेते. हि॰ स॰ ८७२ इ॰ स॰ १४६७.

---

+ या प्रमाणें वेढा उठविण्याची रीति अनेक वेळां फत्ते होते. वेढलेल्या लोकांनीं हल्ले केले म्हणजे त्यांस यांची फारच भीति असते.

नंति केली कीं, आम्हीं आपलें सर्व आयुष्य लष्करांत घालविलें, व पुष्कळ शूर मनुष्य पाहिले. तथापि याच्या तोडीचा आम्हीं कोणी पाहिला नाहीं. म्हणून आम्हीं जाण्यापूर्वीं आम्हांस त्याच्या चरणाचें चुंबन घेण्याची परवानगी मिळावी. त्यांजपाशीं हत्यारें नाहींत असें पाहून त्यांस त्यानें जवळ येण्याचा हुकूम दिला. तेव्हां ते मोठ्या नम्रपणानें जवळ गेले. परंतु इतक्यांत एकाएकीं वळून जवळच्या शिपायांच्या हातच्या त्यांनीं कटारी घेतल्या, आणि एकानें निजाम उल् मुल्कास प्राणघातक अशी जखम केली, आणि नंतर ते आपल्या बचावासाठीं मोठ्या निकरानें लढले. परंतु शेवटीं दक्षणी लोकांनीं त्यांचे तुकडे तुकडे करून टाकिले. युसफ आदिलखान सवाई आणि दूरियाखान तुर्क या नांवाचे निजाम उल् मुल्काचे दोन दत्तक किंवा मानलेले भाऊ होते, त्यांनीं किल्यांत मोठी फौज ठेवून आणि निजामाचें प्रेत व पुष्कळ लूट घेऊन ते राजधानीस गेले. शाहानें त्यांच्या नोकरीची वाहवा करून प्रत्येकास एकेक हजार स्वारांची सरदारी दिली; आणि केरळचा किल्ला व त्या खालील मुलूख त्यांस जहांगीर+ दिला.

दक्षणी लोकांची धमक पूर्वींप्रमाणेंच आहे, आणि माजी राज्यांत त्यांस जो आम्हीं उपद्रव दिला, त्याचा आणखी सूड घेण्याकरितां ते आपणावर येतील, या भीतीनें माळव्याच्या सुलतानानें महंमदशाहाकडे मौल्यवान् नजरा देऊन शेरीफ उल् मुल्क या वकिलास पाठविलें. या वकिलानें शाहास असें कळविलें कीं; माळव्याचा सुलतान हुशंग यानें अहंमदशाहा बाहामिनीशीं असा तह केला होता कीं, वऱ्हाड प्रांत दक्षणच्या शाहाकडे असावा आणि केरळचा किल्ला माळव्याच्या सुलतानाच्या ताब्यांत असावा; आणि उभयतांमध्यें व त्यांच्या वारसांमध्यें कायमची दोस्ती राहावी. परंतु दक्षणच्या फौजेनें हाल्लीं केरळचा किल्ला ताब्यांत घेतला आहे. म्हणून वरील तहास अनुसरून केरळचा किल्ला परत द्यावा आणि दो-

माळव्याचा सुलतान शाहाकडे वकील पाठवितो.

+ सरहद्दीवरील प्रांताचें चांगलें रक्षण व्हावें म्हणून त्याचा वसूल व कारभार लष्करी सरदारांकडे बहुतेक लावून दिलेला असे. परंतु यापासून त्या प्रांतावर नेमिलेले कामगार अनेक वेळां बंडें करण्यास प्रवृत्त होत.

हीं राज्यांतील लोकांस लढाईच्या संकटापासून सोडवावें.

**शेरीफ उल् मुल्क** याजबरोबर **शेख अहंमद सुदर** या आपल्या सरदारास पत्र देऊन **महंमदशाहानें** मांडूस पाठविलें. त्यांत त्यानें सुलतानास असें कळविलें कीं, पूर्वीच्या तहाप्रमाणें चालण्यास आपल्याकडून तयारी आहे. कर्नाटक प्रांतांत जिकडे तिकडे हिंदूंच्या ताब्यांत मोठ मोठे किल्ले आहेत, ते मला घेण्यास पुष्कळ आहेत. म्हणून केरळचा किल्ला घेण्यास माझी फौज जावी, असा कांहीं अर्थ नाहीं. आणखी त्यानें असें लिहिलें कीं, ईश्वरकृपेनें पूर्वीचा तह बाहामिनी घराण्यानें मोडला नाहीं. अल्पवयी माझा भाऊ याच्या माजी कारकीर्दींत खुद्द सुलतानानींच राज्यकारभाराची ढिलाई पाहून आमच्या मुलखांत लोकांवर अशा तऱ्हेचा जुलूम केला कीं, त्या प्रमाणें खुद्द **जंगिजखानानें**ही केला नसेल. शेवटीं त्यानें असें लिहिलें होतें कीं, झालेली गोष्ट आतां फिरत नाहीं. म्हणून आतां मुसलमानांमध्यें एकी करण्याविषयीं नेहमीं झटणाऱ्या अशा शेख **अहंमद** यास माळव्याच्या दरबारीं पाठविलें आहे, आणि तो मौलवी करारमदार करील त्या प्रमाणें वर्तन करण्यास आपण तयार आहों. मांडूनजीक शेख अहंमद पोहोंचला तेव्हां मुख्य सरदार त्यास सामोरे आले, आणि मोठ्या थाटानें व मोठ्या सन्मानानें त्यास त्यांनीं शहरांत नेलें. तेथें गेल्यावर सुलतान **महंमुद खिलजी** याची भेट झाली, तेव्हां त्यानें आपला वकलातनामा किंवा मुखत्यार नामा आणि शाहाचें पत्र अशीं सुलतानास दिलीं. पूर्वीचा तह आपणाकडूनच प्रथम मोडण्यांत आला, हें सुलतानानें लागलेंच कबूल केलें. परंतु तो म्हणाला कीं, परम दयाळू परमेश्वर त्याबद्दल आपणास शासन करणार नाहीं, अशी आपण आशा करितों. सुलतान **महंमुदानें** सर्वांदेखत, असें सांगितलें कीं, त्या स्वारीचा दोष मजवरच आहे. परंतु त्याचें नांव आतां काढूनये अशी माझी विनंति आहे. आतां अशा रीतीचा तह परस्परांमध्यें व्हावा कीं, माझे वारस आणि बाहामिनी राजे यांमध्यें परस्पर शत्रुत्व उत्पन्न होण्याची कधींच वेळ येऊंनये. तेव्हां **महंमदशाहाच्या** तर्फे **शेख अहंमद** आणि सुलतान **महंमुद खिलजी** याच्या तर्फे **शेख उल इसलाम** हा विद्वान् मौलवी, या उभयतानीं तहाचीं कलमें ठरविलीं; व दोघांनीं आपआपल्या शिके कागदी केल्या, व त्याच प्रमाणें दोहों राज्यांतील कांहीं काजी मौलवी यांनींही त्याजवर सह्या केल्या. त्या तहाच्या खलित्यावर दोघां

शाहांनीं पुढील मजकूर लिहिला:- 'जो कोणी हा तह मोडील त्यास अल्लाचा शाप लागेल, आणि तो पैगंबराचा नावडता होईल.' या तहांतील मुख्य कलमें पुढें लिहिल्याप्रमाणें होतीं. (१) दोघांनींही एकमेकांच्या राज्यांस उपद्रव देऊनये. (२) सुलतान अहंमद शाहाच्या कारकीर्दीत ठरल्याप्रमाणें केरळचा किल्ला माळव्याच्या सुलतानाच्या स्वाधीन करावा, आणि (३) कोणीही हिंदु लोकांकडून देश जिंकले असतां त्याची दुसऱ्यानें इच्छा करूंनये. या प्रमाणें बोलणें चालणें ठरल्यावर **शेख अहंमद** यानें केरळच्या सुभेदारास माळव्याच्या सुलतानाकडील सरदारांच्या हवालीं किल्ला करावा, असा हुकूम पाठविला. यानंतर तो दक्षणेंत परत आला, आणि या दोहों राज्यांमध्यें पुनः कधीं तंटा लागला नाहीं.

माळव्याच्या सुलतानाबरोबरतह.

महंमद गवानाची कोंकण प्रांतावर स्वारी. इ. स. १४६९.

हिजरी सन ८७४ या सालच्या आरंभीं **महंमद गवान** पेशवा कोंकणांतील खेळण्याचा **शंकरराय** व दुसऱ्या शिरजोर राजांस जिंकण्याकरितां निघाला. जुन्नर, चाकण, कोल्हापूर, दाभोळ, चौल, वांई, आणि माण येथील व दुसऱ्या कांहीं ठिकाणच्या फौजांस गवानाबरोबर जाण्याचा हुकूम झाला. खेळण्याचा* शंकरराय नेहमीं आपल्याजवळ ३०० जाहाजांचें आरमार बाळगी, आणि मुसलमान व्यापाऱ्यांस फार उपद्रव देई. याच शंकररायानें मागें मुसलमानी फौजेचा फडशा उडविला होता. **महंमद गवान** नजीक आला असें समजतांच हिंदूराजांनीं एकमेकांच्या रक्षणाकरितां सहाय्य करावें, अशा मतलबाचा तह करून घांटावर सर्व एकत्र जमले. **महंमद गवान** सर्व नाक्याच्या ठिकाणांतून हळू हळू पुढें गेला. परंतु पहाडी प्रदेशांत घोडेस्वारांचा इलाज चालत नाहीं, असें पाहून त्यानें सर्व स्वारांस परत पाठविलें, आणि **असतखान गिलनी**च्या हाताखालीं जुन्नरची फौज आणि **खुषकदम** याच्या हाताखालचे त्याचे

+ यास मलिक उत् तुजार म्हणजे व्यापाऱ्यांचा राजा आणि खाजेखान हेही किताब होते. व्यापाऱ्यांचा राजा हा किताब सर्वांत मोठा असें समजत. यावरून त्या काळची सुधारणा फार चमत्कारीक होती, असें दिसतें.

* खेळण्याच्या राजानेंच मुसलमानी सैन्याचा पूर्वीं नाश केला होता.

लोक आणि कोल्हापूर व दाभोळें येथील फौजा त्यानें आपल्याजवळ ठेविल्या. एवढें सैन्य घेऊन जंगल जाळीत व तोडीत पुढें गेला, आणि खेळण्यास वेढा घालून ५ महिने बसला. परंतु किल्ला हातीं लागला नाहीं. पुढें पर्जन्यकाळ आल्यामुळें त्यास वेढा उठवून जाणें भाग पडलें. तेथून येतांना त्या हवेंत वहिवाटलेल्या अशा १०,००० विश्वासू पायदळास वाटेच्या रक्षणार्थ ठेवून बाकी फौज घेऊन बरसात घालविण्यासाठीं कोल्हापूर येथें आला. येथें असतां त्यानें रामगड किल्ला घेतला. बरसात खलास झाल्यावर गवान त्याच वाटेनें खेळण्यास गेला, आणि युक्तिप्रयुक्ति करून व पुष्कळ पैसा लोकांस वांटून जो किल्ला आजपर्यंत मुसलमानांच्या हातीं गेला नव्हता, तो खेळणा किल्ला त्यानें ताब्यांत घेतला. दुसऱ्या वर्षीं बरसात आली, तेव्हां ती घालविण्याकरितां पूर्वीप्रमाणेंच कोल्हापुराकडे आला. ४ महिने बरसात घालवून पुनः तो **शंकरराया**च्या मुलखांत गेला, आणि सर्व मुलूख सर करून **मलिक उत् तुजार** व त्याचें सैन्य यांच्या कत्तलीबद्दल त्यानें पूर्णपणें सूड घेतला. नंतर विजया नगरच्या राजाच्या ताब्यांतील **गोवें** बंदर घेण्याकरितां गवान तिकडे गेला. समुद्रांतून हल्ला करण्यासाठीं १२० जहाजें पाठवून जमिनीवरून आपल्या फौजेनिशी त्यानें गोव्यावर हल्ला केला. विजयानगरच्या राजाकडून फौज येण्यापूर्वींच त्यानें तें बंद ताब्यांत घेऊन तेथें आपला अंमल बसविला. हें महत्वाचें गाणें मिळाल्याची बातमी **महंमदशाहा**स कळतांच त्यानें ७ दिवसपर्यंत नौबत वाजविण्याचा हुकूम केला, व दुसराही उत्साह केला.

तो कोल्हापूर येथें बरसात घालवितो, आणि रामगड व खेळणा हे किल्ले घेतो. हिसन ८७५ इसवी सन १४७०.

तो गोवें घेतो.

**खाजेखान महंमद गवान** यानें गोव्याच्या किल्यांत फौज ठेविली, आणि सर्व प्रकारची विपुल सामुग्री भरून सुमारें ३ वर्षांनीं तो अमदाबादबेदरास परत आला. या प्रसंगीं शाहा त्याच्या घरीं जाऊन ८ दिवस राहिला. त्यानें त्यास मोठे किताब दिले, आणि स्वतःचा एक पोषाख दिला. माईराणी

गवान राजधानीस येतो, व त्याचा मानपुरःसर सत्कार होतो.

---

+ सलामी देण्याकरितां व उत्साह दाखविण्याकरितां तोफांचा उपयोग होऊं लागण्यापूर्वीं नौबत वाजविण्याचीच वहिवाट होती.

* सरकारी कामकाजांतून माईराणीनें बरेच दिवस मन काढलें होतें, तथापि (पु. चा.)

त्यास आपला भाऊ असें म्हणूं लागली. त्याच्या हातारवालचा सेनापति **खुष कदम** यानें निरनिराळ्या स्वाऱ्यांत मोठी मर्दुमकी दाखविली होती. म्हणून गवानाच्या शिफारसी वरूनच त्यास **कीश्वरखान** हा किताब देऊन मोठ्या पदवीस चढविलें. आणि दाभोळ, कोल्हार, गोवें, पुंड, कंडूल आणि कोल्हापूर या किल्यांची देखरेख त्याजकडे दिली. गवानाच्या घराहून **महंमदशाहा** गेल्यावर गवान आपल्या खोलींत गेला. त्यास जो सुंदर पोषाख दिला होता, तो त्यानें अंगावरून काढिला, आणि जमिनीवर पडून खूब रडला. नंतर बाहेर येऊन त्यानें दरवेशाचा पोषाख घातला, आणि असदाबाद बेदर शहरांतील सय्यद, मौलवी, आणि काजी यांस बोलावून आणून आपलें सर्व द्रव्य, हिरे, माणकें व दुसरी सर्व संपत्ति त्यांस वांटून टाकिली, व आपणासाठीं फक्त हत्ती, घोडे आणि पुस्तकें मात्र ठेविलीं. आणि म्हणाला कीं, "परमेश्वराचा जयजयकार असो. मी आतां मोहपाशांतून व त्याच प्रमाणें संकटांतूनही सुटलों."

नव्या जिंकलेल्या प्रांतावर कीश्वरखानास सुभेदार नेमतात.

यानंतर गवानाचें वर्तन.

**मुल्ला शमसुद्दीन** यानें गवानास विचारिलें कीं, तुम्हीं आपली सर्व चीजवस्त देऊन टाकून फक्त पुस्तकें, हत्ती, आणि घोडे मात्र ठेविले. याचें कारण काय? तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, 'जेव्हां शाहानें मला घरीं येऊन भेट देण्याचा समारंभ केला, आणि माई राणी मजला भाऊ असें म्हणूं लागली, तेव्हां माझ्या दुष्ट मनोविकारांचा पगडा माझ्या विचारशक्तींवर बसूं लागला; आणि माझ्या मनांत दुर्गुण आणि सद्गुण यांचा असा मोठा झगडा सुरू झाला कीं, बादशाहाच्या देखत सुद्धां माझें मन व्यग्र झालें. तेव्हां शाहानेंही माझ्या मनांत काळजी उत्पन्न होण्याचें कारण विचारिलें. तेव्हां माझी तब्यत ठीक नाहीं, असें ढोंग करणें मला भाग पडलें. तेव्हां मला विश्रांति घेण्यास सां

या प्रसंगीं विजयी सरदाराचा मान करण्याकरितां तिनेंही आपलें नेहमीचें व्रत सोडिलें असावें असें दिसतें.

**खुष कदम** ज्यास आतां **कीश्वरखान** हा किताब मिळाला, त्याजकडे पूर्वी दाभोळ आणि कोल्हार ही ठाणीं होतीं.

गून शाहा महालांत परत गेला. म्हणून वाईट कृत्यें करण्याकरितां मोह घालण्यास कारण जी संपत्ति ती मी देऊन टाकिली. विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां मीं आपलीं पुस्तकें ठेविलीं. मजजवळ जे हत्ती व घोडे आहेत ते शाहाचे असें मी समजतों, व ते मला कांहीं काळपर्यंत फक्त उपयोगाकरितां दिले आहेत.'

यापुढें गवान नेहमीं साधा पोषारव घालूं लागला, आणि राज्यकारभाराचें काम करून जेव्हां फुरसत मिळे, तेव्हां आपल्या मशिदींत व पाठशाळेंत जाई, व आपला काळ गुणानें व आचरणानें श्रेष्ठ अशा विद्वान् मौलवी व काजी यांच्या बरोबर भाषण करण्यांत घालवी. शुक्रवारीं रात्रीं शहरच्या निरनिराळ्या रस्त्यांतून वेष पालटून फिरे, आणि गरीब लोकांस भिक्षा घाली, व ती घालते वेळीं शाहानें पाठविली आहे असें सांगे. अशा प्रकारचें याचें निर्मळ वर्तन असतांही खटपटी, कारस्थानी व दुष्ट दक्षणच्या लोकांनीं या सद्गुणी प्रधानावरही लांच खाल्याचा आरोप आणून त्याचा अकालीं शेवट केला, ती हकीकत पुढें सांगण्यांत आली आहे.

ओरिसाच्या राजाचा चुलत भाऊ **अंबरराय** यानें हिजरीसन ८७६ या साली **महंमदशाहाकडे** अशी कागाळी केली कीं राजा मेल्यावर **मंगळराय** हा एक त्याचा दत्तक किंवा पाळीव पुत्र जातीचा ब्राम्हण असतां माझ्या हक्कास न जुमानतां सर्व राज्य त्यानें बळकाविलें आहे. जर शाहा माझा हक्क परत मिळविण्यास फौज पाठवून सहाय्य करतील तरमी शाहाचा ताबेदार होईन. ओरिसा प्रांत तसेंच राजमहेंद्री व कंडापिली हे प्रांतही हस्तगत करण्याचें महंमदशाहाच्या मनांत फार दिवस होतें. आपले हेतु सिद्धीस नेण्यास अंबररायाची ही विनंति अनुकूल आहे, असें त्यास वाटलें. **ख्वाजेखान महंमद गवान** याच्या सल्यानें **मलिक हसन बहिरी** यास **निजाम उल् मुल्क** हा किताब देऊन मोठ्या फौजेनिशी शाहानें तिकडे पाठविलें. ओरिसा प्रांताच्या सरहद्दीवर अंबरराय आपल्या फौजेनिशी येऊन त्यास मिळाला, आणि ते दोघे **मंगळरायावर** निघाले. **मंगळराया**चा पराभव करून अंबररायास त्याच्या वडिलोपार्जित राज्यावर स्थापन केलें. नंतर अंबररायास घेऊन **निजा-**

शाहा ओरिसाच्या राजावर फौज पाठवितो. इ. स. १४७१.

म उल् मुल्क कंडापिली आणि राजमहेंद्री घेण्यास निघाला. तीं दोन्हीं ठाणीं त्यानें घेतलीं; आणि त्याच्या बंदोबस्तास योग्य तितकी फौज ठेवून अंबररायास त्यानें आपल्या मुलखीं जाऊं दिलें, व स्वतः पुष्कळ लूट घेऊन आपल्या मुलखीं परत आला. या प्रसंगीं माई राणीच्या व गवानाच्या शिफारशीवरून सर्व तेलंगण प्रांताच्या सुभेदारीवर निजाम उल् मुल्कास कायम केलें. याच वेळीं दूरियारवानास इमाद उल् मुल्क हा किताब देऊन वऱ्हाडच्या सुभेदारीवर नेमिलें. आणि युसफ आदिलखानास राज्यांतील फार महत्वाचें ठाणें जें दौलताबाद तेथच्या सुभेदारीवर नेमिलें. आदिलखान हा गवानाच्या पदरच्या शिपायांपैकीं एक शिपाई होता. त्याच्या आंगीं अलौकिक गुण होते. म्हणून गवानानें त्यास पुत्रवत् मानिलें होतें. आदिलखानाच्या हुशारीवर विश्वास ठेवून अंतूर आणि अजुंटा या दोहोंमध्यें असलेला वीरगड (वोशगड) किल्ला घेण्यास त्यास पाठविलें. याचप्रमाणें माळव्याचा सुलतानानें स्वारी केली तेव्हां अंतूर परगणाही एका मराठे सरदाराच्या हातीं गेला होता, व तो योग्य रीतीनें हुजूरची ताबेदारी मानीत नसे, म्हणून तोही परगणा यास घेण्यास सांगितलें. आदिलखान दौलताबादेस पोहोंचल्यावर त्यानें कासिमबेग सब शिरवन यास अंतुरावर पाठविलें, आणि दूरियारवानास नीरगडावर पाठविलें. अंतुरच्या मराठे सरदारानें जीवदान देण्याच्या वचनावर हात न उचलतां परगणा स्वाधीन केला. परंतु वीरगडचा राजा ६ महिनेपर्यंत वेढा घालणाऱ्या फौजेशीं लढत राहिला. इतका काळ गेल्यावर कोणीकडून कुमक मिळण्याची आशा नाहीं, असें पाहून त्यानें आदिलखानास असा निरोप पाठविला कीं, जर मला आपल्या कुटुंबासह जिवंत सोडाल, तर किल्ला व त्यांतील सर्व चीजवस्त आपणास नजर करितों. आदिलखानानें या शर्ती कबूल करून दूरियारवानास हुकूम पाठविला कीं;

निजामउल्मुल्कास तेलंगणची सुभेदारी मिळते.

खानदेशांतील किल्ले घेण्यास आदिलखानास पाठवितात.

+ या प्रसिद्ध सरदाराकडे दौलताबादची सुभेदारी होती. परंतु त्याजकडे हालीं आणखीं कामें सांगितलीं होतीं. असें दिसतें. जो किल्ला आणि मुलूख युसफ आदिलखानाच्या ताब्यांत दिला, तो सर्व प्रांताचा एक लहानसा भाग होता.

तेथच्या सर्व लोकांस उपद्रव न देतां निघून जाण्यास परवानगी द्यावी. त्याप्रमाणें **बिजिसिंगराय** आपलें कुटुंब व लोक घेऊन आपल्या वंशजांचें हें प्राचीन ठिकाण सोडून निघाला. परंतु किल्यांतील सर्व खजिना व वडिलोपार्जित जिंदगी मुसलमानांस दिली. आदिलखान टपाल ठेवून छावणींत आला, आणि त्याच दिवशीं सर्व चीजवस्त व द्रव्य त्यानें आपल्या ताब्यांत घेतलें. नंतर त्या प्रदेशांतील मुख्य रहिवाशी व शेतकरी यांस कोणत्याही तऱ्हेची इजा न करितां तुमचें रक्षण करूं असें खात्रीपूर्वक सांगून त्यांचीं मनें शांत केलीं. तेथून **रांजणी**+ (राजणगांव) चा किल्ला घेण्यास निघाला. येथील राजाचा बाप नुकताच वारला होता. त्याचा मुलगा जीव वांचविण्याच्या करारावर शरण आला. **युसफ आदिलखानानें** शाहाच्या उपयोगास योग्य असे हत्ती, घोडे व कांहीं चिजा निवडून किल्ला व परगणा राजा **अमरसिंग** यास परत दिला, व त्यास बाहेदारीखालीं घेतलें. **आदिलखान** आतां अमदाबाद बेदरास परत गेला, व शाहापुढें अशा द्रव्याच्या रकमा व जवाहीर ठेविले, व असे उमदे घोडे नजर केले कीं, राजमहेंद्री आणि नवलगुंद येथें जी मौल्यवान् लूट मिळाली, ती यापुढें कांहींच नाहीं, असें दिसलें. **महंमदशाहानें युसफ आदिलखानाचा** मोठा सत्कार करून त्यास आणखी मोठे किताब दिले. ज्याचा दत्तक बाप गवानासारखा पुरुष आहे, तो महत्वाची नोकरी करण्यास कधीं चुकणार नाहीं, असें शाहा त्यास म्हणाला. **आदिलखानास** एक आठवडा आपल्या घरीं ठेवून मोठ्या थाटानें मेजवानी करण्यास या प्रसंगीं शाहानें **महंमद गवानास** सांगितलें. तेव्हां गवान म्हणाला कीं, शाहांची स्वारी आल्याशिवाय मेजवानीची सांगता होणार नाहीं. दुसऱ्या पाहुण्याकरितां केलेल्या मेजवानींत मी वांटेकरी होणार नाहीं. परंतु **आदिलखानाची** मेजवानी समाप्त झाल्यावर मी तुझ्या येथें एक आठवडा येऊन राहीन, असें **महंमदशाहानें** वचन दिलें.

युसफ आदिलखान काम फत्ते करून येतो. व शाहा त्याचा सत्कार करितो.

त्याप्रमाणें आठव्या दिवशीं **महंमदशाहा** गवानाच्या वाड्यांत गेला, व तेथें त्यानें एक आठवडा मोजेंत घालविला. यावेळीं त्यानें यु-

+ हें याच नांवच्या प्रांताचें मुख्य शहर आहे.

सफ आदिलखानासही आपल्याबरोबर दारू पिण्याचा मान दिला, या-प्रसंगीं गवानानें अलौकिक थाटानें शाहास मेजवानी केली इतकेंच नाहीं, तर त्यानें रत्नजडित शुद्ध सोन्याचीं ५० ताटें शाहास नजर केली. त्यापैकीं प्रत्येक ताट एवढें मोठें होतें कीं, त्यांत एक कोंकरूं राहूं शकेल. शिवाय सर्क्याशिया, जार्जिया, आणि अबिसिनिया येथील गाण्याबजावण्यामध्यें निष्णात असे १०० गुलाम, अबिसिनिया, सिरिया आणि आशिया मैनर येथील १०० सुंदर घोडे, आणि फक्त राजेलोकांच्या वाड्यांत दृष्टीस पडणारीं अशीं सुंदर व उत्तम १०० चिनी ताटें, शाहास नजर दिलीं. शेवटल्या दिवशीं शाहाच्या मुलांस व दरबारच्या इतर लोकांसही मोठ्या देणग्या दिल्या. नंतर आपल्या जिनगीची यादी करून तीही त्यानें शाहास नजर केली, आणि सर्व ताब्यांत घेण्याविषयीं त्यानें विनंति केली. **महंमदशाहानें** हा मान मोठ्या गौरवानें घेऊन जेंजें त्यानें दिलें होतें तें सर्व पुनः गवानास शाहानें दिलें. **महंमदगवान** आणि **युसफ आदिलखान** यांचें वजन यापुढें इतकें वाढलें कीं, सर्व सरदार त्यांचें आर्जव व हांजी हांजी करूं लागले, आणि कित्येक हेवाही करूं लागले. दुखावलेल्या सर्पाप्रमाणें दक्षणी लोक मत्सरानें चूर होऊन सर्वांनीं मिळून त्याचा नाश करण्याचा निश्चय केला.

हिजरी सन ८७७ या सालीं विजयानगरच्या राजाच्या फुशीवरून बेळगांव किल्ल्याचा राजा **वीरकर्णराय** गोवें बेट परत घेण्याकरितां निघाला. त्याच्या कुमकेस बंकापूरचा हिंदु राजाही निघाला. **महंमद-**

---

+ प्रधानानें दिलेल्या देणग्या ग्रहण न करणें म्हणजे शाहास मोठें अनुचित दिसलें असतें. हिंदुस्थानांत नजर न घेणें म्हणजे बेअदबी केल्यासारखें समजतात, आणि त्याचा अर्थ असा करितात कीं; नजर घेण्याजोगी नव्हती; व नजर देणारा लायख माणूस नव्हता. या करितां सरकारी कामगारांमध्यें फड फर्मास व नजरा घेणें व देणें या केवळ सरकारी रिवाजाच्याच गोष्टी झालेल्या आहेत. जेथें युरोपियन अंमलदार आहेत; तेथें जरी हा रिवाज मागें पडत चालला आहे, तथापि जोंपर्यंत एतद्देशीय राजांचीं दरबारें आहेत आणि जोंपर्यंत ते आपले पुरातन रीतरिवाज सोडणार नाहींत, तोंपर्यंत ही पद्धत अगदीं नाहींशी होणार नाहीं.

शाहास ही बातमी समजतांच तो आपली फौज घेऊन बेळगांवांकडे निघाला. हा किल्ला मोठा मजबूत असून त्याच्या सभोंवार खोल खंदक होता, व किल्ल्यांत जाण्याची जी एकच वाट होती. तीही तटांनीं व बुरजांनीं मजबूत केलेली होती. या किल्ल्यास शाहानें वेढा घातला. **वीरकर्ण** रायानें दूरवर विचार करून **महंमदगवाना**कडे तहाचें बोलणें चालविण्याकरितां गुप्तपणें लोक पाठविले. आपलें सामर्थ्य किती आहे हें दाखविण्याकरितां व दुसऱ्या किल्लेदारांनीं असें वर्तन पुनः करूं नये, म्हणून **महंमदशाहा**नें छापा घालून किल्ला घेण्याचा निश्चय केला. तोफखान्यावरील लोकांस १४ दिवसांचे आंत किल्ल्यांत शिरण्याजोगें किल्यास खिंडार पाडण्याचा हुकूम दिला, आणि **महंमदगवाना**कडे खंदक भरण्याचें काम सांगितलें; आणि म्हणाला कीं तोफांनीं तटास खिंडार पडतें तों फौज जाण्याजोगा खंदक भरून निघाला पाहिजे. गवान दिवसा पुष्कळ लांकडें व माती खंदकांत टाकी, परंतु रात्रीं ती सर्व शत्रू काढून टाकीत. याप्रमाणें कांहीं दिवस क्रम चालल्यावर जमिनीखालून खोदून सुरुंग लावावे, आणि तट पाडावा असा त्यानें विचार केला. दक्षणेंत अद्यापपर्यंत या युक्तीचा उपयोग कोणी केला नव्हता. पाण्यानें भरलेल्या खंदकावर पूर्ण विश्वास ठेवून किल्यास भय नाहीं, अशा घमेंडींत **वीरकर्णराय** स्वस्थ राहिला. तेव्हां एकाएकीं **महंमद गवान, आदिलखान** आणि **इमाद उल् मुल्क** या तिघांच्या छावण्यांतून ३ सुरुंग उडाले, आणि तटास तीन ठिकाणीं खिंडारें पडलीं. **वीरकर्ण रायाची** फौज लागलीच त्या ठिकाणीं बंदोबस्तास गेली, आणि मोठ्या शौर्यानें लढली. त्या छाप्यांत शाहाचे २००० लोक पडले. किल्ल्यांतील लोकांनीं तिन्ही ठिकाणचीं खिंडारें दगड व माती यांणीं भरून दुरुस्त केलीं. इतक्यांत **महंमदशाहा**नें पुढें सरून हल्ला केला, आणि शत्रूस मागें हटवून तटानजीक आला. नंतर किल्ल्यावर हल्ला करीत असतांच **वीरकर्णराजा** वेष पालटून शाहाच्या हुजऱ्यांकडे आला, आणि राजाकडून कांहीं निरोप घेऊन आलों आहें; तर शाहास मला भेटवावें, अशी त्यानें त्यांस विनंति केली. शाहाची भे-

शाहा पश्चिमेकडे कुच करितो. इ. स. १४७२.

शाहा बेळगांव किल्ला घेतो.

---

+ या किल्ल्यांत हल्लीं ब्रिटिशसरकारची फौज आहे. आणि त्या प्रदेशांत बळकट, मुख्य किल्ल्यांत याची गणना आहे.

ट होतांच त्यानें आपल्या गळ्या भोवतीं पागोटें गुंडाळून आपण कोण हें शाहास सांगितलें, आणि म्हणाला कीं, हुजूरच्या चरणापाशीं कुटुंबासह आश्रय मागण्याकरितां आलों आहें. या प्रमाणें नम्रपणा व आपल्यावर ठेवलेला विश्वास पाहून **महंमदशाहा** खुष झाला, आणि त्यानें दरबारच्या बडेलाकांत वी[illegible]ास घेतलें. या प्रमाणें लढाई थांबतांच शाहा किल्यांत शिरला, आणि यश आल्याबद्दल त्यानें अल्लाचे आभार मानिले. बेळगांवचा किल्ला व त्याखालील मुलूख **महंमदगवाना**च्या सरंजामांत दाखल करून शाहा राजधानीस परत आला. या स्वारींत माईराणी आपल्या मुलाबरोबरच होती, आणि तिचा शाहाणपणा राज्याच्या भरभराटीस बऱ्याच अंशीं कारण होता. या स्वारींतून परत येत असतां मार्गीतच ती मरण पावली. तेव्हां शाहानें तिचें मेत मोठ्या थाटानें दफन करण्याकरितां अमदाबाद बेदरास पाठविलें.

माई राणी मरण पावते.

विजापूरशहरीं फौज येऊन पोहोंचली. तेव्हां **खाजेखान महंमद गवाना**च्या विनंतीवरून थकवा घालवून विश्रांति घेण्याकरितां **महंमद शाहा** तेथें राहिला आणि आई वारल्यामुळें जें त्यास दुःख झालें होतें, त्याचें शांतवन करण्यास गवानानें यत्न केला. विजापूरच्या रमणीय ठिकाणाची शाहानें फार तारीफ केली, व सर्व बरसात घालविण्याकरितां येथेंच राहावें, असें त्यास वाटलें. परंतु त्या सालीं सर्व दक्षणेंत असें भयंकर आवर्षण पडलें कीं, विजापूरच्या सर्व विहिरी ठणठणीत कोरड्या पडल्या. यामुळें शाहास आपल्या इच्छेविरुद्ध अमदाबाद बेदरास सैन्य घेऊन जाणें भाग पडलें. दुसऱ्या वर्षींही पर्जन्य पडला नाहीं. त्यामुळें गांवाचीं गांवें ओस पडलीं. पुष्कळ लोक अन्नावांचून मेले; आणि पुष्कळ माळवा, जाजनगर, आणि गुजराथ या प्रांतीं गेले. तेलंगण, मान्हट (महाराष्ट्र) आणि सर्व बाह्यमिनी राज्यांत दोन वर्षेपर्यंत कोणी एक दाणासुद्धां पेरला नव्हता. तिसऱ्या वर्षी जेव्हां पर्जन्यवृष्टि झाली तेव्हां जमिनीची लागवड करण्यास कोणी शेतकरीच उरले नव्हते.

दक्षणेंत भयंकर दुष्काळ.

हा भयंकर दुष्काळ गेल्यावर देशांत नुकती वसाहत होऊं लागली होती. इतक्यांत अशी बातमी आली कीं, कंडापिलीच्या रक्षक फौजेनें

बंड केलें, व सुभेदारास ठार मारिलें. तेथील लोकांची जिनगी लुटली, आणि किल्ला **भिमराज** ओरिसा प्रांताचा राजा याच्या स्वाधीन केला. हा **भिमराज** आरंभीं **महंमदशाहा**च्या आश्रयानें मोठ्या पदवीस चढला होता. परंतु किल्ला हातीं लागतांच ओरिसा प्रांताच्या राजाकडे वकील पाठवून भिमराजानें त्यास असें कळविलें कीं; वडिलोपार्जित तेलंगणचें राज्य हस्तगत करण्याची इच्छा असल्यास हीच संधि आहे. कारण दक्षणेंत दोन वर्षें दुष्काळ पडल्यामुळें दक्षणचे लोक हवालदील झाले आहेत, व फौजेची संख्या फार कमी झाली आहे; आणि मुसलमानापासून जो मुलूख जिंकाल त्यांत मला वांटा दिल्यास व कंडापिली प्रांत व किल्ला तूर्त माझ्या ताब्यांत ठेवण्यास कबूल असल्यास मीही आपल्या फौजेनिशी तुमच्या कुमकेस येईन. ही संधि बरी आहे, असा ओरिसाच्या राजानें विचार करून १०,००० स्वार व ८,००० पायदळ इतकी फौज जमविली, आणि **जाजनगर**च्या राजास कुमकेस बोलावून विलंब न लावितां तेलंगण प्रांतांत शिरला. राजमहेंद्रीचा सुभेदार **निजाम उल् मुल्क** यास अशा मोठ्या सैन्याशीं टक्कर मारितां येईना. म्हणून किल्ल्याचे दरवाजे बंद करून तो आंत राहिला, व सर्व हकीगत त्यानें हुजूर लिहून कळविली.

कंडापिली येथें बंड.

**महंमद गवाना**च्या सल्ल्यावरून **महंमदशाहा**नें हिंदूवर स्वतः स्वारी करण्याचा निश्चय केला. फौजेंतील लोकांस एक वर्षाचा पगार आगाऊ देऊन जितकी त्वरा करितां आली, तितकी करून शाहा निघाला. राजमहेंद्रीपाशीं पोहोंचल्यावर मैदानांत सामना करण्यास शत्रू येईनात. **भिमराज** कंडापिलीच्या किल्ल्यांत जाऊन बसला, आणि ओरिसाचा राजा राजमहेंद्रीजवळील नदी उतरून आपल्या मुलखाकडे मागें हटला. कांहीं आगळिकीवांचून कज्जा उपस्थित केल्याबद्दल शाहास फार राग आला, आणि त्यानें **महंमद गवाना**स शाहाजादा **महंमुदखान** यासहवर्तमान राजमहेंद्री येथें ठेवून बंडखोर हिंदूंची खोड मोडण्यासाठीं २०,००० स्वारांनिशी शाहा पुढें गेला. हिजरी सन ८८२ च्या अखेरीस ओरिसा प्रांताच्या राजधानीपर्यंत मुलूख सर करीत जाऊन पोहोंचला.

शाहा स्वतः बंड मोडण्यास जातो.

शाहा ओरिसा प्रांताचा मुलूख घेतो. हि. सन ८८२ इ. स. १४७७.

मार्गांत दया माया न करितां लोकांची कत्तल उडविली, व देशही उध्वस्त केला. राय आपल्या मुलखाच्या दुसऱ्या टोंकाकडे फौज घेऊन गेल्यामुळे मुसलमानांस मन मानेल तें करण्यास सवड मिळाली, व त्यांनीं लोकांपासून खंड घेतला. शेवटीं गवान आणि आपला पुत्र महंमूद यांस बोलावूनत्यां जकडून प्रांतांत अम्मल बसवावा, आणि हा सर्व जिंकलेला मुलूख आपल्या राज्यास कायमपणें जोडावा असा शाहानें निश्चय केला.

हा शाहाचा बेत ऐकून ओरिसाच्या राजानें हत्ती व दुसऱ्या मौल्यवान् चिजा नजर देऊन शाहाकडे वकिलांस पाठविलें; आणि असें कळविलें कीं, या प्रसंगीं शाहा मला माफी करितील, तर तेलंगणच्या जमेदारांस यापुढें कधींही सहाय्य करणार नाहीं, अशी मी शपथ वाहतों. यास शाहानें असें उत्तर पाठविलें कीं, ओरिसा प्रांताचा माजी राजा याजकडे असलेल्या हत्तीपैकीं जे मागूं ते २५ हत्ती द्याल तर तह करूं. या हत्तींचें मोल आपल्या जिवाहून विशेष असें जरी राय समजत होता, तथापि हें शाहाचें मागणें नाकबूल करण्याची ही वेळ नव्हती. म्हणून त्या हत्तींवर उंची पोषाख घालून व सोंडांमध्यें सोन्या रुप्याच्या सांखळ्या देऊन राजानें शाहाकडे पाठविले. याप्रमाणें तह झाल्यावर ओरिसा प्रांतांतून शाहा परत निघाला.

ओरिसा प्रांताच्या राजाशीं तह.

परत येत असतां मार्गांत कांहीं अंतरावर शाहा वाट सोडून शिकारीस गेला होता. तिकडे एका उंच टेंकडीवर एक किल्ला त्याच्या दृष्टीस पडला. तो पाहण्याकरितां नजीक गेला, आणि तेथच्या लोकांस विचारिलें. कीं, हा कोणाच्या ताब्यांत आहे. त्यांनीं उत्तर दिलें कीं, हा ओरिसा प्रांताच्या राजाचा किल्ला असून हा जिंकण्याकरितां कोणाची नजर फेंकण्याचीसुद्धां छाती होणार नाहीं. हे शब्द ऐकतांच शाहाचें मस्तक खवळलें, आणि त्या टेंकडीच्या पायथ्याशीं त्यानें मुक्काम करून दुसरे दिवशीं किल्ल्यास वेढा दिला. दीड महिनापर्यंत वेढा पडला, तरी किल्ला हातीं लागण्याचा रंग दिसेना. परंतु इतक्यांत ओरिसाच्या रायानें आपल्या प्रजेच्या उद्धट शब्दांकरितां माफी करण्याविषयीं विनंति लिहिली, आणि असें कळविलें कीं, “ खेडेगांवच्या शेतकरी लोकांस सभ्यपणाव रीतरिवाज माहीत नसल्यामुळें त्यांच्या हातून असा गुन्हा घडला. किल्ला जिंकून शाहानें आपल्या ताब्यांत घेतला, व मी जो हुजूरचा ताबे-

दार मांडलिक यास दिला." असें शाहानें समजावें, अशी आणखी विनंति लिहिली. ही मोठ्या हिकमतीनें मागितलेली माफी ऐकून शाहा फार खुष झाला, आणि वेढा उठवून पुढें गेला.

तेथून पुढें गेल्यावर **महंमदशाहा कंडापिली** किल्यास वेढा घालून बसला. सुमारें सहा महिने वेढा पडला तरी **भीमरायानें** दाद दिली नाहीं. तथापि शेवटीं फार त्रासून त्यानें माफी मागितली, तेव्हां कांहीं सरदारांच्या मध्यस्थीनें त्यास माफी दिली. तेव्हां भीमरायानें किल्ला व शहर शाहाच्या हवालीं केलें. किल्ला पाहण्यास शाहा गेला. तेव्हां त्यानें तेथील एक हिंदूचें देऊळ पाडिलें, व पूजेसाठीं तेथें असलेल्या कांहीं ब्राम्हणांस त्यानें आपल्या हातानें ठार मारिलें. हें केवळ धर्मातील आज्ञा पाळण्याकरितां केलें. नंतर त्या देवळाच्या पायावर मशीद बांधण्याचा हुकूम दिला, आणि मशीद पुरी झाल्यावर व्यासपीठावर चढून थोडा निमाज पढला. आणि त्यानें फकीरांस भिक्षा वांटली, व आपल्या नांवानें खुतबा वाचण्याचा हुकूम केला. या प्रसंगीं कांहीं हिंदूंस शाहानें आपल्या हातानें मारिलें; म्हणून **गाझी** हा किताब धारण करण्याची योग्यता आली, असें गवानानें शाहास सांगितलें. त्या वेळीं त्यानें **गाझी** हा किताब घेतला, व त्याची त्यास मोठी मौटी वाटली. बाहामिनी घराण्यांतील पुरुषांपैकीं **महंमदशाहानेंच** ब्राम्हणांस+ ठार मारिलें होतें. हें कृत्य अमंगलकारक व अशुभ झालें अशी दक्षणीलोकांची श्रद्धा होती, आणि महंमदशाहास व त्याच्या घराण्यास पडती कळा लागून शेवटीं घराणें लयास गेलें, याचें कारण हेंच झालें; असें दक्षणी लोक पुढें म्हणूं लागले.

शाहा कंडापिली किल्ला घेतो, व हिंदूचें देऊळ पाडून कांहीं ब्राम्हणांस आपल्या हातानें ठार मारितो.

**महंमद गवानाच्या** सल्यानें **महंमदशाहा** राजमहेंद्री येथें जवळजवळ तीन वर्षे राहिला. जिंकलेल्या प्रांतांत त्यानें कारभाराची शिस्त बसविली, आणि सरहद्दीवर लष्करी ठाणीं बसवून बंदोबस्त केला. सर्व शि-

---

+ या घराण्यानें बाहामिनी म्हणजे ब्राम्हणी हें नामाभिधान धारण करण्याचीं कारणें वर सांगितलीं आहेत, तीं वाचकांच्या लक्षांत असतीलच. त्यावरून ब्रम्हहत्या करणें अशुभ आहे, असें दक्षणीलोकांस स्वाभावीकच वाटलें.

रजोर जमेदारांस हांकून देऊन सर्व तेलंगण प्रांत ताब्यांत घेतल्यावर **नरसिंगराया**चा मुलूख जिंकण्याचा शाहानें निश्चय केला, आणि तेलंगण प्रांतावर एक स्वतंत्र सुभेदार नेमणें झाल्यास कोणास नेमावें, याविषयीं गवानास सल्ला विचारिली. तेव्हां **निजाम उल् मुल्क बहिरी** याहून दुसरा योग्य पुरुष मला दिसत नाहीं, असें तो म्हणाला. शाहास ही त्यानें केलेली निवड पसंत पडून राजमहेंद्री, कंडापिली आणि दुसरीं गाणीं **निजाम उल् मुल्का**च्या ताब्यांत दिलीं. वरंगूळ व दुसरे प्रांत यांवर **अझिमखाना**स नेमिलें आणि शाहानें नरसिंगरायाच्या मुलखावर कुच केलें. आपल्या सुभेदारींत **अझिमखाना**स स्वतंत्र अधिकार मिळालेला पाहून **निजाम उल् मुल्कास** वाईट वाटलें. आणि आपल्या सुभेदारीवर आपल्या मुलांपैकीं एकास ठेवून हुजूरस्वारीबरोबर लढाईस यावें, अशी माझी इच्छा आहे, असा त्यानें शाहास अर्ज केला. जिंकलेल्या प्रांताचा बंदोबस्त रहावा, एवढाच आमचा हेतु आहे, आणि बंदोबस्त कोणाच्याही हातून झाला तरी आम्हांस फिकीर वाटत नाहीं, असा शाहानें त्यास जबाब दिला. **निजाम उल्मुल्क** अत्यंत महत्वाकांक्षी आहे, असें पाहून त्याबरोबर शाहाचा मुलगा **मलिक अहंमद** यानें एकाच प्रांतीं रहावें, हें गवानास योग्य वाटलें नाहीं. कारण **मलिक अहंमदा**नें शाहाच्या जनानखान्यांतील एका स्त्रीशीं नुकतेंच लग्न केलें होतें, आणि आपल्या बापापेक्षांही त्याची थोर नजर व महत्वाकांक्षा होती. यास्तव जेव्हां **निजाम उल्मुल्कास** राजमहेंद्रीच्या सुभेदारीवर नमिलें, तव्हांच शाहास सांगून **खोदवंदखान** हबशी याच्या हाताखालीं मलिक **अहंमदास** नेमून ३,००० स्वारांची सरदारी दिली, व माहूर प्रांतांत त्यास सरंजाम दिला होता. परंतु **निजाम उल् मुल्कानें** प्रस्तुत केलेला अर्ज शाहानें मान्य करून निजामाचा पुत्र **मलिक अहंमद** यास हुजूर बोलाविलें, आणि त्यास १०,००० स्वारांची सरदारी देऊन राजमहेंद्रीस आपल्या बापाच्या बदला त्याचा नायब म्हणून काम करण्यास परवानगी दिली.

**नरसिंगराय** हा मोठा बलाढ्य राजा असून कर्नाटक आणि तेलंगण+ या दोहों प्रांतांमध्यें त्याचा मुलूख होता. समुद्र किनारीं त्यांच्या मुलखाचा

---

+ या प्रदेशास पूर्वी युरोपीयन लोक नरसिंग रायावरून नरसिंग देश असेंच म्हणत.

विस्तार मच्छली पट्टणा (माशांचें शहर) पर्यंत असून यानें विजयानगरच्या राज्यांतील कांहीं प्रांत व कांहीं बळकट किल्ले जिंकून घेतले होते. यानें राज्याच्या सरहद्दीवरील जमेदारांस बंड करण्यास चिथावून दिलें होतें, व सरहद्दीवरील कामगारांस यांची खोड मोडण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें त्यांनीं यांच्या वर्तनाबद्दल अनेकवेळां हुजूर कागाळ्या कळविल्या होत्या. यामुळें शाहानें त्यावर इल्ला करण्याचा आतां निश्चय केला.

शाहाची नरसिंगरायावर स्वारी.

या स्वारीच्या आरंभीं एका पडक्या किल्यावरून जात असतां हा किल्ला कोणी बांधिला होता, याविषयीं तपास करितां सरहद्दीवरील लोकांवर दरारा बसविण्याकरितां दिल्लीच्या बादशाहानें हा किल्ला बांधिला असें कळलें. तेव्हां शाहानें तेथें मुक्काम करून विलंब न लावितां किल्याची दागदुजी करण्यास हुकूम दिला. तें काम गवानानें इतक्या झपाट्यानें केलें कीं, ज्या कामास एरवीं दोन वर्षें लागलीं असतीं, तें काम अवघ्या सहा महिन्यांतच आटपलें. नंतर किल्यांत गडकरी ठेविले, व सर्व प्रकारची सामुग्रीही भरिली. या प्रमाणें हें काम एवढ्या अल्प काळांत समाप्त झालेंसें पाहून महंमदशाहा म्हणाला कीं, अल्लानें उदार होऊन मला दोन मोठ्या अपूर्व गोष्टी दिल्या आहेत. (१) मोठें विस्तीर्ण राज्य आणि (२) महंमद गवाना साररवा नोकर. असें म्हणून त्यानें आपल्या आंगावरचा झगा काढून गवानाच्या आंगावर टाकिला, आणि त्याचा झगा घेऊन आपल्या आंगांत घातला. याप्रमाणें राजानें प्रजेचा एवढा मोठा सन्मान केल्याचें उदाहरण इतिहासांत कोठें आढळणार नाहीं. परंतु अत्यंत मर्जी बसली म्हणजे अविश्वास व इतराजी हीं उत्पन्न होण्यास आणि कधीं कधीं नाशासही कारण होतें; व त्या प्रमाणेंच महंमद गवानावर प्रसंग घडला, असें पुढील वर्णनावरून समजेल.

आपल्या पिछाडीच्या रक्षणार्थ या किल्यापाशीं ३,००० स्वार ठेवून महंमदशाहानें पुढें कूच केलें. जेथें जेथें तो गेला तेथें तेथें मुलूख लुटून उध्वस्त करूं लागला. आणि जे लोक अटकाव करण्यास येत त्यांस ठार मारीत असे. कंडापिली येथें येऊन पोहोंचल्यावर त्यास तेथच्या लोकांनीं अशी खबर दिली कीं, येथून १० दिवसांच्या मु-

कामावर कांची+चें देऊळ आहे. त्या देवळाच्या भिंती व छत सोन्याच्या पत्र्यांनीं मढविलेलें आहे, व त्यांवर हिरे माणकांचें नक्षी काम केलें आहे. परंतु अद्याप कोणी मुसलमान शाहानें तें पाहिलें नाहीं, व त्याचें नांवही ऐकिलें नाहीं. तेव्हां महंमदशाहानें आपल्या बरोबर उत्तम निवडक ६,००० स्वार घेऊन व बाकी फौजेस कंडापिली येथें ठेवून मोठमोठे मुक्काम करीत कांचीस निघाला. शेवटल्या दिवशीं तो इतक्या त्वरेनें चालला कीं, त्या दिवशीं त्याबरोबर फक्त ४० स्वार मात्र टिकले, आणि त्यांत निजाम उल् मुल्क आणि युरिशरवान तुर्क हे होते. शाहा देवळानजीक जातांच कित्येक हिंदु अटकाव करण्यास पुढें आले. त्यांत एक धिप्पाड मनुष्य घोड्यावर बसून कोणाची पर्वा न करितां तरवार चमकवीत भरधांव घोडा सोडून शाहाच्या आंगावर धांवला, आणि शाहावर त्यानें वार रोखला. परंतु शाहानें तरवारीच्या घावासरशी त्याचे दोन तुकडे करून सोडले. तेव्हां दुसऱ्या हिंदूंनीं शाहावर हल्ला केला, आणि शाहाबरोबरच्या छोट्या टोळीची लौकरच हात घाई सुरू झाली. परंतु यावेळींही महंमदशाहानें सुदैवानें आंगावर चालून आलेल्या हिंदूंस ठार मारिलें. तेव्हां बाकीचे हिंदू देवळांत पळून गेले. नंतर मधमाशांच्या थव्यासारखे लोकांचे थव्याचे थवे देवळांतून बाहेर येऊन देवळाच्या भिंतीनजीक रक्षण करण्याकरितां तयारीनें उभे राहूं लागले. शेवटीं शाहाची बाकी फौज येऊन पोहोंचली. नंतर देवळावर हल्ला करून मुसलमानांनीं एका छाप्यांत देऊळ घेतलें, व मोठी कत्तल उडविली. देवळांत त्यांस मोठी लूट मिळाली. त्यापैकीं त्यांनीं फक्त सोनें, रुपें आणि जवाहीर मात्र घेतलें, व हेंही विपुल होतें. नंतर शाहानें कांचीशहर लुटलें, आणि तेथें ८ दिवस राहून आपल्या मोठ्या सैन्यास येऊन तो मिळाला.

शाहा कांचीवर हल्ला करून हिंदु देवळाचा नाश करितो.

हा फायदेकारक पराक्रम केल्यावर महंमदशाहानें मलिक हसन निजाम उल् मुल्क*, युसफ आदिलखान आणि फकीर उल् मुल्क

---

\+ कांजी व्हेरम

* जरी या वाक्यावरून मलिक हसन निजाम उल् मुल्क (दक्षणी) ही (पु-चा-)

यांस दौलताबाद आणि जुन्नर येथील फौजांमधील सुमारें १५०००, फौज देऊन **नरसिंगराया**वर पाठविलें. आणि शाहा स्वतः मच्छलीपट्टण या बंदरावर गेला, आणि तें बंदर व त्याखालील मुलूख जिंकून शाहा कंडापिलीस परत आला. याच समयीं **महंमद गवाना**वर शाहाची अत्यंत मर्जी बसल्यामुळें **निजाम उल् मुल्क, झरीप उल् मुल्क** व दुसरे कामगार हे गवानाचा फार हेवा करूं लागले. त्यांनीं शाहाची यावेळीं स्वारी एकटी आहे असें पाहून शाहाच्या खवानगी नोकरांस लांच दिली, आणि त्यांस गवानाची निंदा करण्यास व त्याचें उणेपण शाहाच्या नजरेस आणण्यास सांगितलें. संधि सांपडेल तेव्हां प्रधानाच्या महत्वाकांक्षेच्या बेताविषयीं शाहाच्या मनांत विपरीत भरून देण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. हुजूर वसुलाचीही अफरातफर गवानानें केली आहे. असाही आरोप त्यांनीं त्यावर आणिला. शेवटीं एक पत्र बनावट करून त्याचा नाश करण्याचें नीच कृत्य केलें. याची कच्ची हकीकत सांगण्यापूर्वी या सरदारांस गवानाचा नाश करण्याचा कट करण्यास काय कारणें झालीं तीं सांगणें जरूर आहे.

**महंमद गवाना**च्या कारकीर्दींत राज्याचा विस्तार इतका वाढला कीं, **अल्लाउद्दीन शाहा कांगो** यानें केलेल्या कायद्यांमध्यें अनेक फेरफार करणें गवानास योग्य व जरूर वाटलें. कारण ते कायदे, नियम व त्यानें केलेली व्यवस्था छोट्याशा राज्यास योग्य होती. असें करण्याची फार जरूरी आहे, अशी शाहाची खात्री करितांच त्यानें गवानास तसें करण्यास परवानगी दिली. पूर्वी सर्व राज्याचे चार विभाग किंवा तर्फा करून त्यांवर ४ सुभेदार किंवा **तरफदार** यांच्या नेमणुका करीत. आतां सर्व राज्याचे ८ विभाग करून त्यांवर ८ सुभेदार नेमिले. वऱ्हाड प्रांताचे २ सुभे केले. एका गावळ सुभ्यावर **फत्तेउल्ला इमाद उल्मुल्क** यास नेमिलें, आणि दुसऱ्या माहूर सुभ्यावर **खोदवंदखान हबशी** यास नेमिलें. दौलताबाद सुभ्यावर

महंमद गवानाचे कायद्यांमध्यें फेरफार.

---

गेला, असें स्वाभाविक दिसतें, तरी फौज मुख्यत्वें परदेशियांची होती, व दौलताबाद आणि जुन्नर येथील पथकें होतीं असें लिहिलें आहे, त्या संदर्भावरून फौजेबरोबर निजाम गेला नाहीं, हें खचित दिसतें.

युसफ आदिलखानास नेमिलें, आणि जुन्नरापासून अलीकडील वांई, इंदापूर, माण, तसेंच गोवें आणि बेळगांव या सर्वांचा एक सुभा करून त्यावर फकीर उल् मुल्क यास नेमिलें. विजापूर, भीमेच्या कांठचा मुलूख, रायचूर व मुद्गल या किल्ल्यांचा एक सुभा करून तो गवानानें आपल्याकडे ठेविला. अहसनाबाद, कलबुर्गे, सागर, नळदुर्ग, आणि सोलापूर वगैरेचा एक सुभा करून त्यावर दस्तुर दिनार या नांवाच्या हबशी खोजास नेमिलें. तेलंगणचा सर्व प्रांत त्यावेळीं निजाम उल् मुल्क बहिरी याच्या ताब्यांत होता. त्याचेही दोन विभाग करून राजमहेंद्री, मच्छली पट्टण, बिलकोंडा, ओरिसा, इत्यादि परगणे त्याच्या ताब्यांत ठेविले. आणि वरंगूळच्या सुभ्यावर अझिमखानास नेमिलें. या आठही तर्फांमध्यें शाहाच्या खानगी खर्चाकरितां कांहीं गांवें राखिलीं असून त्याच्या वसूल वासलाच्या वहिवाटीकरितां हुजूरून कारकून नेमले जात.

अल्लाउद्दिनशाहाच्या वेळेपासून हा वेळ पर्यंत ज्या त्या सुभ्यांतील किल्ले सुभ्यावरच्या तरफदाराच्या ताब्यांत राहून ते त्यांवर आपल्या मर्जीप्रमाणें किल्लेदार व गडकरी नेमीत. यामुळें सुभेदार कधीं कधीं बंडें करीत, आणि सर्व किल्ल्यांतील फौज त्यांच्या मुठींत असल्यामुळें बंडें मोडण्यास प्रयास पडत. नव्या नियमाप्रमाणें प्रत्येक सुभ्यांतील एकच किल्ला सुभेदाराच्या ताब्यांत असावा, व त्यावर त्यानें मर्जीस आल्यास राहावें. बाकी सर्व किल्ल्यांवर कामगार व फौज यांची नेमणूक थेट हुजूरून व्हावी. फौजेस पगार देण्याच्या पद्धतींतही फेरफार केले. पूर्वी ५०० स्वारांवरील उमरावाचें वेतन एक लाख होन+, आणि १,००० स्वारांव-

---

+ होनाची किंमत ३½ रुपये होती म्हणून ५०० स्वार ठेवण्याकरितां पूर्वी ३,५०,००० रुपये मिळत. त्यांपैकीं सुमारें ⅒ रकम वसूल करण्यास व सुभ्यामध्यें बंदोबस्त ठेवण्यास खर्च होई. तो खर्च वजा करितां केवळ स्वारांच्या खर्चाकरितां ३,१५,००० रुपये रहात. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारच्या रक्षणार्थ इतकेच स्वार ठेवण्याकरितां जी रकम हाल्लीं खर्च होते, त्याच्या दीडपट ही रकम होती. याजवरून इंग्रजी अमलांत शिपायांस व स्वारांस जीं वेतनें मिळतात त्यांहून फार मोठीं वेतनें बाहामिनी राज्यांत देत असत, असें स्पष्ट दिसतें. होनाची हाल्लीं किती किंमत आहे, हें मनांत आणिलें असतां फारच मोठीं वेतनें मि-(पु-चा-)

रील उमरावाचें दोन लाख होन होतें. या नेमणुका नक्त मिळत किंवा या उत्पन्नास जाहागिरी लावून दिलेल्या असत. सर्व तेलंगण देश जिंकल्यावर फौजेंतील लोकांस उत्तेजन देण्याकरितां ५०० स्वारांवरच्या अधिकाऱ्याचें वेतन १,२५,००० होन आणि १००० स्वारांवरच्या सरदाराचें वेतन २,५०,००० होन असें केलें. या वेतनाबद्दल ज्या जाहागिरी लावून दिलेल्या असतील, त्यांचा वसूल १ होनसुद्धां कमी झाला तरी तेवढा हुजूर खजिन्यांतून मिळे. त्याच प्रमाणें कोणी उमरावानें एकादा स्वार कमी ठेविला, तर त्याच्या पगाराचा ऐवज त्याच्या नेमणुकींतून कांटून घेत. या उत्कृष्ट नियमांनीं जिंक-

---

ळत असें स्पष्ट दिसून येईल.

इसवी सन १४७० सालीं दक्षणेतील बाहामिनी शाहाच्या कारकीर्दींत ५०० स्वारांच्या पलटणीस जो खर्च लागत होता. व सन १८२८ सालीं दक्षणेंत ब्रिटिश सरकारास ५०० स्वारांच्या पलटणीस जो खर्च लागत होता, त्याची तुलना खालील कोष्टकांत केली आहे.

| नांव. | बाहामिनी कारकीर्द. इ. स. १४७० | | ब्रिटिश कारकीर्द. इ. स. १८२८ | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|
| | प्रत्येकाचा दर. महा पगार | एकूण. | प्रत्येकाचा दर. महा पगार | एकूण. | |
| पलटणीवरील मुख्य सरदार किंवा कमांडंट... | २,५०० | २,५०० | १,००० | १,००० | या खर्चांत घोडे, हत्यारें, व त्याकरितां ठेविलेलीं गुरें यांचाही खर्च धरलेला आहे. |
| रिसालदार... ... ... ... | ८०० | ८०० | ५०० | ५०० | |
| पांच जमादार... ... ... | २०० | १,००० | १०० | ५०० | |
| वीस डफेदार... ... ... | ९० | १,८०० | ६० | १,२०० | |
| पगार वांटणार... ... ... | १५० | १५० | ५० | ५० | |
| ५०० स्वार... ... ... ... | ४० | २०,००० | ३० | १५,००० | |
| | | २६,२५० | | १८,२५० | |
| | | १२ | महिने | १२ | महिन्यांत |
| | | ३,१५,००० | | २,१९,००० | |

कडे तिकडे व्यवस्था चांगली राहूं लागली. राज्यास बळकटी आली, आणि सर्वांच्या हक्कांकडे लक्ष पोंहोंचूं लागलें; आणि फौज तयार राहून चोंहोंकडे बंदोबस्त राहूं लागला. परंतु या प्रमाणें मोजदादीची सक्ति होऊं लागल्यामुळें ती अभिलाषी सरदारांस रुचली नाहीं, व ते या मुळें गवानाचा द्वेष करूं लागले.

महंमद गवाना विरुद्ध कट.

महंमद गवानाच्या कानावर त्यांची कुरकूर व नाखुषी आली. परंतु जें केलें तें केवळ सरकारच्या व लोकांच्या हिताकरितांच केलें आहे, असें मनांत आणून आपल्या कर्तबगारीवर व मित्रांवर भरंवसा ठेवून त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्याच्या स्नेह्यांत अगदीं जिवाळ्याचा असा पुत्रवत् मानलेला युसफ आदिलखान हा होता. जोंपर्यंत हे दोघे एकत्र असतील, तों पर्यंत दोघांपैकीं एकाचेंही वांकडें करितां येणार नाहीं, असें त्यांच्या शत्रूंनीं ताडिलें. परंतु वर सांगितल्याप्रमाणें शाहानें युसफ आदिलखानास नरसिंगरायावर पाठविलें तेव्हां दोघांचा वियोग झाला, आणि महंमद गवानाच्या शिफारशी वरून जे कित्येक दक्षणी आणि हबशी कामगार मोठ्या पदवीस चढले होते, ते आपल्या आश्रयदात्याच्या विरुद्ध निजाम उल्मुल्कास मिळाले, आणि गवानाचा नाश करण्यास आदिलखान दूर आहे, ही संधि साधावी, असें त्यांनीं त्यास सुचविलें.

हें दग्याचें काम करण्याकरितां शरीफ उल् मुल्क दक्षणी आणि मिस्ता या नांवाचा हबशी यांस त्यांनीं नेमिलें. त्यांनीं बराच पैसा खर्च करून ज्या हबशी गुलामापाशीं प्रधानाची मोहोर असे. त्याच्याशीं दोस्ती केली, व त्याजबरोबर रोज दारू पिण्यास जाऊं लागले, एका प्रसंगीं तो गुलाम दारू पिऊन खूब गुंग झाला. तेव्हां त्यांनीं एका कागदावर त्यास गवानाची मोहोर उठविण्यास सांगितलें. या कागदांत आपल्या एका मित्राची हकीकत लिहिलेली आहे, व त्यावर निरनिराळ्या खात्यांच्या मोहोरा झाल्या आहेत आणि फक्त प्रधानाची मात्र मोहोर होण्याची राहिली आहे, असें त्यांनीं त्यास सांगितलें. गुलाम दारूनें तर्र झाला होता. यामुळें त्यानें रुका-

एक बनावट पत्र करून शाहास फसवितात.

+ परदेशियांशीं लढण्यास दक्षणी व हबशी हे नेहमीं एकत्र होत.

र दिला, आणि तो कागद उघडून सुद्धां न पाहतां ज्या ठिकाणीं त्यास सांगितलें, त्या ठिकाणीं त्यानें प्रधानाचें मोर्तब उठविलें. त्या दोघां चांडाळांस आपलें काम फत्ते झाल्यामुळें फार आनंद झाला, व ते लागलेच त्याच रात्रीं **निजाम उल् मुल्काकडे** गेले. त्यानें त्या कागदावर ओरिसाच्या राजास **महंमद गवानाच्या** नांवचें खालील मजकुराचें पत्र लिहिलें.

"महंमदशाहाच्या क्रूरपणास व स्त्रीलंपटपणास मी अगदीं कंटाळून गेलों आहें. थोड्याच कष्टानें दक्षण जिंकतां येईल. राजमहेंद्रीच्या सरहद्दीवर कोणी चांगला कामगार नाहीं, आणि त्या प्रदेशावर आपल्या मुलखांतून सहज स्वारी करितां येईल. बहुतेक कामगार व फौज माझ्यामुठींत आहे. म्हणून मी तुम्हांस मोठ्या फौजेनिशी येऊन मिळेन, आणि उभयतांनीं मिळोन सर्व राज्य जिंकलें म्हणजे तें आम्हीं सारखेंवाटून घेऊं."

**झरीफ उल् मुल्क** आणि **मिस्त्रा** यांस **निजाम उल् मुल्क** दरबारांत हजर असतां हें पत्र शाहापाशीं देण्यास सांगितलें. पत्रावर गवानाचें मोर्तब पाहून **महंमदशाहास** अमर्याद कोप आला, आणि ही संधि साधून गवानावर खोटे आरोप करून निजाम उल् मुल्कानें आणखीं शाहास चिडविलें. शाहानें विचार न करितां व अशी गोष्ट घडण्याचा संभव किती आहे हें न पाहतां व कोणता जासूद पत्र नेत होता, व ज्यास अडवून धरून आणिलें आहे तो कोठें आहे, एवढें सुद्धां न विचारितां शाहानें **महंमद गवानास** बोलावणें पाठविलें. गवानाच्या मित्रांनीं न जाण्याविषयीं त्यास सुचविलें, आणि त्या दिवशीं हुकूम अमान्य करण्यासाठीं कांहीं तरी सबब सांगावी, आणि शाहाचा कावरेबावरेपणा कमी होण्याची वाट पहावी, म्हणजे हें बनावट पत्र करणारे उघडीस येऊन त्यांस शासन होईल, असें सांगितलें, परंतु **महंमद गवानानें** या संकटास तोंड देण्याचा निश्चय केला, आणि खालील मतलबाचीं पद्यें म्हणून त्यानें त्यांस जबाब दिला. "स्वामी सेवेंत तत्पर असतां जो बळी पडतो त्यास इहलोकीं व परलोकीं बक्षीस मिळतें. यास्तव सर्वांस इष्ट व स्पृहणीय अशी गति मिळविणें म्हणजे मोठी धन्यता मी समजेन."

'बापाच्या सेवेंत माझे केंश पांढरे झाले, म्हणून ते त्याच्या सु-

त्याच्या सेवेंत रक्तानें रंगले तर खरोखरच मी आपला मोठा मान झाला असें समजेन.'

ज्यांचें गवानावर फार प्रेम होतें, त्यांनीं त्याजकडे निरोप पाठविले कीं, आम्हीं फार भयंकर खबर ऐकिली आहे. आम्हा प्रत्येकाजवळ एकेक हजार स्वार तयार आहेत. जर तुमची गुजराथेंत पळून जाण्याची इच्छा असेल तर आम्हीं बरोबर येतों, व तुम्हांकरितां आपले जीव बळी घालितों. त्यानें उत्तर केलें कीं; मी आज कित्येक वर्षेपर्यंत धन्याची नोकरी इमानें इतबारें करून मोठ्या हुद्याचा उपयोग केला व या काळांत मी कधीं एकही गुन्हा केला नाहीं; असें असतां केवळ माझ्या द्वेष्ट्यांच्या आरोपावर मजसारख्या इमानी नोकरास शिक्षा करणार नाहीं, असा शाहावर माझा पूर्ण भरंवसा आहे. परंतु इतकें असूनही जर मी शिक्षा भोगण्याचा ईश्वरी संकेतच असला, तर त्याच्या इच्छेस शरण जाणें हें मला फार योग्य वाटतें. आणि अखेरीस असें म्हणाला कीं, स्नेहाखातर व आपल्या कर्तव्यास जागून जो तुम्हीं मला उपाय सुचविला, तेणेंकरून केवळ कृतघ्नपणा व बंड केल्यासारखें होईल.

फार झालें तर आपला जीव जाईल, असा मनाचा धडा करून तो दरबारीं गेला. तेव्हां महंमदशाहानें त्यास निक्षून विचारिलें कीं, जर कोणी आपल्या राजाशीं निमकहरामपणा केला, आणि त्याचा गुन्हा शाबीद झाला, तर त्यास कोणती शिक्षा करावी? तेव्हां गवानानें बेधडक असें उत्तर दिलें कीं, जो आपल्या स्वामीशीं राजद्रोह करितो, अशा दुष्ट व नीच मनुष्यावर कधींही दया करूं नये. नंतर शाहानें त्यास तें पत्र दाखविलें. तें पत्र पाहतांच पुढील मतलबाची कुराणांतील कविता तो म्हणाला.

'हे परमेश्वरा खरोखरच हें पत्र बनावट आहे. मोर्तब माझें आहे. परंतु वरील पत्र माझें नाहीं; व त्याविषयीं मला कांहीं माहिती नाहीं.' शेवटीं त्यानें पुढील मतलबाची कविता म्हटली, 'ज्या परमेश्वराच्या आज्ञा न्यायी लोकांनीं आपले जीव बळी देऊनही अमलांत आणिल्या त्या परमेश्वराची शपथ युसफ आणि लांडगा या गोष्टीप्रमाणें हें पत्र खोटें आहे, व तें माझ्या शत्रूंनीं माझ्या नाशा-

स्तव बनावट केलें आहे. शाहा यावेळीं दारूनें गुंग झाला होता व शुद्धीवर नव्हता. आणि बाहामिनी घराण्याचा लयही लौकरच व्हावयाची वेळ आली होती, यामुळें त्यानें जास्त चौकशी न करितां आपल्या जाग्यावरून उठून **जोव्हर** नांवाच्या हबशी गुलामास गवानास त्याच ठिकाणीं ठार मारण्याचा हुकूम दिला. तेव्हां **महंमद गवानानें** शाहास म्हटलें कीं, मी तर म्हातारा झालों आहें. यामुळें मी मेलों तर फारसें वाईट होणार नाहीं. परंतु येणेंकरून आपण राज्यास मुकाल आणि आपल्या स्वभावास कालिमा लावून घ्याल, याचा मात्र विचार करा. त्याचें म्हणणें कांहीं न ऐकतां शाहा एकाएकीं जनानखान्यांत गेला. नंतर त्या गुलामानें आपला जंब्या काढून गवानाकडे गेला. तेव्हां मक्केकडे तोंड करून गवानानें गुडघे टेंकिले, आणि म्हणाला. 'या अल्ला रुसुलुल्ला महंमद' असें म्हणतांच जंब्या त्यावर मारिला. तेव्हां आणखीं एकदां 'परमेश्वराचा जयजयकार असो' असें ओरडला. असा तो शांतपणानें मरण पावला. **असतखान गिलनी** हा एक मोठ्या पदवीचा कामगार व गवानाचा दोस्त तेथें हजर होता. त्यासही त्या गुलामानें बिगर हुकूम ठार मारिलें. याप्रमाणें **ख्वाजेखान महंमद गवान** आपल्या वयाच्या ७८ व्या वर्षीं मरण पावला. महंमदशाहाच्या गुणानुवादपर आरंभिलेली कविता मरणापूर्वीं नुकतीच त्यानें समाप्त केली होती.

महंमद गवान ठार मारला जातो. इ. स. १४८१ ता. ५ एप्रील. हि. स. ८८६ चं. ५ सफर.

हिजरी सन ८८६ चं. ५ सफर रोजीं (इ. स. १४८१ ता. ५ एप्रिल) त्याचा वध झाला. दक्षिणेंत या प्रसिद्ध मनुष्याच्या औदार्याचीं बरींच कामें आहेत. त्यांत मरणापूर्वीं २ वर्षें अमदाबाद बेदर येथें बांधलेली **पाठशाळा** होय. या शाळेंत एक मशीद असून एक मोठा चौक होता. ज्या वेळीं हा इतिहास **फेरिस्तानें** लिहिला. त्यावेळीं ही मशीद उभी असून नव्यांसारखी[+] दिसत होती. **महंमद गवान** मोठा वि-

त्याचा स्वभाव.

---

+ सतराव्या शतकाच्या अखेरीस औरंगजेब बादशाहानें बेदर शहर घेतलें; तेव्हां तेथील सुंदर इमारतींचा दारू गोळा ठेवण्यास, व स्वार राहण्यास उपयोग केला होता, तेव्हां अकस्मात् दारू पेटून बऱ्याच इमारतींचा नाश झाला. तथापि अद्यापपर्यंत जे अवशेष आहेत त्यांवरून त्यांच्या पूर्वीच्या वैभवाची व सौंदर्याची बरीच कल्पना (पु. चा.)

द्वान् होता. गद्य व पद्य रचनेची त्यास फार आवड असे, आणि गणितांत तर त्याचा हात धरणारे थोडेच होते. यानें रचलेल्या कवितांपैकीं **रोझत उल इनशा** आणि दुसऱ्या कांहीं कविता दक्षणेंत अद्याप कोठकोठें आढळतात. **खोरासान** आणि **इराक** येथील कित्येक विद्वान् लोकांस दरसाल नजरा पाठविण्याची याची वहिवाट होती, व त्या प्रांताच्या मुसलमान राजांनीही यास किताब दिले होते. **मौलाना जामी अबदुल रहमा** या प्रसिद्ध मौलवीचा याच्याशीं पत्रव्यवहार चालला होता, व त्याचीं कांहीं पत्रें गवानाच्या ग्रंथांत आढळतात. मौलानानें ज्या कविता केल्या होत्या, त्यांत एक गवानाची स्तुतिपर कविता होती. मुल्ला **अबदुल्ला करीम सिंदी** यानें **महंमद गवानाचें** उत्कृष्ट चरित्र लिहिलें आहे. त्यांतील पुढील भाग **फेरिस्तानें** आपल्या ग्रंथांत उतरून घेतला होता.

इराणांतील **गिलानशाहाच्या** वजिरीचें काम **महंमद गवानाच्या** वंशजांनीं कित्येक पिढ्यांपर्यंत एकसारखें केलें होतें. यापैकीं एक **रशदचा** राजा झाला, व तो प्रांत या घराण्याकडे शाहा **तमास्प सफवी** याच्या कारकीर्दीपर्यंत चालला होता. **महंमद गवान** राजघराण्यांतच जन्मला असल्यामुळें शाहा **तमास्प** यास हेवा वाटून कदाचित् कांहीं दगा करील अशा भीतीनें आपली जन्मभूमी सोडण्याविषयीं त्यानें आपल्या आईचें मन वळविलें. **इराक** आणि **खोरासान** येथील शाहांनीं वजिरीचें काम करण्यास बोलाविलें असतांही तें त्रासदायक काम पत्करण्याचें नाकबूल करून व्यापारी होण्याचेंच त्यानें पसंत के-

---

मनांत येते. चौक व कांहीं दिवाणखानें अद्याप सबंध आहेत, व एक घुमटहीउभा आहे. हा घुमट शंभरांहून जास्त फूट उंच असून सपाट तुकड्यांनीं सुशोभित केलेला आहे, व या तुकड्यांवर सोनेरी जमिनीवर ३ फूट लांबीच्या अक्षरांनीं कुराणांतील वाक्यें लिहिलेलीं आहेत. यावरून ही प्रचंड इमारत पूर्वी कशा तऱ्हेची होती, याची पाहणारास अटकळ होते. तेथें एक मोठी भव्य व सुंदर पाठशाळा आहे. व ती बेदर येथील बाहामिनी आणि बेरीद या घराण्याच्या वैभवाची खूण आहे. या इमारतीमुळें हें शहर पाहण्याची सर्व प्रवाशांस मोठी उत्सुकता येते आणि विशेषेंकरून जे हा इतिहास वाचतात. त्यांस तर फारच मौज वाटते.

लें. व्यापार करीत करीत त्यानें पुष्कळ देशांत प्रवास केला, आणि प्रत्येक देशांतील प्रसिद्ध व विद्वान् लोकांचा परिचय करून घेतला. आपल्या वयाच्या ४३व्या वर्षी अंशतः व्यापाराकरितां आणि अंशतः दक्षणेंतील विद्वान् लोकांच्या भेटी घेण्याकरितां तो जळमार्गानें दाभोळ बंदरीं आला, व तेथून अमदाबाद बेदरास गेला. या राजधानीहून दिल्लीस जाण्याचा त्याचा संकेत होता. अल्लाउद्दीन शाहा (दुसरा) यानें याच्या आंगचे अलौकिक गूण पाहून आपल्या पदरीं सरदारी घेऊन राहण्याविषयीं याचें मन वळविलें. हुमायूनशाहा झालिम याच्या कारकीर्दींत यास मलिक् उत् तुजार हा किताब मिळाला, व हा राज्यांतील पहिल्या पायरीस पोहोंचला. महंमदशाहानें यास आणखी दुसरे किताब दिले. त्यांपैकीं खाजेखान हा एक होता. महंमदशाहाच्या कारकीर्दींत त्याच्या खानगीकडे २,००० मोंगल लोक होते, व शाहाकडील १०,००० स्वार होते. यास गवान हें नांव पडण्याचें कारण असें दिलें आहे. “ एके दिवशीं शाहाच्या माहालाच्या गच्चीवर शाहाबरोबर बोलत बसला असतां खालीं एक गाय हंबरली. तेव्हां तेथील एक सरदार विनोदानें म्हणाला कीं, गाय काय म्हणत आहे, हें विद्वान प्रधान सरकारास सांगतील. तेव्हां महंमदानें उत्तर दिलें कीं, ती म्हणते मी गाईच्या जातींतील आहें, व याकरितां मला गाढवांमध्यें राहणें आवडत नाहीं. तेव्हां शाहानें त्यास ख्वाजा जहान (खाजेखान) हा किताब दिला. तेव्हां तो हृदयास लागण्याजोग्या शब्दांनीं म्हणाला, मला वाटतें कीं, हा किताब फार हतभागी आहे. कारण ज्यांनीं ज्यांनीं हा किताब धारण केला, ते अकालीं मरण पावले. तो सुनीपंथाचा होता. महंमदशाहाशीं त्याची राजनिष्ठा अकृत्रिम व अंतर्यामापासून होती, आणि त्याच्या औदार्याची कीर्ति सर्व आशिया खंडांत पसरली होती. याच्या औदार्यापासून ज्या शहरच्या विद्वान् लोकांस लाभ होत नव्हता, असें शहरच नव्हतें. त्याचा स्वभाव मोठा मनमिळाऊ होता, व त्याची न्याय करण्याची पद्धत निर्दोष होती.

आपल्या प्रधानाच्या अगणित संपत्तीविषयीं महंमदशाहाच्या कानावर वारंवार खबरा गेल्यामुळें त्याचा खजानीस निजाम उद्दीन हसन गिलनी यास बोलावून गवानाचें द्रव्य, जवाहीर, आणि भां-

डीं कोठें ठेविलीं आहेत, म्हणून विचारिलें. खजानीस बाह्यात्कारी भ्याला, आणि त्यानें शाहास सांगितलें कीं, मला जीवदान द्याल तर सर्व तुम्हांस दाखवीन. तेव्हां आपणास मोठी लूट मिळेल, असें शाहास वाटलें व त्यानें अशी शपथ घेतली कीं, यानें जर कांहीं लपविलें नाहीं तर यास मोठें बक्षीस द्यावयाचें. खजानीस म्हणाला, सरकार माझ्या धन्याचे दोन खजिने होते. एका खजिन्यास शाहाचा खजिना असें तो म्हणे, व त्यांतून फौजेचा पागेचा व खानगी नोकरांचा खर्च होत असे. यामध्ये हाल्लीं १०,००० रुपये, आणि ३,००० होन इतकी शिल्लक आहे; दुसऱ्या खजिन्यास तो गरीब लोकांचा खजिना म्हणे. या खजिन्यांत मोहोर केलेली ३०० रुपयांची मात्र पिशवी आहे. तेव्हां शाहा म्हणाला गवानाचें सालिना उत्पन्न पुष्कळ राजेलोकांच्या उत्पन्नाच्या बरोबरीचें असतां त्याच्या जवळ एवढीशी लहान शिल्लक आहे, हें कसें? खजानीसानें उत्तर दिलें कीं, जेव्हां त्याच्या जाहागिरींतून वसुलाचा पैसा येई, तेव्हां फौजेच्या व पागेच्या खर्चापुरता पैसा शाहाच्या खजिन्यांत ठेवी, आणि आपल्या उपयोगांकरितां एक कवडीसुद्धां ठेवीत नसे. त्यानें इराणांतून आपल्या बरोबर जी ४०,००० रुपयांची रकम दक्षणेंत आणिली होती. तिचा तो व्यापार करी आणि आपलें मुद्दल नेहमीं कायम राखून जो फायदा होईल त्यापैकीं रोजी २ रुपये या प्रमाणें आपल्या सुतपाकाकडे आणि पोषाखाकडे खर्च करी, आणि बाकीचा पैसा गरीबांच्या खजिन्यांत जमा करी. आणि त्यांतून आपल्या आईस आप्तांस व दुसऱ्या सज्जन व गुणी जनांस पाठवीत असे. तो प्रवास करीत असतां पुष्कळ गुणीजनांचा व त्याचा परिचय झाला होता, व ते हिंदुस्थानांत येण्यास खुषी नव्हते.

हा त्याचा खानगी हिशेब ऐकून गवानाच्या शत्रूंस मोठें आश्चर्य वाटलें व त्यांनीं तोंडांत बोटें घातलीं. परंतु मत्सरबुद्धीनें म्हणाले कीं, गवान मोठा शाहाणा व दूरदर्शी होता. म्हणून आपण फार खर्च ठेविला असतां आपली संपत्ति उघाडीस येईल म्हणून त्यानें राजधानींत कोठें तरी द्रव्य पुरून ठेविलें असावें. त्यास खजानिसानें उत्तर दिलें कीं, येथें किंवा दुसरीकडे मी ज्या रकमा सांगितल्या त्यांशिवाय जर एक रुपया सांपडला तर सरकार करतील तें कडक शा-

सन सोसण्यास मी तयार आहें. नंतर शाहानें माजी प्रधानाच्या सर्व नोकरांस जमविलें, आणि प्रथम फराशास विचारिलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, आपल्या धन्याचे सर्व तंबू व बिछायत छावणींत आहे. फक्त कांहीं डाळ्या मात्र शहरांतील मशीद व पाठशाळा यांच्या जमिनीवर आहेत. तो म्हणाला कीं गवानसाहेब नुसत्या डाळीवर निजत असत. नंतर मुत्याकावरील देखरेख करणारास त्यानें बोलावून विचारतां त्यानें सांगितलें कीं, स्वयंपाकाचीं व इतर सर्व भांडीं मजपाशीं आहेत. परंतु माझ्या धन्याचें खाण्याचें सर्व अन्न मातीच्या भांड्यांत नेहमीं तयार करीत होतों. नंतर पुस्तक संग्रहावरील कारकुनास बोलाविलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, गवानाच्या संग्रहालयांत ३,००० पुस्तकें आहेत. परंतु तीं सर्व पाठशाळेंतील विद्यार्थ्यांच्या उपयोगांकरितां ठेविलेलीं आहेत. हें सर्व ऐकून शाहा फार दुःखी झाला. खजानीस धैर्यानें म्हणाला कीं, सरकार राज्याचें बचावाकरितां **महंमद गवाना** सारखे हजारों लोक बळी पडले तरी हरकत नाहीं. परंतु गवानाच्या म्हणण्याचा सरकारांनीं कां विचार केला नाहीं? आणि ओरिसाच्या राजाकडे पत्र नेणारा कोण होता? याचा तपास कां केला नाहीं? येणेंकरून गवानाचा राजद्रोह उघाडीस येऊन आमची व सर्व मनुष्यजातीची खात्री झाली असती. हें ऐकून शाहा दचकला, आणि मूर्च्छा आलेला मनुष्य ज्या प्रमाणें सावध होतो, त्या प्रमाणें जणूं काय सावध होऊन त्या दुर्दैवी प्रधानावर आरोप करणारास बोलावून आणून पत्र नेणाऱ्या जासुदास मजपुढें आणा, असें त्यानें सांगितलें. परंतु जासूद कोण होता, आणि ते आणितात कोणास? तेव्हां खरें कपट शाहाच्या मनांत एकदम आलें, आणि जें घोर कृत्य त्यानें अविचारानें केलें, त्यामुळें लटलटां कांपूं लागला, आणि आपल्या अविचारी भोळेपणाबद्दल आणि आपला इमानी नोकर व मित्र यास अविचारानें शासन केल्याबद्दल त्यास अत्यंत पश्चात्ताप व दुःख झालें, आणि चुरचुरत जनानखान्यांत गेला. गवानाचें मेत मोठ्या दुःखदायक समारंभानें छावणींतून अमदाबादबेदरास दफनाकरितां नेलें. दफन झाल्यावर तीन दिवसपर्यंत शाहाजादा **महंमुदखान** आणि बडेलोक यांनीं दर्शनास जावें असा हुकूम शाहानें पाठविला.

शाहास आपली चुकी समजते व पश्चात्ताप होतो.

नंतर **महंमदशाहा** तेथून निघाला. परंतु त्याच दिवशीं रात्रीं **इमाद् उल् मुल्क** आणि **कोंडवणरवान** वऱ्हाड आणि माहूर येथील सैन्यें घेऊन छावणी सोडून निघाले, आणि ४ मैल दूर गेले. हें त्यांचें वर्तन पाहून शाहास आश्चर्य वाटलें, आणि मुक्काम करून छावणी सोडून जाण्यास त्यांस काय कारण झालें, याविषयीं त्यानें चौकशी केली. तेव्हां त्यांनीं उत्तर पाठविलें कीं, सरकारच्या मर्जीतील लोकांनीं रवोटे व दुष्ट व्यूह रचून **महंमद गवाना**साररव्या प्रधानाचा नाश केला. म्हणून आम्हीं दरबारीं राहिलों असतां आपणावर कोणतें संकट येईल याचा नियम नाहीं. तेव्हां शाहानें त्यांस रवात्रीपूर्वक निरोप पाठवून हुजूर येण्याविषयीं सांगितलें, आणि म्हणाला कीं, तुम्हीं याल तर ज्या दुष्ट दंगेरवोरांनीं, मला फसवून मजकडून हें कृत्य करविलें, त्यांचा तुमच्या मदतीनें तपास लावून त्यांस शासन करीन. यास त्यांनीं उत्तर दिलें कीं, **युसफ आदिलरवान** आला म्हणजे आम्हीं त्याजबरोबर येऊं, आणि हुजूरच्या चरणापाशीं हजर होऊं. शाहास वाटलें कीं यावेळीं धीर धरून मनधरणी केली, तरच कांहीं उपयोग होणार आहे. असा विचार करून त्यानें **युसफ आदिलरवाना**स येण्याविषयीं हुकूम पाठविला. त्याप्रमाणें तो होईल तितकी त्वरा करून कंडापिलीस आला, आणि त्यानें बेदिल झालेल्या सरदारांनजीकच आपली छावणी दिली. नंतर लौकरच त्यांनीं जें जें मागणें केलें, तें तें सर्व शाहानें कबूल केलें. माजी **महंमद गवान** याची जाहागीर विजापूर ही **युसफ आदिलरवाना**स दिली, व त्यावर त्यास तरफदार नेमिलें; आणि **दुरियारवान फकीर उल् मुल्क मल्लूरवान** व त्याच्या मीतींतले मोंगल सरदार यांस त्याच तर्फेंत जमिनी दिल्या. **फत्ते उल्ला इमाद उल्मुल्क** आणि **कोंडवणरवान** यांस वऱ्हाड आणि माहूर या तर्फांवर कायम करून त्यांनीं जें दुसरें मागणें केलें, तेंही दिलें. याप्रमाणें ठरल्यावर ते शाहाबरोबर अमदाबाद बेदरास आले. परंतु या तिघां सरदारांनीं शहराबाहेर आपल्या छावण्या दिल्या, व शहरांत प्रवेश करण्याचें नाकबूल केलें. तेव्हां आपला अधिकार जुमानीत नाहींत, असें पाहून विनाकारण राग न दारववितां शांतपणानें त्यांचें म्हणणें मान्य करून त्यांस पोषारव वगैरे देऊन आपापल्या तर्फांवर जाण्यास शाहानें निरोप दिला. **निजाम उल्मुल्क** बहिरी यास गवानाच्या जागीं ने-

शाहाचे सरदार छावणी सोडून जातात.

मिळे व तो तें काम योग्य रीतीनें बजावील, अशी जी शाहास आशा होती ती निर्फळ झाली. या नव्या प्रधानाचें वजन व अधिकार यांस बळकटी आणण्याकरितां त्यास रोज नवे नवे किताब दिले, व खानगी नेमणुकाही दिल्या. परंतु येणेंकरून सर्व लोक त्याचा अधिकच हेवा व द्वेष करूं लागले.

कांहीं महिन्यानंतर **युसफ आदिलखान, इमाद उल् मुल्क** आणि **कोंडवंदखान** हे आपणास येऊन मिळतील, या आशेनें शाहा राजधानीहून आपल्या मुलखाचा बंदोबस्त पाहण्यास निघाला. तेव्हां हे वरील सरदार जरी शाहाबरोबर आले, तरी शाहाच्या छावणीपासून कांहीं अंतरावर उतरत, आणि शाहा निघाला म्हणजे आपल्या बरोबर हत्यारबंद लोक ठेवून दुरून मुजरा करीत. तेव्हां शाहास दर घटकेस **महंमद गवानाचें** स्मरण होई, व आपण मोठा मोहोरा गमाविला, असें त्यास वाटे. परंतु हरवलेला मोहरा मिळण्यास कांहीं उपाय नसल्यामुळें त्याबद्दल शोक करावयाचा नाहीं, असा तो निश्चय करी; परंतु आंतून त्यास अत्यंत खेद होत असे. जेव्हां सर्व फौज बेळगांवास पोहोंचली, व शाहानें शहर व तटबंदी पाहिली, तेव्हां त्यानें पुढें जाण्याचें रहित केलें. त्याच्या कामगारांनीं तिकडे जाण्याविषयीं जरी वारंवार आग्रह केला, तरी त्यांचें न ऐकतां शाहा राजधानीस परत निघाला. इतक्यांत विजयानगरचा राजा **शिवराय** यानें गोंव्यावर मोठी फौज पाठविली अशी बातमी आली. तेव्हां **युसफ आदिलखानास** विजापूरची फौज घेऊन तिकडे बंदोबस्तास जाण्यास सांगून, शाहा छोटे मुक्काम करीत फेरोजाबादेस परत आला. **फत्तेउल्ला इमाद उल् मुल्क** आणि **कोंडवंदखान** हे शाहाचा निरोप न घेतां मार्गीतूनच वऱ्हाडांत आपापल्या तर्फांवर गेले.

**महंमदशाहानें** पाहिलें कीं, आपला अधिकार अमलांत आणण्यास यत्न केला, तर आपल्या सरदारांमध्येंच लढाई जुंपणार. याकरितां या उद्धट वर्तनाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं, असा त्यानें निश्चय केला. फेरोजाबादेस शाहानें तीन महिने मुक्काम केला आणि तो चैनबाजीत आपला काळ घालवूं लागला. परंतु आंतून त्यास फार दुःख होत होतें, व अपमान सहन होत नव्हता. म्हणून तो अधिकाधिक क्षीण होत चालला. आपण मेल्यावर शाहाजादा **महंमुद** यानें आपल्या मागून तक्तावर बसावें, आणि तो मोठा होईपर्यंत **निजाम उल् मुल्कानें** कारभा-

र करावा असें त्यानें ठरविलें. अशा मतलबाचा हुकूम लिहून त्यावर दरबारच्या सय्यद, मौलवी व काजी लोकांचीं मोर्तबें झालीं. हा कागद तयार होत असतां शाहा वारंवार म्हणे कीं; मी मोठ्या वैभवानें आज कित्येक वर्षें राज्य केलें, आणि माझ्या बाहुबलानें कित्येक देश जिंकिले; असें असून तुम्हीं माझा अधिकार मानीत नाहीं, तर लहान मुलाचा अधिकार कसा मान्य कराल? त्याची क्षीणता रोज अधिकाधिक वाढत चालली. परंतु अमदाबाद बेदरास परत आल्यावर त्याची प्रकृति कांहीं सुधारली, तेव्हां फाजील चैनबाजी करूं लागला. तेव्हां पुनः प्रकृति बिघडली, आणि ताप अगदीं निघाला नव्हता. असें असतां तो पेलाभर दारू प्याला, व जनानखान्यांत गेला. तेव्हां त्यास भयंकर घेरी आली. हकिमांनीं तत्काळ त्यास औषधें दिलीं, आणि तो कांहींसा शुद्धीवर आला. तेव्हां ते घरीं गेले. ते गेल्यावर सुस्ती व ग्लानि आली असतां ती घालविण्याकरितां व हुशारी येण्याकरितां दारू प्यावी, असें गांवढळ लोकांचें म्हणणें असतें. त्याप्रमाणें तो आणखी दारू प्याला. तेव्हां लागलाच तो बेशुद्ध होऊन पडला, व त्यास आंचके येऊं लागले; तेव्हां महंमद गवान मला फाडीत आहे असें शाहा मोठ्यानें ओरडूं लागला. शेवटीं या वेदना होत असतांच हिजरी सन ८८७ सालीं सफ्फर महिन्याच्या पहिल्या तारखेस तो मरण पावला. यानें २० वर्षें राज्य केलें.

शाहा क्षीण होत जातो.

शाहा फार दारू पितो, व मृत्यु पावतो. इसवी सन १४८१ तारीख २१ मार्च. हि. स. ८८७ छ. १ सफर.

# महंमुदशाहा बाहामिनी (दुसरा.)

इ. स. १४८२ ते १५१८ पर्यंत

राज्यांतील दक्षणी लोकांच्या पक्षाची बळकटी निजामउल्‌मुल्क बहिरी वाढवितो.— युसफ आदिलखान परदेशी लोकांचा पुढारी होतो.— या दोहों पक्षांमध्यें कलह होतो.— दोहों पक्षांचा समेट होऊन परदेशी पक्षाचे लोक राजधानींतून जातात.— निजाम उल्मुल्क आणि कासिम बेरिद सर्व अधिकार बळकावितात.— त्यांचा वध करण्यास शाहा रुकारदेतो.— राजवाड्यामध्यें त्यांचा वध करण्याचा यत्न होतो, व फसतो.— लोकांस पेशवा आवडेनासा होतो, आणि त्यास मारण्याचा दुसरा यत्न सफल होतो.— शाहा दारूबाजींत व रंडीबाजींत निमग्न होतो.— तक्त फेरोज मोडून दारू पिण्याचे पेले व तांब्ये करितो.— कासिम बेरिद सर्व राज्यकारभार हातीं घेतो.— शाहास मारण्याचा यत्न करितात, परंतु तो थोड्या परदेशी लोकांच्या सहाय्यानें फसतो.— बाहादूर गिलनी कोंकणांत बंड करितो.— तें मोडण्याकरितां कासिम बेरिदाबरोबर शाहा पश्चिमेकडे जातो.— बाहादूर गिलनीस ठार मारितात. शाहा बेदरास परत येतो.— प्रधानास मारण्याचा बेत फसतो.— प्रधानाचा मृत्यु— त्याच्या जागीं त्याचा मुलगा अमीर बेरीद प्रधान होतो, व त्याचें आणि शाहाचें जुळतें.— महंमुदशाहाचा मृत्यु.

---

**महंमुदशाहा** दक्षणच्या तक्तावर बसला, तेव्हां त्याचें वय १२ वर्षांचें होतें. **निजाम उल् मुल्क बहिरी, कोवा उल् मुल्क, कासिम बेरिद** आणि जे दुसरे सरदार राजधानींत त्या वेळीं हजर होते, त्यांनीं वहिवाटीप्रमाणें राजनिष्ठेनें वागण्याच्या शपथा घेतल्या; आणि मोठ्या थाटानें तक्तावर बसण्याचा समारंभ झाला. **तक्त फेरोज** कचेरीच्या मोठ्या दिवाणखान्यांत ठेविलें, आणि त्याच्या दोहोंबाजूस दोन रुप्याच्या खुर्च्या ठेविल्या. शाहा **मोहिबुल्ला** आणि **अबदुल हनीम** हे दोघे प्रसिद्ध मौलवी शाहास राज्य मंगलदायक व्हावें याजकरितां निमाज पढले, आणि त्याच्या माथ्यावर त्यांनीं मुकुट ठेविला. नंतर प्रत्येकानें आपापला हात देऊन शाहास तक्तावर चढविलें, आणि ते दोघे दोहोंकडच्या रुप्याच्या खुर्च्यांवर बसले. नंतर **निजाम उल् मुल्क बहिरी** आणि **कासिमबेरिद** या उभयतांनीं पुढें जाऊन शाहास नजरा के-

महंमुदशाहा तक्तावर बसतो. इ. स. १४८२.

ल्या, व त्यां मागून जे दुसरे सरदार व कामगार हजर होते, त्यांनींही केल्या. हा समारंभ होण्यापूर्वीं एक सरदार म्हणाला कीं, **युसफ आदिलखान तुर्क, फकीर उल् मुल्क दूरियारखान** आणि **मल्लूखान** असे कांहीं मुख्य परदेशी कामगार हजर नाहींत, म्हणून हा समारंभ साजरा होणार नाहीं. त्यास **निजामा**नें उत्तर दिलें कीं, तक्त रिकामें ठेविलें तर भलतेच परिणाम होतील; परंतु आवश्यक वाटल्यास कोंकणच्या स्वारींत हल्लीं ते सरदार गुंतले आहेत, तिकडून ते परत आल्यावर पुनः समारंभ करून त्यांचे किताब किंवा त्यांच्या जाहागिरी कायम करितां येतील, किंवा नव्या देतां येतील. **मुल्ला अबदुल करीम शिंदी** हा त्यावेळीं हजर होता. तो असें लिहितो कीं, हे कलह पुढील अरिष्ठाचे सूचक आहेत, असें लोकांस वाटलें. जरी **महंमुदशाहाचें** राज्य पुष्कळ दिवस टिकलें, तथापि याकाळांत पुष्कळ दंगे, बखेडे व आपसांत लढाया झाल्या, व अखेरीस बाहामिनी वंश रसातळास गेला.

माजी शाहाच्या वेळची स्थिति.

माजी **महंमद शाहा** जेव्हां तक्तावर बसला, तेव्हां तो लहान होता. म्हणून पुष्कळ सरदारांनीं स्वतंत्र होण्याचा घाट घातला होता. परंतु **माई राणी** आणि **महंमद गवान** यांच्या कर्तबगारीमुळें ते त्यांचे बेत सिद्धीस गेले नाहींत. तो शाहा मोठा होऊन त्यास समजूं लागलें, तेव्हां तो आपल्या दौलतीचा कारभार करण्यास लौकरच योग्य झाला; आणि हळू हळू सरदारांचा अधिकार योग्य मर्यादेंत राहिला. आपल्या जातीच्या रक्षक फौजेंत जार्जिया व सर्कशिया येथील लोक, व काल्मक आणि दुसरे तार्तरीचे लोक या परदेशीय लोकांस ठेवण्याची शिस्त त्या शाहानें सुरू केली. व याशिवाय २००० हबशी व अमेरिकेंतील रानटी लोक यांची एक टोळी यांपैकींच मोठमोठ्या कामावर नेमण्याकरितां लोकांची निवड होत नसे, व ते मोठमोठ्या अधिकारापर्यंत चढत गेले. दक्षणी आणि हबशी लोक **निजाम उल् मुल्क बहिरीस** आपला पुढारी असें समजत. हा मूळचा बाटलेला हिंदू होता. **युसफ आदिलखान** हा मूळचा एक तुर्की गुलाम होता, यास परदेशी लोक चिकटून राहात. **महंमद गवान** प्रधा-

निजाम उल् मुल्क बहिरी दक्षणी लोकांचा आणि युसफ आदिलखान परदेशी लोकांचा पुढारी होतो.

+ फेरिस्ता हा स्वतः इराणदेशचा रहिवासी होता. या तिकाणीं यानें गुला (पु-चा.)

नही परदेशी असून याचें पाठबळ परदेशी लोकांसच होतें. हा **युसफ आदिलखानास** निजाम उल्मुल्क बहिरी याच्यावर दरबारांत जागा देऊं लागला. त्यामुळें बहिरीस फार कमीपणा वाटून त्यानें त्या मसिह्द मधानाचा मार्ग सांगितल्याप्रमाणें नाश करून सूड उगविला. **युसफ आदिलखानानें** विशेष सावधगिरी ठेविली, म्हणूनच तो पाशांत न सांपडतां सुटला. यास विजापूरचा तरफदार नेमिल्यामुळें दिवसें दिवस याचा अधिकार वाढत चालला.

**महंमदशाहा** मरण पावून **महंमुदशाहा** तक्तावर बसल्यानंतर **युसफ आदिलखान** आणि त्याच्या बरोबरीचे परदेशीय कामगार यांचा करारठरवून तरुण शाहा गादीवर बसला, म्हणून आपला आनंद दाखविण्याकरितां मोठी फौज घेऊन ते कोंकणांतून राजधानीस आले, आणि शहराबाहेर उतरले. **युसफ आदिलखान, दूरियाखान, फकीर उल्मुल्क, मल्लुखान, अजदरखान** आणि **घझ्झव फरखान** हे हजार स्वारांनिशी शाहास मुजरे करण्याकरितां शहरांत शिरले. महालांत गेल्यावर हुजरे, प्यादे वगैरे बाहेर ठेवण्याची जरी दरबारची शिस्त होती, तरी **निजाम उल्मुल्क** विश्वासघात करील ह्या भीतिस्तव २०० हत्यारबंद लोक त्यांच्या बरोबर कचेरीच्या ठिकाणीं गेले. **निजाम उल् मुल्क**ही ५०० निवडक लोक बरोबर घेऊन त्यांस भेटला, आणि त्यांची बडदास्त राखून त्यांस शाहास भेटविलें. **युसफ आदिलखाना**नें रीतिप्रमाणें मुजरा करून नेहमीं प्रमाणें निजाम उल् मुल्काच्या वरच्या जागीं बसला, आणि बाकीचे **दूरियाखान** वगैरे सरदार निजामाच्या खालीं त्याचा मुलगा मलिक **अहंमद** याच्या वर बसले. याचें कारण असें होतें कीं, जर कांहीं दंगा झाला, तर परदेशीय सरदारांस या दोघांवर हल्ला करण्यास सांपडावें. मलिक **अहंमद** बहिरी आपल्या बापाच्या खालीं बसण्यास यत्न करूं लागला, तेव्हां त्यास बापानें तसें करण्यास मनाई केली. आपले प्रतिस्पर्धी फार सावधगिरीनें आले आहेत. म्हणून कांहीं बखेडा झाल्यास आपणावरच बेतेल, म्हणून शाहाकडून पोषाख व निरोप वगैरे देवविण्याचा स-

---

म या शब्दाचा जो उपयोग केला आहे, त्याचा अर्थ पोफळ इमानी नोकर किंवा शिपाई, असें दर्शविण्यासाठींच येथें गुलाम या शब्दाचा उपयोग फेरिस्तानें केला आहे, असें दिसतें. इराणांतील रक्षक लोकांस गुलाम-इशाही असें म्हणतात, व त्यांत खानदानीच्या बड्या लोकांचेच मुलगे असतात.

प्रारंभ त्यानें लौकरच आटपला. **युसफ आदिलखान** बाहेर आला, तेव्हां **निजाम उल् मुल्काशीं** कांहीं बोलावयाचें आहे, असें मिष करून त्यानें त्याचा हात धरिला. आणि किल्याच्या वेशीच्या बाहेर पर्यंत त्यास आणिलें. तेथें आपल्या सर्व लोकांस मिळतांच त्यांनीं परस्परांची दोस्ती कायम आहे, अशी परस्पर खात्री करून एकमेकांचा निरोप घेतला. यानंतर **युसफ आदिलखान** शहरांतील आपल्या वाड्यांत राहिला. आणि आपल्या रक्षणाकरितां १००० निवडक लोकांचा घरासभोंवती पाहारा ठेविला, आणि **दूरियाखान** व त्याचे मित्र यांस छावणींत जाऊन सावधगिरीनें राहण्यास सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं **निजाम उल् मुल्क**, **युसफ आदिलखानाच्या** भेटीस गेला आणि खानाविषयीं आपली पूज्यबुद्धि दाखवून असें म्हणाला कीं, तुम्हीं व सर्व परदेशीय कामगार या सर्वांनीं शहरांत राहावें, म्हणजे वरचेवर मजबरोबर दरबारांत येऊन राज्यकारभारांत सहाय्य कराल. **आदिलखानानें** उत्तर केलें कीं, आपणा उभयतां मध्यें जें परस्पर प्रेम आहे त्यास अनुसरूनच तुम्हीं ही विनंति केली, हें मी पक्कें जाणतों. परंतु दरबारांत दररोज येण्याचें कांहीं कारण नाहीं. मी व माझे स्नेही हे केवळ शिपाई आहेत, आणि आम्हांस राज्यकारभाराचें फारसें ज्ञान नाहीं. यास्तव शाहाच्या इच्छे प्रमाणें सर्व राज्यकारभार आपण अप्रतिबंधरीतीनें चालवावा आणि लष्करी कामकाज जें पडेल, तें आम्हांस सांगावें, अशी आमची सर्वांची इच्छा आहे. माझे लोक फार दंगेखोर आहेत, ते शहरांत आल्यास हबशी आणि दक्षणी यांशीं कलह करतील. म्हणून ते शहरा बाहेर आहेत, तें बरें आहे. शेवटीं असें ठरलें कीं, निजाम उल्मुल्कानें **वकील उस् सलतनत**+ या हुद्याचें काम करावें, आणि माजी शाहाच्या कारकीर्दींत जीं दुसरीं मोठ मोठीं कामें त्याजकडे होतीं तीं सोडून द्यावीं, येणेंकरून जी वजिरीची जागा रिकामी पडली, ती **कोवा उल्मुल्क** या वडील भावास दिली, आणि वरंगूळची सुभेदारी याच्याच धाकट्या भावास दिली. राजमहेंद्रीच्या सुभेदारीवर **दिलावरखान** हबशी यास नेमिलें, व त्याच प्रमाणें बहुतेक मुख्य कामें दोहों पक्षांकडील मुख्य लोकांनीं सारखीं वांटून घेतलीं.

+ याचा अधिकार रीजंट इतका आहे.

* याचा अर्थ असा कीं, राज्यांतील निमे अधिकार निजामाकडे दक्षणी व हबशी (पु. चा.)

नंतर ते दोघे शाहाकडे जाऊन त्यांनीं शाहाची मंजुरी घेतली, व कायम केल्याबद्दल शाहानें पोषाख दिले. यानंतर **आदिलखान** घरीं आला, आणि त्यानें पुढें राज्यकारभारामध्यें अगदीं मन घातलें नाहीं.

कांहीं काळपर्यंत दक्षणी व हबशी लोकांशीं परदेशी लोक सलुख्यानें राहिले. परंतु **निजाम उल् मुल्क** आणि वडील **कोवा उल् मुल्क** यांनीं पूर्वींचा करार मोडून **आदिलखानास** विजापुराहून काढावें, आणि त्या तरफेवर वरंगूळचा नायब तरफदार **आदिलखान दक्षणी**+ यास नेमावें, अशी मसलत केली. या हेतूनें **आदिलखान** आणि **फत्तेउल्ला इमाद उल् मुल्क** यांस हुजूर शाहाच्या भेटीकरितां बोलाविलें. त्या प्रमाणें ते आपल्या फौजा घेऊन आले. शहराबाहेर उतरून शाहाची भेट घेण्याकरितां थोड्या लोकांनिशी शहरांत आले. शाहानें त्यांची वहिवाटी प्रमाणें भेट घेतली, आणि त्यांस पोषाख दिले.

दक्षणी व परदेशी लोकांचीं परस्पर वैमनस्यें.

या नंतर सुमारें तीन आठवड्यांनीं **इमाद उल् मुल्क तुर्क** यास असें सांगितलें कीं, दक्षणी सरदारांच्या सहाय्यानें **युसफ आदिलखान तुर्क** याचा नाश करून त्याच्या कचाटींतून उभयतांनीं मुक्त व्हावें, व त्याच्या पक्षाच्या लोकांस निरनिराळ्या ठाण्यावर पाठवून द्यावें, असें माझ्या मनांत आहे. कारण तुर्की लोकांच्या भयास्तव दक्षणी उमरावांस आपलीं घरें सोडून बाहेर पडण्याची सुद्धां छाती होत नाहीं. **इमाद उल् मुल्क** हा जात्या भोळसर स्वभावाचा असल्यानें निजामाच्या कपटी भाषणास भुलून गेला, आणि निजामाचा बेत त्यानें पसंत केला. तेव्हां त्यानें त्यास असें सांगितलें कीं, ज्या दिवशीं हा बेत अमलांत आणावयाचा आहे, त्या दिवशीं इमादानें आपल्या तुर्की फौजेस घरांतून बाहेर पडूं देऊं नये. **कोवा उल् मुल्क** यानेंही हा बेत पसंत केला. नंतर दुसऱ्या दिवशीं **निजामानें** शाहास किल्ल्याच्या एका बुरजावर बसवून **आदिलखान दक्षणी** व **फत्ते उल्ला इमाद उल् मुल्क** यांस आपल्या फौजा घेऊन बुरजापुढें येण्यास हुकूम पाठविला. तेथें आल्यावर शाहा फौजेची सलामी घेऊन

---

लोकांच्या हातीं होता. व निमे आदिलखानामार्फत परदेशी लोकांकडे होता.

+ हा आदिलखान दक्षणी; आणि विजापूरचा तरफदार युसफ आदिलखान हे दोघे अगदीं वेगळे पुरुष आहेत, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

तुम्हांस पोषाख देऊन आपापल्या सुभ्यावर जाण्यास निरोप होईल, असें निजामानें त्यांस कळविलें. फेरात उल्मुल्क हा परदेशी असून शहरचा कोतवाल होता, त्यास निजामाच्या या दुष्ट बेताची गुणगुण कळली. तेव्हां त्यानें कोवाउल् मुल्क यास असें सांगितलें कीं, युसफ आदिलखानाचा वध करण्याचा केवळ बाहाणा करून सर्व तुर्की लोकांचा विश्वासघातानें नाश करण्याचा निजामाचा इरादा दिसतो. यास्तव सर्व तुर्की लोकांनीं अशा समयीं आपापल्या घरीं स्वस्थ बसून राहावें, हें अति वेडेपणाचें कृत्य होईल. युसफ आदिलखानाचा नाश व्हावा, अशी कोवा उल् मुल्काची फार इच्छा होती. म्हणून निजाम उल् मुल्काच्या इमानीपणावर विश्वास ठेवून त्यानें कोतवालाच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं.

आदिलखान दक्षणी व इमाद उल् मुल्क हे तेलंगण आणि वऱ्हाड या सुभ्यांतील फौजा घेऊन शहरांत आले, आणि फौजेस त्यांनीं वाड्यापुढें उभें केलें. महंमुदशाहा हा केवळ निजामाच्या हातांतील बाहुलें होता. निजामाच्या शिकवणी प्रमाणें त्यानें त्या दोघां सरदारांस सांगितलें कीं, परदेशी फौज बिथरली आहे, व शहरांत तिनें फार दांडगावा मांडला आहे. याकरितां परदेशी लोकांच्या पारिपत्याच्या कामावर तुमची फौज नेमावी, अशी जरूरी मला वाटली आहे. इमाद उल् मुल्काचें युसफ आदिलखानाविषयीं अंतःकरण पूर्वक प्रेम होतें. त्यानें युसफाच्या बंदोबस्तापुरते लोक ठेवून बाकी फौजेस आदिलखानाबरोबर परदेशी लोकांवर जाण्याची परवानगी दिली. कोवाउल् मुल्क हा आरंभींच बळी पडला, आणि शहरचे दरवाजे बंद असल्यामुळें दक्षणी लोकांनीं परदेशी लोकांची खूब कत्तल केली. कारण असा हल्ला आल्यास त्याचें निवारण करण्याची त्यांची तयारी नव्हती. परंतु दुर्रेशरखान, खुषकदमखान व दुसरे युसफ आदिलखानाच्या पक्षाचे कामगार दक्षणी लोकांशीं लढत शहरच्या वेशीपर्यंत गेले. त्यांनीं वेशी जबरीनें उघडिल्या, आणि दूरियाखानास व परदेशी लोकांस शहरांत घेतले. मग काय विचारतां! शहरच्या रस्त्यांत दक्षणी व परदेशी लोकांची धुमश्चक्री चालली, व

दक्षणी लोक परदेशी लोकांची कत्तल करितात, व राहिलेले राजधानींतून पळून जातात.

शेंकडों लोक बळी पडूं लागले. हा प्रळय २० दिवस झाले तरी थांबेना. दोहों-कडील मिळून ४,००० लोक मेले. शेवटीं बेदरच्या सय्यदांनीं मध्यस्ती करून हें बंड थांबविलें. बरेच मोठ मोठे परदेशी कामगार पडल्यामुळें **युसफ आदिल खानानें** आपल्या लोकांस घेऊन शहर सोडून विजापुरास जावयाचें कबूल केलें. तिकडून तो कधीं परत आला नाहीं, आणि त्यानें विजापुरास एका स्वतंत्र राज्याची स्थापना केली.

आतां सर्व सत्ता **निजाम उल्मुल्का**च्या हातीं अप्रतिबंधित आली. तेव्हां त्यानें बीड, धारूर व दुसरे कांहीं प्रांत यांवर आपला पुत्र **मलिक अहंमद** यास नेमिलें. **फकीर उल् मुल्क दक्षणी** हा **महंमद गवान** या माजी प्रधानाच्या एका गुलामाचा मुलगा असून मोठा विद्वान व मोठा पराक्रमी शिपाई होता. यास हजार स्वारांची सरदारी निजामानें दिली, व त्याच्या मुलास **ख्वाजा जहान** हा किताब दिला. **इमाद उल् मुल्क** यास वजिरीचें काम देऊन त्याचा बहुमान केला, आणि त्याचा पुत्र **अल्ला उद्दीन** यास वऱ्हाड प्रांतीं त्याच्या बापाचा नायब नेमिलें. **कासिम बेरिद** यानें परदेशी लोकांबरोबर लढाई चालली असतां फार चलाखी दाखविली होती, म्हणून त्यास शहरची कोतवाली दिली, आणि **मीरनौबत**+ हा किताब दिला. धाकटा **कोवा उल् मुल्क** यास तेलंगणांत पाठविलें. **निजाम उल् मुल्क व इमाद उल् मुल्क** हे दोघे शाहाच्या आईच्या सल्यानें सर्व राज्यकारभार चार वर्षेंपर्यंत कुल् मुखत्यारपणानें करीत होते.

निजाम व इमाद उल्मुल्क सर्व अधिकार बळकावितात.

शेवटीं **दिलावरखान हबशी** हा त्यांचा हेवा करूं लागला, आणि त्यानें शाहाच्या मनांत असें भरवून दिलें कीं, हे प्रधान आपला अधिकार जुमानीत नाहींत, आणि माई राणीच्या मसलतीनें सर्व राज्यसत्ता बळकावून आपणास गुलामप्रमाणें वागवितात. हें ऐकून **महंमुदशाहा** चिडला, आणि त्या दोघां प्रधानांस ठार मारण्याचा त्यानें हुकूम दिला. त्याप्रमाणें एके दिवशीं रात्रीं ते दोघे माई राणीच्या महालांत गेले. तेव्हां **दिलावरखान** दुसऱ्या एका जवानास घेऊन वाटेंत राहिला, आणि ते

प्रधानाचा वध करण्यास शाहा हुकूम देतो.

+ रक्षकफौजेवरील मुख्य.

बाहेर आले तेव्हां आपले जंब्ये काढून **दिलावरखान** आणि त्याचा साथी हे त्यांच्या आंगावर धुसले. **निजामास** एक जखम लागली, परंतु तो व **इमादउल्‌ मुल्क** हे तरवार मारण्याच्या कामांत फार कुशळ असल्यामुळें ते महालांतून बाहेर पडेपर्यंत त्या दोघांशीं झुंजले. बाहेर आल्यावर शाहाचा बेत आम्हांबरोबर तुलाही मारण्याचा होता, असा निरोप त्यांनीं **कासिम बेरिदा**स पाठविला, आणि **निजाम** व **इमादउल्‌ मुल्क** हे आपल्या लोकांस बरोबर घेऊन शहराबाहेर पळाले. नंतर **बेरिदानें** शहरच्या वेशींवर खूप बंदोबस्त केला, आणि शाहाशीं दुसऱ्या कोणाची गांठ पडूं दिली नाहीं. तेव्हां शाहा इतका घाबरला कीं, प्रधानांची त्यानें क्षमा मागून त्यांस पूर्ववत्‌ काम पाहण्यास बोलाविलें. तेव्हां त्यांनीं असा आग्रह धरिला कीं, आम्हीं परत येण्यापूर्वी दिलावरखानास ठार मारिलें पाहिजे. हें **दिलावरखाना**स कळतांच तो आपल्या कुटुंबासुद्धां बऱ्हाणपुरास+ पळून गेला. नंतर **निजामउल्‌ मुल्क** आणि त्याचा मुलगा **मलिक अहंमद** हे दोघे शहरांत आले, परंतु पुढें लौकरच **इमादउल्‌ मुल्क** आपल्या वऱ्हाडच्या सुभेदारीवर गेला.

त्यांचा वध करण्याचा यत्न होतो व फसतो.

आपल्या पक्षास बळकटी आणण्याकरितां **महंमद गवाना**च्या पदरीं पूर्वी असलेल्या **मलिक वज्जी** आणि **मलिक अश्रफ** या दोघां भावांस त्यानें मोठ्या पदवीस चढविलें, आणि **वज्जी** यास दौलताबादच्या सुभेदारीवर नेमिलें. आपला मुलगा **मलिक अहंमद** याच्याशीं आपण स्नेहानें व इमानानें वागूं, अशी त्यांजकडून त्यानें वचनें घेतलीं. त्याचप्रमाणें **मगदुमखाना**कडूनही अशाच तऱ्हेची शपथ घेऊन **परिंदा** आणि **सोलापूर** या किल्ल्यांवर त्यास नेमिलें. यानंतर सुमारें तीन महिन्यांनीं शाहाचा रुकार घेऊन, आपला पुत्र मलिक **अहंमद** यास जुन्नरास नायब सुभेदार हा हुद्दा देऊन पाठविलें.

हिजरी सन ८९१ (इ॰ स॰ १४८६) या सालीं वरंगूळचा सुभेदार **आदिलखान दक्षणी** हा निवर्तला, तेव्हां धाकटा **कोवाम उल्‌ मुल्क** मोठ्या दवडीनें राजमहेंद्रीहून वरंगुळास गेला. आणि सर्व तेलंगण प्रांत ब-

---

+ खानदेश.

ळकावून तेथें त्यानें आपला स्वतंत्र अधिकार स्थापिला, तेव्हां **निजाम उल् मुल्क** शाहास घेऊन वरंगुळास निघाला. हें समजतांच **कोवाम उल् मुल्क** राजमहेंद्रीकडे मागें हटला, आणि त्यानें शाहास असें गुप्त पत्र लिहिलें कीं, **निजामाचा** घात करण्याची ही संधि आपण दवडूं नये. या दुर्बळ राजानें आपल्या नशिबीं असेल तसें होईल, असा निर्धार करून त्यानें तें पत्र **निजामाच्या** हातीं दिलें. शाहा वरंगुळास पोंहोंचतो, तोंच मलिक **अहंमदा**कडून खालीं लिहिलेली खबर आली. माजी राज्यांत गोंवें बंदरावर **कीश्वरखाना**स नेमिलें होतें, त्यानें तें बंदर **नजिम उद्दीन गिलनी** याच्या हवालीं केलें होतें. हल्लीं तो वारल्या मुळें त्याच्या कामगारांपैकीं **बाहादूर गिलनी** यानें तें बंदर बळकावून शिवाय दाभोळें, कोल्हार, कोल्हापूर, पन्हाळा, शिरोळ आणि बेळगांव हे परगणेही ताब्यांत घेतले आहेत. आणि **युसफ आदिलखाना**च्या चिथावणीवरून तो रोज अधिकाधिक दंगेबखेडे करूं लागला आहे, व समुद्र किनाऱ्यावरील चौल व दुसऱ्या बंदरांस फार उपद्रव देत आहे. त्याचप्रमाणें चाकणचा जाहागीरदार **झैन उद्दीन** यानेंही बंड केलें आहे.

निजाम शाहास घेऊन कोवाउल्-मुल्कावर स्वारी करितो.

**झैन उद्दिना**ची प्रथम खोड मोडण्यास निजामानें आपल्या मुलास हुकूम दिला. आणि परिंड्याचा सुभेदार **खवाजा जहान** दक्षणी आणि दौलताबादचा सुभेदार **मलिक वज्जी** यांस आपल्या मुलाच्या कुमकेस जाण्याविषयीं हुकूम पाठविले. अशी स्थिति झाली तेव्हां **झैन उद्दिनानें** विजापूरच्या **युसफ आदिलखाना**कडे कुमक मागितली. तेव्हां त्यानें ५,००० स्वार त्याच्या कुमकेस पाठविले, आणि इंदापूर किल्याच्या नजीक छावणी देऊन **मलिक अहंमद** कोठें जातो व काय करितो, हें पाहात राहून तो कोंकणांत गेल्यास तिकडे जाऊन त्यास प्रतिबंध करावा, असा **युसफानें** आपल्या लोकांस हुकूम केला.

+ इंदापूर येथें राहून परिंडें व सोलापूर येथून खवाजा जाहान दक्षणी यास येऊन मिळण्यास प्रतिबंध करितां येत होता; व चौल बंदरच्या बचावाकरितां पार घांटानें दक्षिण कोंकणांत, जुन्नराहून मलिक अहंमद येऊन पोहोंचतो, इतक्यांत पोहोंचण्याजोगी फौज पाठवितांही येण्याजोगी होती.

हें वर्तमान वरंगुळास पोहोंचतांच **निजाम उल् मुल्का**चें वजन कमी होऊं लागलें. शाहा त्यास जुमानीना, आणि **कासिम बेरिद दस्तुर दिनार** आणि हबशी कामगारही त्याच्याशीं वितुष्ट करूं लागले. शाहाच्या मनांत अंतःकरणापासून त्याचा नाश करावयाचा होता. सरदारही त्याच्याशीं बिघडलेले पाहून शाहानें **निजामाच्या** वर्तनाविषयीं त्यांजपाशीं कागाळ्या केल्या, आणि संधि सांपडतांच त्याचा वध करण्या विषयीं त्यांस हुकूम दिला. हें निजामास कळतांच तो मध्यरात्रीं आपल्या छावणींतून पळाला; परंतु जुन्नरास जाऊन आपल्या मुलास न मिळतां शाहाचा खजिना आपल्या ताब्यांत घेण्याकरितां थेट बेदरास गेला. **पसंदखान** दक्षणी हा निजामाच्या आश्रयानें अगदीं भिकार स्थितींतून मोठ्या पदवीस चढला होता. त्याजकडे शहरच्या बंदोबस्ताचें काम होतें. त्यानें **निजामास** शहरांत घेतलें, व संभाळण्याचें अभिवचन दिलें. याप्रमाणें येथें आपण निर्भय आहों, असें पाहून त्यानें आपला पुत्र मलिक **अहंमद** यास तत्काळ जुन्नराहून बोलाविलें, आणि सरकारचा खजिना उघडून लोकांस उदार हस्तानें पुष्कळ पैसा देऊन खूब फोज ठेविली.

निजाम लोकांस आवडेनासा होतो.

निजामाचा वध करण्याविषयीं शाहा हुकूम देतो.

**महंमुदशाहास** हें वर्तमान समजतांच तेलंगणच्या सुभेदारीवर **कुतुब उल् मुल्क** यास नेमून त्याचें सैन्य घेऊन बेदरास आला. आपलें वजन शहरांत कमी होत चाललें, असें **निजामानें** पाहून सरकार खजिन्यांतील जितका पैसा हातीं लागला, तितका घेऊन आपल्या मुलास जाऊन मिळण्यास त्यानें यत्न केला. **पसंदखानानें** युक्तिप्रयुक्तीनें त्याचें जाणें लांबविलें, आणि शाहास गुप्तपणें असें लिहिलें कीं, आपली स्वारी लौकर आल्यास या बंडखोरास आपल्या हवालीं करीन. **महंमुदशाहानें** उत्तर पाठविलें कीं, जर तुमचें म्हणणें इमानपुरःसर असेल, तर त्या घातकी मनुष्याचें डोकेंच पाठवावें, म्हणजे मी तुमची खरी राजनिष्ठा आहे असें समजेन. त्याप्रमाणें **पसंदखान** ५०० लोक घेऊन महालांत निजामाकडे गेला, आणि एका कामासाठीं त्याच्याशीं खलबत करावयाचें आहे, असें ढोंग केलें. निजामाच्या मनांत कांहीं अंदेशा

निजामास मारण्याचा यत्न सफल होतो.

नसल्यामुळें त्यानें रुकार दिला, आणि त्याबरोबर तो एका खोलींत गेला. **पसंदखान** तरुण व बळकट असल्यामुळें त्यानें शस्त्रहीन म्हाताऱ्या निजामाचा गळा दाबून त्यास ठार मारिलें. नंतर त्याचें डोकें कापून बाहेर आणिलें, आणि तें उघड्या जागीं ठेवून विश्वासघातकी मनुष्याचा परिणाम असा होतो, असा त्यानें जाहिरनामा फिरविला. नंतर तें डोकें जासुदाबरोबर शाहाच्या छावणींत पाठविलें.

**महंमुदशाहा** शहरांत परत आल्यावर त्यानें दुसऱ्या प्रधानाकडे राज्यकारभार सोंपविला, आणि शाहा राज्यकारभाराकडे लक्ष न देतां तारुण्याच्या अविचारीपणामुळें आपला बहुतेक काळ सर्व प्रकारच्या फाजील चैनबाजींत घालवूं लागला. **तक्तफेरोज** (अस्मानी सिंहासन) मोडून त्यानें त्याचे दारू पिण्याचे पेले व भांडीं केलीं. त्यानें जीं अनेक वेडेपणाचीं कृत्यें केलीं, त्यांपैकीं हें एक होतें.

शाहा चैनबाजींत निमग्न होतो, आणि तक्त फेरोज मोडून दारू पिण्याचे पेले व भांडीं करितो.

हिजरी सन ८९६ सालीं शाहापाशीं परदेशी लोकांचें जें वजन होतें, तें नाहींसें करण्याकरितां दक्षणी व हबशी लोकांनीं पुनः कट केला. शेवटीं **पसंदखान** दक्षणीलोकांस मिळाला, आणि **महंमुदशाहा**चा वध करून राजघराण्यांतील दुसऱ्या शाहाजाद्यास तक्तावर बसविण्याचें त्यानें कबूल केलें. या कटांतील लोक हत्यारबंद होऊन शाहाच्या महालांत गेले. कारण पाहाऱ्यावरचे परदेशी लोक शाहाच्या मदतीस येतील, अशी त्यांस भीति होती. अपरात्रीं शाहा चैनबाजींत गुंग झाला असतां ते शाहाच्या खोलींत घुसले, येणेंकरून थोडा गोंगाट झाला. याचें कारण **महंमुदशाहास** कळण्यापूर्वींच दरवाज्यावरच्या पाहरेकऱ्यांस त्यांनीं मथवून ठेविलें होतें. त्यांनीं कांहीं दक्षणी लोकांस आंत सोडिलें, व ते शाहाच्या खोलींत गेले. तेव्हां **अझीझखान** तुर्क व रक्षक लोकांपैकीं दुसरे चार शिपाई, शिवाय **हसन अली, सबझवारी** आणि **मिरझा मसूदी** हे शाहा आणि मारेकरी यांच्यामध्यें पडले, आणि शाहाच्या बचावाकरितां त्यांनीं आपले जीव बळी दिले. येणेंकरून त्या खोलीच्या गच्चीवर जाण्यास शाहास अवकाश मिळाला. जनानखान्याशिवाय एवढीच जागा मात्र दक्षणी लोकांच्या ताब्यांत नव्हती. जे थोडे परदेशी शाहाबरोबर चैन मारीत होते, त्यांनीं दगड व ढेंकळें मा-

परदेशी लोकांविरुद्ध कट इसवीसन १४९०

रून दक्षणीलोकांशीं मोठ्या शौर्यानें टिकाव धरिला. इतक्यांत सुदैवानें शाहास आपली स्थिति परदेशी फौजेस कळवितां आली. कासिमबेरिद तुर्क व दुसरे कांहीं कामगार तत्क्षणीं ५०० लोक घेऊन महालाकडे आले, परंतु महालाचे दरवाजे बंद आहेत, असें त्यांस समजलें. नंतर आठ असामी भिंतीस शिड्या लावून मोठ्या कष्टानें वर चढले, आणि त्यांनीं आपला कर्णा वाजविला. तेव्हां मोंगल लोक आंत शिरले असें पाहून पुष्कळ दक्षणी व हबशी लोकानीं दरवाजे उघडिले. इतक्यांत बाहेर असलेल्या मोंगलानीं त्यांवर बाणाचा वर्षाव केला. तेव्हां ते मागें हटले, आणि दरवाजे पुनः बंद करूं लागले. तेव्हां परदेशी लोकांनीं आंत घुसून दरवाजे बंद करूं दिलें नाहींत. शाहा ज्या गच्चीवर बसला होता, त्याखालीं कीश्वरखान गेला होता. त्यानें दरवाजे उघडल्याचें ऐकतांच विलंब न लावितां वाड्यांत प्रवेश केला. कटांतल्या लोकांनीं अकीक महालांत आश्रय घेऊन आपला बचाव करूं लागले. इतका दंगा झाला तेव्हां शहरांतल्या लोकांची पांचावर धारण बसली, आणि कोणासच दंग्याचें कारण समजेना. परंतु गांवठी लोकांनीं सर्व परदेशी लोकांची घरें फोडून लुटण्यास आरंभ केला. शेवटीं चंद्र उगवला तेव्हां शत्रू कोण व मित्र कोण हें समजूं लागलें. शाहाच्या ज्या नोकरांनीं प्रथमतः कटांतल्या लोकांस आंत घेतलें होतें ते आतां त्यांवर उठले, आणि ज्या गवती झोंपड्यांमध्यें ते लपले होते, त्यांस आग लावून देऊन त्यांतून जसे ते बाहेर पडत, तसे त्यांस कापून काढूं लागले. दुसरे ३०० दक्षणी एका खोलींत जमले होते, व उजाडल्यावर पळून जाण्याची संधि पाहात होते. सुलतान जाहांगीरखान तुर्क यानें वाड्याच्या वेशी आपल्या ताब्यांत घेतल्या, आणि खान जाहानास शहर व बाजार यांच्या बंदोबस्तास पाठविलें. आणि सरकारी पागेंतील घोडीं बाहेर काढून शाहाच्या मित्रांस वांटून दिलीं. सूर्य उगवल्यावर शाहा तक्तावर बसला, आणि विश्वास घातकी दक्षणी व हबशी लोकांच्या घरांत शिरून कांहीं भेद न करितां त्यांस ठार मारावें, आणि त्यांची जिनगी लुटावी, असा शाहानें

शाहास मारण्याचा यत्न होतो, व थोड्या परदेशी लोकांच्या योगानें तो फसतो.

+ याच्या भिंती अकीक दगडांच्या होत्या, व त्यांवरून हें नांव पडलें होतें.

परदेशी लोकांस हुकूम केला. एकसारखी तीन दिवसपर्यंत या हुकमाची बजावणी चालली, आणि शहरांत मोठा प्रळय झाला. शाहापाशीं माफीकरितां मध्यस्थी करण्याची कोणाची छाती होईना. शेवटीं शाहा मोहिब उल्ला याच्या मुलांपैकीं एकानें ही कत्तल थांबविण्याविषयीं विनंति केली व कत्तल एकदां थांबली.

सर्व दक्षणीलोकांस गारमारण्याचा शाहा हुकूम देतो.

या संकटांतून आपण मुक्त झालों म्हणून महंमुदशाहानें ४० दिवसपर्यंत मोग उत्साह केला, आणि शहरच्या रस्त्यांतून मोठ्या थाटानें त्यानें स्वारी काढिली, व त्यावेळीं रस्ते चांगले शृंगारिले होते. ज्या गच्चीवर जाऊन परदेशी लोकांस वर्दी देतां आली, ती गच्ची शुभकारक आहे, असें समजून तेथें एक सुंदर इमारत बांधविली, व त्या इमारतींत ऐष आरामींत व चैनबाजींत पूर्वीप्रमाणें काळ घालवूं लागला. राज्यकारभाराकडे मुळींच लक्ष न देतां त्यानें राज्यकारभार मर्जीतल्या लोकांवर सोंपविला. लाहोर, दिल्ली, इराण आणि खोरासान येथून गवय्ये, बजवय्ये, नाचे, नकल्ये आणि शाहानामा म्हणणारे लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्याजकडे येऊं लागल्या. शाहाचा कित्ता घेऊन गावांतील लोकही दुर्व्यसनांत निमग्न झाले. मोठ मोठे शाहाणे व म्हातारे यांनीं आपलीं उंचीं वस्त्रें कलालाच्या दुकानीं गाहाण ठेविलीं, त्याच प्रमाणें पाठशाळेंतील शिक्षकही हातांत दारूचे प्याले घेऊन झिंगूं लागले. प्रांतावरील तरफदार हुजूरची अशी अवस्था पाहून स्वतंत्रतेनें वागूं लागले, आणि जे हुजूरचे कामगार त्यांच्या इच्छेप्रमाणें वागत त्यांस मात्र कामावर ठेवून जे त्यांच्या स्वातंत्र्याकडे नाकें मुरडीत, त्यांस हांकून लावूं लागले. याचा परिणाम लौकरच उघड दिसूं लागला. तेलंगणचा सुभा आणि अमदाबादबेदर सभोंवतालचा कांहीं मुलूख शिवाय करून राज्यांतील कोणताच प्रांत शाहाच्या साक्षात् अमलाखालीं राहिला नाहीं. मलिक अहंमद बहिरीशिवाय इतर तरफदार शाहाचा अधिकार आपण अमान्य करीत नाहीं असें सांगत मात्र, परंतु कृति विपरीत करीत. जर कासिम बेरिदाच्या सल्यानें शाहा स्वारीस निघाला, आणि स्वारीपासून आपला कांहीं फायदा व्हावयाचा असला, तर मात्र तरफदार शाहाच्या स्वारीबरोबर निघत. परंतु त्यांची फौज इतकी असें कीं, तिजपुढें शाहाची फौज यःकश्चित दिसे. शाहा राजधानीस परत आला म्हणजे त्याचा हु-

कूम न घेतां निघून जात. शाहाच्या देखत उभें राहण्याचा आणि शाहास नेहमीं प्रमाणें उभें राहून लवून मुजरा करण्याचा अपमान टाळण्याकरितां या तरफदारांनीं कचेरीस येण्याचेंच टाकिलें. मलिक **अहंमद** बहिरीच्या मनांत शाहानें आपल्या बापास मारलें, म्हणून डंवचत होतें. शाहाच्या स्वारीबरोबर तो मुळींच येईनासा झाला, आणि अगदीं स्वतंत्र होऊन त्यानें **अहंमदनगर** शहर वसविलें. त्यानें राजचिन्हें धारण करून **युसफ आदिलखान** विजापूरचा तरफदार आणि **फत्तेउल्ला इमाद उल् मुल्क** वऱ्हाडचा तरफदार यांजकडे वकील पाठविले, आणि आपल्याप्रमाणें त्यांनींही स्वातंत्र्य धारण करून आपल्या नावानें खुतबा वाचवावा, अशी वकिलांकडून त्यांस शिफारस करविली. या प्रमाणें या तिघांनींही लौकरच स्वातंत्र्य धारण केलें.

**कासिम बेरिदानेंही** अमदाबादबेदरची तर्फ बळकाविली. आपल्या तर्फेंतील सर्व किल्यांवर आपल्या पदरचे लोक असावे, असें त्यास वाटलें. परंतु शाहाची फौज ते किल्ले बेरिदाच्या स्वाधीन करींना. शाहानें गुप्तपणें हुकूम दिल्यावरून किल्ले हवालीं करण्यास फौज नाकबूल करीत आहे, असें समजून शाहाचा अधिकार मुळींच न जुमानतां त्यानें ते किल्ले जबरीनें ताब्यांत घेण्यास यत्न केला. दोन वेळां त्यानें शाहाच्या फौजेचा पराभव केला, आणि शाहास राजधानींतून हांकून लावीत होता. इतक्यांत **दिलावरखान** हबशी बऱ्हाणपुराहून फौज घेऊन शाहाच्या कुमकेस आला. **निजाम उल् मुल्का**-

कासिम बेरिद शाहास हांकून देण्याचा यत्न करितो, परंतु फसतो.

चा राग झाल्यामुळें हा बऱ्हाणपुरास आश्रा घेऊन राहिला होता. **दिलावरखानानें कासिम बेरिदाचा** पराभव केला, तेव्हां तो गोंवळकोंड्याकडे पळाला, आणि त्याच्या पाठीस दिलावरखान लागला. परंतु ईश्वरी इच्छेनें मार्गांत एक संकट दिलावरखानावर आलें. दिलावरखानाची फौज मोठ्या नेटानें कासिमाचा पाठलाग करीत असतां कौलास नजीक त्याचा एक हत्ती मस्त झाला, आणि माहाताच्या अंकुशास न जुमानतां तो

---

+ महंमद गवान यानें जे नियम केले होते, त्यां प्रमाणें तरफदारांच्या स्वाधीन त्यांच्या मुलखांतील किल्ले नसत. आणि त्या किल्यांवर फौजेची नेमणूक हुजूरून होत असे.

मागें वळून फौजेंत शिरला, व त्यानें पुष्कळ लोकांस तुडवून मारिलें. तेव्हां दिलावरखानानें हातीं भाला घेऊन कांहीं लोकांसहवर्तमान त्या हत्तीस मागें वळविण्याकरितां यत्न करूं लागला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं हत्ती दिलावरखानाबरोबरच्या लोकांच्या आंगावर आला, तेव्हां ते लोक घाबरून पळाले, आणि दिलावरखानास हत्तीनें सोंडेंत धरून चिरडून टाकिलें. या गोष्टीची खबर कासिम बेरिदास समजतांच तो मागें वळला, आणि त्यानें विजयी फौजेवर हल्ला केला. ती फौज आपला सेनापति पडल्यामुळें इतकी नामर्द झाली होती कीं, ती लागलीच पळाली, व सर्व सामान सुमान कासिमबेरिदास मिळालें. बेरिदास प्रतिबंध करण्याचें सामर्थ्य आतां शाहापाशीं उरलें नसल्यामुळें शाहानें बेरिदास राजधानींत घेतलें, आणि दोघांमध्यें बाह्यात्कारी एकी झाली. बेरिदानें सर्व राज्यकारभार हातीं घेऊन महंमुदशाहास केवळ नामधारी करून सोडिलें. बेरिदशाही घराण्याच्या इतिहासास याच वेळेपासून इतिहासकारांनीं आरंभ केला आहे.

कासिम बेरिद सर्व राज्यकारभार हातीं घेतो.

विजापूर येथें युसफ आदिलखानाचा अधिकार दिवसें दिवस वाढत चालल्यामुळें कासिमबेरिद त्याचा हेवा करूं लागला, आणि त्यानें विजयानगरच्या राजास असें लिहिलें कीं, युसफ आदिलखानानें शाहाविरुद्ध बंड करून पादशाही किताब धारण केले आहेत. यास्तव जर राजसाहेब विजापुरावर स्वारी करितील, तर मुद्गल आणि रायचूर हे किल्ले शाहाकडून मी परत देववीन. विजयानगरचा राजा यावेळीं अर्भक बालक होता. त्यानें आपला प्रधान तिमराज यास मोठें सैन्य देऊन युसफ आदिलखानावर पाठविलें. तिमराजानें मोठी धुमाळी उडवून वरील दोन्ही किल्ले ताब्यां-

---

+ त्यावेळेसच बाहामिनी राज्याची वास्तविकपणें समाप्ति झाली. यापुढें कांहीं काळपर्यंत या घराण्यांतील राजे नांवाचे मात्र होते. जो मुलूख त्या घराण्याकडे राहिला होता, त्यावरील सर्व अधिकार प्रधानांनीं बळकाविला होता. सन १७१२ सालीं दिल्लीच्या गादीवर अवरंगझेबाचा नातू जहांदरशाहा बसला, तेव्हां मोंगलपादशाहीची हीच अवस्था झाली.

त घेतले. युसफ आदिलखान तिमराजाशीं तह करून कासिम बेरिदाचा सूड घेण्यास निघाला. तेव्हां मार्जी निजामउल् मुल्काचा मुलगा मलिक अहंमद याजपाशीं बेरिदानें कुमक मागितली, आणि त्यास असें लिहिलें कीं, माझा शत्रू युसफ आदिलखान यास माझ्या तर्फेतून हांकून देण्यास तुम्हीं सहाय्य कराल, तर कोंकण प्रांतांतील गोंवें, पन्हाळा, व मंगळूर हे किल्ले बाहादूर गिलनीच्या ताब्यांतून काढून तुमच्या स्वाधीन करण्याविषयीं शाहापाशीं मी आपलें वजन खर्च करीन. मलिक अहंमदानें यास रुकार दिला आणि फकीर उल् मुल्क ऊर्फ खवाजा जहान आणि त्याचा भाऊ झैनखान यांस परिंड्याहून आपल्याबरोबर येण्यास बोलाविलें, आणि त्यांसहवर्तमान तो अमदाबाद बेदराकडे निघाला. बेदर येथें कासिमबेरिद शाहास घेऊन त्यास मिळाला; आणि सर्व मिळून आदिलखानाच्या तोंडावर गेले. बेरिदानें शाहास सर्व सैन्याच्या मध्यभागीं ठेविलें, आणि स्वतः आघाडीस राहिला. खाजेजहान+ डाव्या बाजूस राहिला, आणि मलिक अहंमद उजव्या फळीवर राहिला. युसफ आदिलखानानें आपल्या फौजेची योग्य व्यवस्था केली. लढाई मोठ्या निकराची झाली. परंतु मध्यभागची फौज व खाजेजाहानाची डावीकडची फौज कचरल्यामुळें शाहाच्या फौजेचा पराभव झाला. अहंमद उल्मुल्क व युसफ आदिलखान यांचा पूर्वीं गुप्तपणें ठरल्याप्रमाणें समेट झाला, व ते दोघेही एकमेकांवर हल्ला न करितां आपापल्या मुलखीं परस्पर निघून गेले.

हिजरी सन ८११ (इ. स. १४१६) या सालीं गुजराथचा महंमुदशाहा यानें शाहाकडे वकील पाठवून असें कळविलें कीं, दक्षिण किनाऱ्यांवरील अमलदार बाहादूर गिलनी यानें गुजराथच्या व्यापाऱ्यांचीं पुष्कळ जाहाजें धरून लुटलीं आणि एवढा उपद्रव देऊन तृप्त न होतां आपला गुलाम याकूब हबशी यास २० लढाऊ जाहाजें देऊन माहिमावर* पाठविलें. याकुतानें तें बंदर लुटून उध्वस्त केलें. तेथील मशिदी व दुसऱ्या इ-

---

\+ खवाजा जाहान हेंच नांव खाजेजाहान असेंही लिहीत.

* मुंबई.

मारती जाळल्या, आणि सुरतेवरही स्वारी करण्याची दबकावणी दिली. दक्षणेंतून गेल्याशिवाय गुजराथच्या फौजेस बाहादूर गिलनीच्या मुलखावर स्वारी करितां येत नाहीं; आणि समुद्रांतून हवी तितकी फौज नेणें अशक्य आहे. म्हणून गिलनीचा हा दांडगेपणा व शिरजोरपणा शाहानें बंद करावा; परंतु तसें करण्यास शाहा नामर्द असल्यास गुजराथेंतून फौज पाठविण्याची तजवीज करणें जरूर पडेल. असेंही आणखीं वकिलांनीं कळविलें.

गुजराथचा शाहा महंमुदशाहाकडे वकील पाठवितो. इ. स. १४९२.

गुजराथच्या शाहाकडून हा खलिता येतांच महंमुदशाहा जागा झाला आणि बाहादूर गिलनीची खोड मोडून त्याचा बंदोबस्त करण्याचा त्यानें निश्चय केला. आपल्या जाहागीरदारांस फौज पाठविण्यास त्यानें हुकूम सोडिला. या प्रसंगीं कुमकेस न गेलें तर गुजराथच्या शाहाचा आपणावर राग होईल, आणि कुमकेस गेल्यानें बंडखोराच्या मुलखांत वांटा मिळेल. यास्तव शाहाचा हुकूम जाहागीरदारांनीं मान्य केला. युसफ आदिलखानानें कमालखानाबरोबर ५,००० स्वार शाहाच्या कुमकेस पाठविले. मलिक अहंमद ब्रहिरीनें तितकीच फौज मोतिबारखानाबरोबर पाठविली, आणि इमाद उल् मुल्कानें आपल्या पदरच्या एका मोठ्या सरदाराबरोबर कांहीं फौज पाठविली.

दरम्यान महंमुदशाहानें गिलनीस असा फर्मान पाठविला कीं, "आपला दोस्त गुजराथचा शाहा यानें तुजविषयीं फार कांगाव्या केल्या आहेत, व त्याचीं ठाणीं, जाहाजें, मालमत्ता व जे कैदी तूं घेतले आहेस ते सर्व तुला परत दिले पाहिजेत." एका विश्वासू जासुदाबरोबर हा फर्मान शाहानें पाठविला आहे, अशी खबर ऐकून, बाहादूरखानानें मिरज या शहरीं मार्गीतच त्यास अटकावून ठेवण्याविषयीं आपल्या कामगारांस हुकूम पाठविला, आणि शाहास जुमानलें नाहीं. तेव्हां महंमुदशाहानें कुच केलें आणि विलंब न लावितां गिलनीच्या मुलखाकडे फौजेसह तो निघाला. जमखिंडी[+] किल्यानजीक येऊन पोहोंचल्यावर तेलंगणचा तरफदार कुतुब उल्मुल्क यास त्या किल्यास

बाहादूर गिलनी बंड करितो व त्याच्या मुलखावर महंमुदशाहा स्वारी करितो.

+ जामकोंडा असें मूळांत दिसतें.

वेढा घालण्याविषयीं हुकूम दिला. परंतु कुतुब तलाव्याकरितां फिरतअसतां किल्याच्या तटावरून एक बाण येऊन तो सरदार मरण पावला. तेव्हां सुलतान कुली यास त्याचें काम व किताब देऊन त्याचा बडा दर्जा राखण्याकरितां वोंगीर, दुर्गी व तेलंगणचे दुसरे कांहीं तालुके शाहानें त्यास जाहागीर दिले. जमखिंडी किल्ला घेऊन युसफ आदिलखानाच्या हवालीं केला, व सर्व फौज संकेश्वरावर गेली. या ठिकाणीं बाहादूरखान राहात होता; परंतु हुजूरची फौज येऊन पोहोंचण्यापूर्वीच तो तेथून निघून गेला. त्या ठिकाणीं असलेल्या गिलनीच्या फौजेबरोबर तीन दिवस लढून हुजूरच्या फौजेनें तें स्थळ घेतलें. कारण त्या ठाण्याच्या बंदोबस्ताकरितां तटबंदीचीं वगैरे जीं कामें सुरू झालीं होतीं तीं अद्याप पुरीं झालीं नव्हतीं. नंतर कासिम बेरिदाच्या सल्यानें महंमुद शाहा मिरजेवर गेला. बाहादूरखानाच्या फौजेशीं मैदानांत लढाई होऊन तिचा पराभव झाला, व मोठी कत्तल उडाली. यांतून जे वांचले त्यांनीं किल्यांत जाऊन दरवाजे बंद केले. पुष्कळ दिवस पर्यंत किल्यासवेढा देऊन हुजूरची फौज बसली; तेव्हां दुसरीकडून कुमक मिळण्याची आशा नाहीं; असें पाहून सुभेदारानें दांतीं तृण धरून जिवदान मागितलें. कासिम बेरिदाच्या शिफारशीवरून शाहानें त्याचें मागणें कबूल केलें, आणि बाहादूरखानाचे २५ घोडे बेरिदास मिळाले. शिवाय त्याच वेळीं बाहादूरखानाच्या लोकांस असें अभिवचन देण्यांत आलें कीं, ज्यांची आमच्या पदरीं राहण्याची इच्छा असेल, त्यांस ठेवून बाकीच्यांस निघून जाण्यास मोकळीक मिळेल. परंतु त्यांस आपले घोडे व आपलीं हत्यारें मिळणार नाहींत. तेव्हां किल्ला हवालीं करून त्या बरोबर आपले घोडे व हत्यारें हवालीं केलीं; तरआपणास आपल्या सरदाराकडे जातां येणार नाहीं. यास्तव येथेंच आम्हीं मरूं, असें मोंगल शिपायांनीं उत्तर पाठविलें. त्यांचा इमानीपणा व धैर्य पाहून शाहानें त्यांची वाहावा केली, आणि त्यांचें म्हणणें कबूल करून त्यांस बाहादूरखानास जाऊन मिळण्यास त्यानें परवानगी दिली.

---

+ सुलतान कुली उर्फ कुतुब उल् मुल्क यानें गोंवळकोंडें येथें कुतुबशाहीची स्थापना केली.

\# या स्थळाचीं नांवें स्काट साहेबांनीं खोंगीर आणि टर्की अशीं दिलीं आहेत.

मिरजेचा किल्ला हस्तगत झाल्यावर शाहानें वाळव्याकडे कुच केलें. आणि इतक्यांत आपल्या मित्रांच्या सल्यानें बाहादूर गिलनीनें ख्वाजे निमतउल्ला गिलनी यास शाहाकडे पाठवून मी शरण आलों आहें; मला माफी करावी, असें कळविण्यास त्यास सांगितलें. कासिम बेरिदाचा रुकार घेऊन पुढील शर्तीवर बाहादूर गिलनीस माफी करण्याचें शाहानें वचन दिलें.' (१) बाहादूर गिलनीनें समक्ष येऊन माफी मागावी; (२) कांही रक्कम गुन्हेगारी द्यावी; (३) हत्ती नजर करावे; (४) शाहानें जिंकलेल्या ठाण्यांपैकीं कांहीं ठाणीं परत द्यावीं; आणि जो मुलूख त्याजकडे राहिला आहे तो कायम ठेवावा.' त्या प्रमाणें निमत उल्लानें बाहादुरास लिहिलें, आणि विलंब न करितां हुजूरच्या छावणींत येण्यास त्यास सल्ला दिली. परंतु बाहादूरास वाटलें कीं, शाहानें जें एवढें औदार्य दाखविलें, तें केवळ त्याच्या दुर्बलतेमुळेंच असावें, अशी मनाची समजूत घालून त्यानें माफीच्या शर्ती नाकबूल केल्या; व नंतर लौकरच त्यानें शाहाच्या बाजारबुणग्यांवर हल्ला करून त्याचसालीं अमदाबादबेदर येथें आपल्या नांवानें खुतबा वाचवावा, व दुसऱ्या सालीं गुजराथेंत तसेंच करावें, असा आपला बेत आहे, असा जिकडे तिकडे त्यानें पुकारा केला. या उद्धटपणाचा महंमुदशाहास फार राग आला आणि वाळव्याहून कोल्हारास जाऊन त्यानें तें ठाणें घेतलें. नंतर तो बाहादुराच्या पाठीस हात धुवून लागला. यामुळें खानाचा बखेडा होत होत तो रोजच्या रोज बलहीन होत चालला. शेवटीं आपल्या ताब्यांतील अति बळकट अशा पन्हाळा किल्यावर तो पळून गेला. त्या किल्यास वेढा देऊन बसण्याची शाहाची इच्छा नव्हती. म्हणून शाहानें कोल्हापुरास मुक्काम करून तेथून दाभोळ बंदरीं जावें, व समुद्रावर थोडी मौज मारावी, असा बेत केला. हें खानास समजतांच शाहास मार्गांत दगा करण्याकरितां दबा धरून बसावें असा बेत करून तो पन्हाळ्याहून निघाला. परंतु शेवटीं त्यास आपला हेतु अमलांत आणण्याची छाती झाली नाहीं, व तो तेथून पळाला. तेव्हां त्याचे पुष्कळ लोक त्यास सोडून शाहास जाऊन मिळाले. कासिम बेरिदाचा सल्ला घेऊन शाहानें परिंडे किल्याचा सुभेदार ख्वाजे जाहान यास प-

बाहादूर गिलनी माफी मागतो, व ज्या शर्तीवर माफी देण्याचें ठरतें त्या शर्ती नाकबूल करितो.

न्हाळ्यावर बाहादूरखानास आश्रय घेण्यास अडथळा करण्याकरितां पाठविलें. शाहा कोल्हापुरास आला, तेव्हां बरसात सुरू झाली होती. म्हणून त्यानें तेथेंच मुक्काम करण्याचा बेत केला.

बाहादूरखान आतां फार नम्र झाला, आणि ख्वाजे निमत उल्ला आणि मंजुद्दीन यांजपाशीं खालील मतलबाचा अर्ज लिहून हुजूर पाठविला. "जर कासिम बेरिद व दुसरे मुख्य सरदार यांच्या सहीशिक्क्यानिशीं हुजूरच्या हातचें माफीपत्र मिळेल, तर आपण समक्ष हुजूरच्या पायांपाशीं येऊन बाकीचें आयुष्य राजनिष्ठेनें सरकार चाकरी करण्यांत घालवीन." शाहानें त्याचें म्हणणें मान्य केलें, व त्याच्या मनांत कांहीं भीति असल्यास ती शांत करण्याकरितां कांहीं संभावीत लोकांस त्यास घेऊन, हुजूर येण्यासाठीं पाठविलें. ते बाहादूरखानाच्या छावणींत येतांच त्याचें नष्टचर्य त्यास शरण जाण्यास देईना, आणि त्यानें नवीन अडचणी काढिल्या; तेव्हां शाहानें ख्वाजे जाहानास पन्हाळ्याहून बोलाविलें; आणि त्यास दुसऱ्या कांहीं सरदारांबरोबर खानावर पाठविलें. बाहादूरखान २,००० स्वार व १५,००० पायदळ घेऊन हुजूरच्या फौजेशीं लढाई करण्यास उभा राहिला.

बाहादूर गिलनी ठार मारला जातो. एक मोठी लढाई झाली, तिजमध्यें तीर लागून बाहादूरखान मेला, आणि त्याची फौज पळाली. ख्वाजे जाहानानें बंडखोराचें डोकें कापून हुजूरच्या छावणींत आणिलें; तेव्हां शाहानें आपल्या आंगावरचा पोषाख देऊन ख्वाजे जाहानाचा सन्मान केला. आणि त्या लढाईंत येतलेले हत्ती व घोडे त्यास नजर केले.

ह्या जय मिळाल्यावर दोन तीन दिवसांनीं शाहा पन्हाळ्याचा किल्ला पाहण्यास गेला, आणि बाहादूरखानाचा भाऊ मलिक सय्यद याचें शांतवन करून त्यास हुजूर घेऊन येण्याकरितां मलिक ऐन उल् मुल्क गिलनी यास गोंव्यास पाठविलें. कासिम बेरिदाच्या सूचनेवरून बाहादूरखानाची सर्व जाहागीर मलिक् ऐन उल् मुल्क गिलनी यास दिली, आणि शाहा थोडे मुख्य सरदार घेऊन दाभोळ बंदरीं गेला. तेथें किनाऱ्याच्या बाजूनें मौजेकरितां कांहीं दिवस जलपर्यटण करून राजधानीस परत आला. परत येतांनां मार्गांत माजी महंमद् गवान यानें लावलेला काळा बाग या नांवाच्या एका बागेंत कांहीं दिवस राहिला होता. अमदाबाद येथें परत येऊन पोहोंचल्यावर शाहानें गुजरा-

थच्या महंमुदशाहाकडे नजरा देऊन वकील पाठविले. त्यामध्यें ५ म- ण मोत्यें, ५ हत्ती, आणि रत्नजडित एक कटार व दुसरे पुष्कळ जिन्नस होते. तसेंच कमालखान, सबदरखान व दुसरे बडे लोक यांस बाहादूरखानानें कैद केलें होतें, त्यांस सोडून दिलें. त्याचप्रमाणें गुजराथचीं २० जाहाजें व त्यांतील माल जो गिलनीनें घेतला होता, तोही परत दिला.

हिजरी सन ९०१ (इ. स. १४९९) सालीं सुलतान कुली कुतुब उल्मुल्क यास तेलंगणचा तरफदार नेमून गोवळकोंडें आणि वरंगूळ हे प्रांतही त्याच्या जाहागिरीस जोडिले. दस्तुरदिनारास सागर आणि कलबुर्गें यांवर सुभेदार नेमिलें. मोठमोठ्या कामगारांपाशीं जे मनसबदार असतात, त्यांच्या योगानें कामगारांचा अधिकार फार वाढतो. याकरितां दस्तुरदिनारापाशीं जे मनसबदार होते, त्यांस हुजूर बोलाविलें. यामुळें दस्तुरदिनारास राग येऊन तो व अझीझ उल्मुल्क दक्षणी या उभयतांनीं बंड केलें, आणि सात आठ हजार दक्षणी व हबशी लोक जमवून कलबुर्ग्याच्या आसपासचा कांहीं प्रदेश त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतला. यासमयीं महंमुदशाहानें युसफ आदिलखानाची कुमक मागितली. तेव्हां तो फौजेसह शाहास येऊन मिळाला. मैंदर्गी शहरापाशीं एक लढाई झाली. त्या लढाईंत बंडवाल्यांचा पराभव होऊन दस्तुरदिनारास कैद केलें. शाहानें दस्तुरदिनारास ठार मारिलें असतें. परंतु युसफ आदिलखानाच्या मध्यस्थीमुळें शाहानें त्यास माफी केली. इतकेंच नाहीं तर त्याच्या सुभेदारीवर त्यास पुनः नेमिलें. कांहीं बंडवाल्यांनीं सागर किल्यांत आश्रा घेतला होता. याकरितां शाहानें त्यास वेढा घालून किल्ला सर केला, आणि युसफ आदिलखानास दिला. यानंतर युसफ आदिलखान आपल्या राजधानीस परत गेला.

दस्तुर दिनार व अझिझ उल् मुल्क हे बंड करितात. इ. स. १४९९. हिजरी सन ९०१.

हिजरी सन ९०२ (इ. स. १४९६) या सालीं शाहाच्या मर्जीतले युसुफ दक्षणी, युरिशखान, मिरझा शमसुद्दीन व दुसरे कांहीं दक्षणी कामगार, व तुर्की कामगार+ यांनीं कासिमबेरिदाचा नाश करण्याची मसलत केली. या मसलतीची बातमी त्यास समजतांच त्यानें

---

+ हुजूरच्या फौजेवरील लष्करी कामगार.

त्यांस व त्यांच्या प्रवर्तकांस ठार मारिलें. या फाजील अमर्याद वर्तनामुळें शाहानें त्याची सगळा एक महिना गांठ घेतली नाहीं. शेवटीं शाहा मोहिबउल्ला यानें मध्यस्थी करून मोठ्या कष्टानें शाहाकडून त्यास माफी करविली, आणि नंतर त्यावर शाहाची पूर्ववत् मेहेरबानी झाली. आणि शाहा पुनः नेहमीप्रमाणें निरुद्योगी व बाहेरख्याली झाला.

कासिमबेरिदास मारण्याचा कट करितात, व तो बेत फसतो.

हिजरी सन ९०२ (इ. स. १४९७) या सालीं आपला १४ वर्षांचा पुत्र अहंमद याच्याकरितां युसफ आदिलखानाची कंन्या महंमुदशाहानें मागितली. यानंतर पुष्कळ बोलाचाली होऊन कलबुर्ग्यास लग्नसमारंभ होण्याचें ठरलें. त्याप्रमाणें शाहा कलबुर्ग्यास गेला, व तेथें युसफ आदिलखानानें मोठ्या थाटानें त्याची सरबराई केली. शाहाच्या छावणींतील अबदुल समी काजी यानें लग्नगांठ घातली; आणि नवरी १० वर्षीच्या वयाची झाली, म्हणजे शाहाजादा अहंमद याच्या हवालीं करावयाची, असें ठरलें. हा समारंभ चालला आहे तोंच दस्तुरदिनार व युसफ आदिलखान यांमध्यें कलबुर्गे शहराविषयीं कलह लागला. आदिलखान असें म्हणूं लागला कीं, कलबुर्गे शहर आपल्या अमलांतील असून शिवाय अलंद, गंजोटी आणि कल्याणी हीं शहरेंही आपल्या मुलखांतच सामील असलीं पाहिजेत. असें होईल तेव्हांच आपला मुलूख बेदरच्या मुलखास जोडला जाईल. दस्तुरदिनार असें म्हणूं लागला कीं, विजापूर मुलखाची भीमा नदी ही हद्द असावी, आणि कलबुर्गे, सागर व येतगीर हे परगणे आपल्यास सुभेदारींत यावे. शाहानें या भांडणांत हात घालण्याचें नाकबूल केल्यामुळें दस्तुरदिनार परिंड्यास गेला. कासिम बेरिद आदिलखानाच्या म्हणण्याविरुद्ध होता. म्हणून आदिलखान व बेरिद यांमध्यें मोठा कलह माजला. कुतुब उल् मुल्क आदिलखानास मिळाला, तेव्हां कासिमबेरिद घाबरला; आणि आपली फौज घेऊन अलंदास गेला. तेव्हां युसफ आदिलखानानें समारंभ तितकाच टाकून शाहास बरोबर घेतलें; आणि कुतुब उल्मुल्क, मलिकएलियास

युसफ आदिलखानाच्या कंन्येचें शाहाजाद्याबरोबर लग्न होतें; व आदिलखानाचा कासिमबेरिदाबरोबर कलह होऊन बेरिदाचा पराभव होतो. इ. स. १४९७.

आणि ऐन उल् मुल्क यांसह खानानें कासिमबेरिदावर कुच केलें. बेरिदाचा पराभव झाला, आणि तो परिंड्यास पळून गेला. येणेंकरून आदिलखानाच्या अधिकारास इतकी बळकटी आली कीं, त्याच्या देखत तक्तावर बसण्यास सुद्धां महंमुदशाहास ठीक वाटेना. युसफ आदिलखानाच्या वजनदारीनें सर्व सरदारांस त्यांच्या इच्छेप्रमाणें हक्क मिळाले, व ते आपापल्या मुलखीं परत गेले. फौज परत गेल्यावर कासिमबेरिद दरबारीं आला, आणि पेशवाईचें काम पूर्वीप्रमाणें करूं लागला. परंतु आपल्या दुर्दैवी पादशाहाशीं त्यानें अशा क्रूर रीतीनें वर्तन केलें कीं, बेरिद आपल्या परवानगीशिवाय शाहास पाणी सुद्धां पिऊं देईना.

हिजरी सन ९०४ (इ. स. १४९८) या सालीं आदिलखान बरोबर पुष्कळ फौज घेऊन दस्तुरदिनारावर स्वारी करण्यास कलबुर्ग्यास निघाला. तेव्हां दिनार तेथून पळून कासिमबेरिदाच्या मसलतीनें मलिक अहंमद बहिरी याजपाशीं अहंमदनगरास आश्रय घेण्यास गेला. व तेथें त्यास आश्रय मिळाल्यामुळें युसफ आदिलखानाचें कांहीं चालेना, म्हणून तो अमदाबादबेदरास गेला, व त्यानें या कामांत हात न घालण्याविषयीं मलिक अहंमदास शाहाकडून लिहविलें.

आदिलखान दस्तुरदिनारावरस्वारी करितो. इसवी सन १४९८.

हिजरी सन ९१० (इ. स. १४९९) या सालीं कासिम बेरिद मरण पावला, व त्याचा पुत्र अमीर बेरिद हा त्याचें काम पाहूं लागला. यानें आपल्या बापाहूनही जास्त अधिकार हातीं घेऊन महंमुदशाहाच्या हातीं जो कांहीं नांवाचा थोडा अधिकार होता, तोही काढून घेतला. कासिम बेरिद मेला,ही संधि साधून युसफ आदिलखानानें लागलीच दस्तुरदिनारावर हल्ला केला. उभयतांमध्यें लढाई झाली, तींत दिनार पडला, व त्याचा सर्व मुलूख आदिलखानास मिळाला. यानंतर थोड्याच दिवसांनीं युसफ आदिलखानानें शाहा हा किताब धारण करून शिया पंथाच्या मताप्रमाणें विजापूर येथें खुतबा वाचविण्यास सुरू केलें. सर्व हिंदुस्थानांत अशी गोष्ट पूर्वीं कधीं घडली नसल्यामुळें सर्व दक्षणी लो-

कासिम बेरिदाचा मृत्यु व अमीर बेरीद पेशवा होतो. इ. स. १५०४

युसफ आदिलखान आपणास शाहा म्हणवितो.

कांचीं मनें आदिलखानाविषयीं दूषित झालीं. आदिलखानावर सर्वांस उठविण्यास लोकांच्या मनाची प्रस्तुत स्थिति चांगली आहे, असें पाहून अमीर बेरिदानें महंमुदशाहाकडून कुतुब उल् मुल्क, इमाद उल् मुल्क आणि कोंडवंदखान यांस अशीं पत्रें लिहविलीं कीं; युसफ आदिलखानानें सेवाधर्म टाकून बंड केलें, इतकेंच नाहीं तर महंमदाच्या देशांत पाखंडी मतांची प्रवृत्ति केली. यास्तव खऱ्या धर्माभिमानी सर्व मुसलमानांनीं युसफ आदिल खानाच्या पारिपत्याकरितां हुजूरच्या फौजेस येऊन मिळावें. प्रत्येक पत्राच्या रकान्यावर त्यानें खालील पद्य लिहिलें- "तो ऐश्वर्याच्या भरांत इतका उन्मत झाला आहे कीं; त्याच्या नेत्रांस सूर्य केवळ परमाणुवत् दिसतो."

कुतुब उल् मुल्क तेलंगणच्या सरदारांसहवर्तमान विलंब न लावितां हुजूर आला, परंतु इमाद उल् मुल्क व कोंडवंद खान यांनीं कांहीं सबबी सांगून पाठविल्या. तेव्हां अमीर बेरिदानें मलिक अहंमद बहिरी याजपाशीं कुमक मागितली. त्यानें खाजे जाहान दक्षणी यास बेदरास पाठविलें, आणि तो शाहास येऊन मिळाला. मैदानांत अशा एकत्र झालेल्या जंगी फौजेशीं सामना करणें शाहाणपणाचें कृत्य होणार नाहीं असें पाहून, कलबुर्गा आणि अलंद या ठाण्यांवर दूरियाखान आणि फकीर उल् मुल्क तुर्क यांस ठेविलें, आणि आपला तान्हा मुलगा इस्माएलखान यास त्याच्या मातोश्रीसह विजापूर येथें कमालखान दक्षणी याच्या देखरेखीखालीं ठेविलें आणि आपण ५,००० निवडक स्वार घेऊन वऱ्हाडांत गेला. महंमुदशाहानें त्वरा करून त्याचा पाठलाग केला. इमाद उल्मुल्क याच्या छावणींत जाऊन युसफ आदिलखान पोंहोंचला. तेव्हां त्यास असें दिसलें कीं; आपणास रक्षण करण्याचा इमादाचा मनोदय दिसत नाहीं. कारण तेणेंकरून शाहाच्या सर्व फौजेची धाड आपणावर येईल, अशी त्यास भीति वाटत होती. तेव्हां आदिलखान बऱ्हाणपुरास गेला.

*शाहा आदिलखानावर स्वारी करितो.*

तेव्हां इमाद उल् मुल्कानें मलिक अहंमद याच्या मनांत असें भरवून दिलें कीं, केवळ विजापूर आपल्या ताब्यांत घेण्याकरितां युसफ आदिलखानाचा नाश करण्याची बेरिदाची इच्छा आहे. त्यापेक्षां तो दुसऱ्याचाही नाश करण्यास चुकणार नाहीं. यास्तव जे कुमकेस आले आहेत, त्यांनीं आपापल्या मुलखीं परत जावें; आणि शाहास एकट्या प्रधानाशीं हवें तसें वागूं

द्यावें, हें बरें असें मला वाटतें. मलिक **अहंमद** आणि **कुतुब उल् मुल्क** यांच्या मनांत हा विचार भरला, आणि ते एकाएकीं आपल्या फौजा घेऊन स्वमुलखास गेले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं **युसफ आदिलखानाच्या** तर्फे शाहाकडे एक अर्ज पाठविला; आणि खानास माफी करून खासा स्वारी राजधानीस परत जावी, अशी विनंति केली.

**अमीर** बेरिदाच्या चिथावणीवरून शाहानें ही विनंति मान्य केली नाहीं. दोघे बलाढ्य सरदार परत गेल्याचें ऐकून **इमाद उल् मुल्कास** परत जाऊन मिळण्यास **युसफ आदिलखानास** उमेद आली. नंतर त्या दोघांनीं शाहाच्या फौजेवर हल्ला केला. आपल्या छावणीचा बचाव करण्याजोगें आपल्यापाशीं सामर्थ्य नाहीं, असें समजून **अमीर बेरिद** शाहास घेऊन बेदरास पळून गेला. शाहाच्या छावणींतील लूट **आदिलखान** आणि **इमाद उल् मुल्क** यांनीं वांटून घेतली, व ते दोघे आपापल्या राजधानीस परत गेले.

युसफ आदिलखानाचा मृत्यु. इ. स. १५१०.

हिजरी सन ९१६ (इ. स. १५१०) या सालीं **युसफ आदिलखान** वारला. तेव्हां विजापूर घेण्यासाठीं **अमीर बेरिद** निघाला. परंतु त्याचे सर्व यत्न व्यर्थ जाऊन त्या घराण्याचा अधिकार दिवसेंदिवस वाढत चालला. हिजरी सन ९१८ (इ. स. १५१२) या सालीं **कुतुब उल् मुल्क** यानें स्वातंत्र्य धारण केलें, आणि शाहाचें नांव खुतब्यांतून काढिलें. तथापि तो दरसाल कांहीं नक्त ऐवज गुप्तपणें शाहास नजर पाठवीत असे.

कुतुब उल् मुल्क स्वतंत्र होतो. इ. स. १५१२.

हिजरी सन ९२० (इ. स. १५१४) या सालीं पादशाही तिजोरींतील कांहीं पैसा खर्च करून **अमीर बेरिदानें** मोठी फौज ठेविली. त्या फौजेसह शाहास घेऊन त्यानें कुच केलें, आणि **इस्माएलखानाच्या** लोकांकडून कलबुर्गी घेतलें, आणि त्यावर **दस्तुर दिनाराचा** पुत्र **जाहांगीरखान** यास नेमून त्यास **दस्तुर उल् मुल्क** हा किताब शाहाकडून देवविला. या सरदारानें फौज ठेवून भीमेच्या पूर्वेस सागरापासून नळदुर्गापर्यंत जे किल्ले आपल्या बापाच्या ताब्यांत होते, ते सर्व परत घेतले. मलिक **अहंमद** व **कुतुब उल् मुल्क** यांजकडून कुमक मिळाल्यावर **अमीर बेरिद** २०,००० फौज घेऊन नदी उतरला, आणि विजापुरावर स्वारी करण्यास पुढें गेला. **इस्माएलखानानें** शहरानजीक त्याच्याशीं ल-

दाई केली, आणि त्याचा इतका पराभव केला कीं, त्याची फार धांदल उडून तो पळून गेला. घोड्यावरून पडून महंमूदशाहाचें आंग ठेंचून गेलें होतें; यामुळें तो व त्याचा पुत्र शाहाजादा अहंमद हे रणामध्यें निराश्रित राहिले, व कैद झाले. ज्यांच्या माथीं किरीट आहे, अशा राजेलोकांस जितका मान द्यावयाचा तितका देऊन इस्माएल आदिलशाहानें त्याची फार बडदास्त राखिली, व त्याच्या मोठ्या दर्जास योग्य अशा सर्व सोयी केल्या.

त्याचा पराभव होऊन शाहा मुलासुद्धां कैद होतो.

यानंतर थोड्याच दिवसांनीं महंमुदशाहा इस्माएल आदिलखानाबरोबर कलबुर्ग्यास गेला, आणि पुर्वी ठरल्याप्रमाणें शाहाजादा अहंमद व इस्माएल आदिलखानाची बहीण बिबी मशिटी यांचा विवाह मोठ्या समारंभानें झाला. शाहास पोहोंचविण्यासाठीं इस्माएलानें ५,००० स्वार बरोबर दिले. त्यांसहवर्तमान शाहा अमदाबाद बेदरास येतांच अमीर बेरीद तेथून निघून आवशाच्या किल्यावर गेला. महंमुदशाहानें राजधानी आपल्या ताब्यांत घेतली. इतक्यांत अमीर बेरिदास माजी मलिक अहंमद याचा मुलगा बुऱ्हाण निजाम उल् मुल्क याजकडून सहाय्य मिळाल्याचें इस्माएलाच्या कामगारांनीं ऐकतांच ते शाहास सोडून निघून गेले. तेव्हां अमीर बेरिद परत आला, आणि त्यानें शाहास पूर्वीपेक्षां अधिक प्रतिबंधांत ठेविलें.

आपल्या दुर्दैवी स्थितीचा महंमुदशाहास कंटाळा येऊन तो पळून वऱ्हाडप्रांतांतील गावळास गेला. तेथें इमाद उल् मुल्क याचें सहाय्य मिळवून त्यासहवर्तमान राजधानीकडे आला. अमीर बेरिद बेदरच्या किल्याचे दरवाजे बंद करून आंत राहिला, आणि त्यानें बुऱ्हाण निजाम उल् मुल्काकडे कुमक मागितली. त्यानें ख्वाजे जाहान यास बरीच फौज देऊन बेदरास पाठविलें.

अमीर बेरिदानें बुऱ्हाणाची फौज घेऊन इमाद उल् मुल्काच्या फौजेवर हल्ला केला. तो लढाई देण्याच्या तयारीनेंच होता. तो लागलाच लढाईस उभा राहिला. या वेळीं महंमुदशाहा स्नान करीत होता. आणि शत्रू लढाईस आल्याची खबर कळविण्यास इमादानें ज्या जासुदास पाठविलें होतें, तो उद्धटपणानें शाहास ऐकूं येण्याजोगें म्हणाला कीं; अशा आणीबाणीच्या वेळीं जर शाहा अशा क्षुल्लक का-

मांत गुंतून राहील, तर आपल्या सरदारांच्या थट्टेस पात्र होईल, यांत आश्चर्य नाहीं. हे शब्द शाहाच्या मनास टोंचले, आणि इमादाच्या फुशीवरूनच जासूद बोलला असेल असें शाहास वाटून त्यास फार राग आला. तो स्नान आटपून लौकरच सैन्यांत जाऊन लढाईस उभा राहिला. परंतु एकाएकीं घोड्यास टांच मारून **अमीरबेरिदाच्या** सैन्यास जाऊन मिळाला. हें पाहतांच **इमाद उल् मुल्क** मागें वळून मोठ्या त्वरेनें आपल्या मुलखीं निघून गेला, आणि **अमीर बेरिद** शाहास घेऊन मोठ्या विजयानें राजधानीस परत आला.

बुशीरखानाबरोबर लढाई. इसवी सन १५१७.

महंमूदशाहाचा मृत्यु. तारीख २१ आक्टोबर सन १५१८ इ.

**अमीर बेरिदानें** शाहास अशा बंदोबस्तानें कैदेंत ठेविलें कीं, त्यास कधीं पळून जातांच येऊंनये. शाहा वारंवार निराश होऊन कंटाळून गेला होता, व फार म्हातारा होऊन थोडा बुद्धिहीन झाला होता. यामुळें त्यानें अधिकाराचा नाद सोडून दारूबाजींत व रंडीबाजींत काळ घालवून पादशाही थाटाच्या उपभोगांतच तृप्त राहूं लागला. हिजरी सन ९२३ (इ. स. १५१७) या सालीं शाहास घेऊन **अमीरबेरिदास बुशीरखाना** विरुद्ध माहुराकडे स्वारीस जावें लागलें. बुशीरखानाशीं जी लढाई झाली, तिजमध्यें **बुशीरखान** आणि त्याचा मुलगा असे दोघेही पडले, आणि माहूर प्रांतावर **घलीबखानास** नेमिलें. तिकडून परत आल्यावर हिजरी सन ९२५ (इ. स. १५१८) या सालीं जिल्हेजच्या चवथ्या तारखेस दुसरा **महंमुदशाहा** मरण पावला. वरचेवर संकटें व दुःखें भोगीत ३७ वर्षे २० दिवस यानें राज्य केलें.

---

# अहंमदशाहा बाहामिनी. (दुसरा.)

इसवी सन १५१८ ते १५२० प.

महंमुद शाहाचा मुलगा अहंमदशाहा गादीवर बसतो, सर्व सत्ता अमीर बेरिदाच्या हातीं राहून शाहा केवळ नामधारी होऊन नेमणूक खाऊन राहतो.— आपल्या निर्वाहासाठीं पादशाही किरीटाचें जवाहीर विकतो.— या कृत्यांत सामील असणाऱ्या पुष्कळ लोकांस अमीर बेरिद ठार मारितो.— खरेदी घेणारे विजयानगरास पळून जातात.— शाहाचा मृत्यु.

---

अमीर बेरिदाच्या ताब्यांत फार थोडा मुलूख होता. याकरितां जर उघडपणें स्वातंत्र्य धारण केलें, तर आसपासचे अधिकारी कदाचित् आपणावर हल्ला करतील, म्हणून त्यानें महंमुदशाहाचा पुत्र अहंमदशाहा यास तक्तावर बसविलें. त्यास राहण्यास महाल दिला. त्याच्या उपयोगाकरितां पादशाही जवाहीर दिलें, आणि निर्वाहाकरितां रोजीं नेमणूक करून दिली. त्या नेमणुकींत त्याचा खर्च भागेना म्हणून त्यानें आपला चार लाख होन (१६,००,००० रुपये) किंमतीचा किरीट मोडून त्यांतील जवाहीर गुप्तपणें विकलें. प्रधानास याची खबर कळतांच या कृत्यांत सामील असलेल्या पुष्कळ गवई व इतर लोक यांस ठार मारिलें, परंतु विकत घेणारे विजयानगरास पळून गेले.

अहंमदशाहा तक्तावर बसतो, व सर्व सत्ता बेरिद बळकावतो.

आपले जे हाल होतात त्यांविषयीं कागाळी अहंमदशाहानें इस्माएलाकडे केली. तेव्हां इस्माएलानें नजर देऊन शाहाकडे वकील पाठविले; परंतु वकील येऊन पोंहोंचण्यापूर्वीच अहंमदशाहा दुसरा हिजरी सन ९२८ या सालीं मरण पावला. हा शाहा सारीं २ वर्षे गादीवर होता.

अहंमदशाहाचा मृत्यु. इ. स. १५२०.

---

# अल्लाउद्दीन शाहा बाहामिनी. (दुसरा.)

इसवी सन १५२० ते १५२१ पर्यंत.

---

अल्लाउद्दीनशाहास अमीरबेरिद तक्तावर बसवितो.— हा माजी शाहा सारखा दुर्व्यसनी नसल्यामुळें काम पाहूं लागतो.— तो प्रधानास धरण्याचा कट करितो.— तो उघडीस येऊन सहाय्यकर्ते प्राणास मुकतात.—शाहा पदच्यूत होतो, व कैदेंत पडतो.

---

**अहंमदशाहा** वारल्यावर सुमारें १४ दिवस अमीर बेरिदानें तक्त रिकामें ठेविलें. परंतु नंतर तक्तावर स्वतः बसण्यापेक्षां बाहामिनी घराण्यांतीलच एका पुरुषाच्या माथीं ठेवावें, हें बरें, असें त्यास वाटून त्यानें **अल्लाउद्दिनास** पसंत करून त्यास तक्तावर बसविलें.

अल्लाउद्दीनशाहा तक्तावर बसतो.

हा शाहजादा उपजत मोठा हुषार व समंजस होता. माजी शाहाच्या दुष्ट व्यसनांपासून काय परिणाम झाले, हें जाणून कोणत्याही दुर्व्यसनांत किंवा छंदांत न पडतां **अमीरबेरिदावर** आपली छाप बसविण्याकडे त्यानें आपलें मन लाविलें. त्याच्याशीं तो इतक्या सख्यत्वानें वागूं लागला कीं, तो स्वतः सावध राहीनासा झाला. नंतर शाहानें त्याच्या बसण्या उठण्याच्या दिवाणखान्यानजीक कांहीं हत्यारबंद लोकांस गुप्तपणें ठेवून दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं तो भेटीस आला म्हणजे त्यास कैद करण्याचा शाहानें निश्चय केला. नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें आपल्या मुलास घेऊन बेरिद शाहाच्या भेटीस आला. तेव्हां दडलेल्या लोकांपैकीं अकस्मात् एक असामी शिंकला, व त्यावरून त्यास अंदेशा आला. आणि मागें फिरून आसपास कोणी आहेत कीं काय? याचा तपास करण्यासाठीं त्यानें पाहारेकऱ्यास सांगितलें, तेव्हां सर्व कट उघडीस येऊन जे त्यांत सामील होते त्यासर्वांस बेरिदानें ठार मारिलें. आणि शाहास पदच्यूत करून कैदेंत टाकिलें. व **वल्लीउल्ला** यास गादीवर बसविलें.

शाहा राज्यकारभार आपल्या हातीं घेतो.

प्रधानास धरण्याचा कट.

कट उघडीस येऊन सहायकर्ते प्राणास मुकतात.

अल्लाउद्दीनशाहा कैद होतो. इ.स.१५२१.

---

## वल्लीउल्ला शाहा बाहामिनी.

### इ. स. १५२१ ते १५२४ पर्यंत.

---

दुसरा महंमुदशाहा याचा पुत्र वल्लीउल्ला यास तक्तावर बसवितो.— अमीरबेरिदाचें राणीवर प्रेम बसतें.— तो शाहास वीष घालून मारितो. व विधवा राणीशीं लग्न करितो.

---

वल्ली उल्लाशाहा तक्तावर बसतो.

अमीर बेरिदाचें राणीवर प्रेम बसतें, व तो शाहास वीष घालून मारितो.

इ. स. १५२४

अल्लाउद्दिन शाहास पदच्यूत केल्यावर अमीरबेरिदानें दुसरा महंमुदशाहा बाहामिनी याचा दुसरा पुत्र वल्ली उल्ला यास तक्तावर बसविलें. यास जी नेमणूक करून दिली. त्यांत संतुष्ठ राहून राज्यकारभारांत कोणत्याही प्रकारची यानें ढवळाढवळ केली नाहीं. परंतु शेवटीं पारतंत्र्यास कंटाळून थोडीशी मोकळीक मिळविण्याकरितां तो खटपट करूं लागला. तेव्हां अमीरबेरिदानें त्यास महालांत कैद करून ठेविलें. हा तक्तावर बसल्यावर सुमारें ३ वर्षांनीं अमीर बेरिद शाहाच्या बायकोवर फिदा होऊन त्यानें शाहास वीष घालून ठार मारिलें, आणि त्याच्या विधवा राणीशीं अमीर बेरिदानें लग्न केलें.

---

## कलीमउल्ला शाहा बाहामिनी.

### इ. स. १५२४ ते १५२६ पर्यंत.

---

कलीमउल्ला यास शाहा ही नांवाची पदवी देऊन राजधानींत कैदेंत ठेवितो.— तो आपल्या एका स्नेह्यास आपला वेष देऊन ज्याबाबरानें यावेळीं हिंदुस्थानावर स्वारी केली होती, त्याजकडे पाठवितो.— अमीर बेरिदास ही बातमी कळते.— तो शाहास अधिक कडक कैदेंत ठेवितो.— शाहा

कैदेंतून सुटतो, आणि आपला मामा इस्माएल आदिलशाहा याजकडे आश्रा घेतो.— तेथें जो सत्कार झाला तो न आवडून तो अहंमदनगरास पळून जातो, व तेथें मरेपर्यंत राहतो.— बाहामिनी घराण्याचा लय.

---

**वलीउल्ला** मरण पावल्यावर **युसफ आदिलशाहा**च्या मुलीच्या पोटचा **अहंमदशाहा**चा मुलगा **कलीमउल्ला** यास शाहा हा किताब देण्यांत आला. यास शाहा या पदवीशिवाय कांहीं उरलें नव्हतें, व त्यास महालांतून बाहेर पडण्यास सुद्धां मोकळीक नव्हती. हिजरी सन ९३३ (इ.स.१५२६) साली **बाबर पादशाहा**नें दिल्ली जिंकिली, तेव्हां **इस्माएल आदिलशाहा**, **बुऱ्हाण निजामशाहा** आणि **कुतुबशाहा** यांनीं त्याजकडे वकील पाठविले. तेव्हां **कलीमउल्ला शाहा**नें आपल्या एका सोबत्यास वकिलाचा वेष देऊन पादशाहाकडे अर्ज देऊन पाठविलें. त्या अर्जांत त्यानें असें लिहिलें होतें कीं, माझ्या बंडखोर नोकरांनीं माझें सर्व राज्य घेऊन मला कैदेंत ठेविलें आहे. मला या दुःखदायक स्थितींतून पादशाहा मुक्त करतील, तर मी दौलताबाद व वऱ्हाड हे दोन प्रांत पादशाहास देईन. बाबराचा अंमल जिंकलेल्या प्रांतावर पूर्ण बसला नव्हता, व त्यास अद्याप मध्य प्रदेशांतील माळवा व गुजराथ या दोन प्रांतांवरील राजांस जिंकावयाचें होतें. म्हणून त्यानें या विनंतीकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु ही गोष्ट अमीर बेरिदास समजतांच त्यानें शाहास अधिक प्रतिबंधांत ठेविलें. तेव्हां तो पळून विजापुरच्या **इस्माएल आदिलशाहा**कडे गेला. (कलीमउल्ला बेदराहून पळून गेल्यावर अमीर बेरिद राजचिन्हें स्वतंत्रपणें धारण करूं लागला.) तेथें त्यानें त्याचा फार सन्मानपूर्वक सत्कार केला. कारण त्याच्या नांवावर आपलें कार्य साधून घ्यावें अशी त्यास इच्छा होती. परंतु येथें झालेला सत्कार शाहास आवडला नाहीं, आणि तो तेथून अहंमदनगरच्या **बुऱ्हाण निजामशाहा**कडे गेला. त्यानें आरंभीं त्याचा इतका मान राखिला कीं, तो शाहापुढें कधीं बसत नव्हता. परंतु असा मान दिल्यानें आपल्या पा-

कलीमउल्लास शाहा हा किताब देऊन कैदेंत टाकितो. इ.स.१५२५.

शाहा बाबराकडे आपल्या एका स्नेह्यास वकिलाचा वेष देऊन पाठवितो. इ.स.१५२६.

शाहा अहंमदनगरास जातो, व मरेपर्यंत तेथेंच राहतो.

दशाहीपणांत कमतरता आहे, असें मानल्यासारखें होईल, असें समजून त्यानें ती वहिवाट बंद केली. कलीम उल्लाशाहा आमरणपर्यंत अहंमदनगरास राहिला, व त्याजबरोबर बाहामिनी घराण्याची समाप्ति झाली. या पूर्वींच दक्षणच्या बाहामिनी राज्याचीं पांच पृथक् राज्यें झालीं होतीं. तीं येणेप्रमाणें:— (१) विजापुरचें आदिलशाही राज्य. (२) गोंवळकोंड्याचें कुतुबशाही राज्य. (३) वऱ्हाडचें इमादशाही राज्य. (४) अहंमदनगरचें निजामशाही राज्य. आणि (५) अमदाबाद बेदरचें बेरिदशाही राज्य.

बाहामिनी घराण्याचा लय. इसवी सन १५२६.

---

याप्रमाणें या बाहामिनी (ब्राम्हणी) राज्यरूपवृक्षाचें बीजारोपण कोणी व कसें केलें; वृक्ष हळूहळू वाढत जाऊन कसा बळावला, त्यास विस्तार किती फुटला; पुढें तो विस्तार बळावून त्याचेच निराळे कसे प्रचंड वृक्ष बनले, याविषयीं सर्व हकीकत वर दिली. बाहामिनी राज्य बहुतेक मोठ्या वैभवानें दक्षणेंत सन १३४७ पासून सन १५२६ पर्यंत म्हणजे १७९ वर्षेपर्यंत होतें. इमादशाही म्हणजे वऱ्हाडचें राज्य, निजामशाही म्हणजे अहंमदनगरचें राज्य, आदिलशाही म्हणजे विजापुरचें राज्य, कुतुबशाही म्हणजे गोंवळकोंड्याचें राज्य. आणि बेरिदशाही म्हणजे बेदरचें राज्य, अशीं ब्राम्हणी राज्याचीं पांच स्वतंत्र राज्यें बनलीं. या पांचही राज्यांचा इतिहास पृथक्पृथक् दिला आहे. आतां बाहामिनी राज्याच्या कारकीर्दींत दक्षणेंत लोकस्थिति व देशस्थिति कशा होत्या याविषयीं थोडेंसें सांगून हें प्रकरण आटपितों.

पर्यवसान.

एवढें हें मोठें मुसलमानी राज्य दक्षणेंत सुमारें दोनशें वर्षें होतें; परंतु याचें नांवसुद्धां हिंदुस्थानच्या कित्येक इतिहासांत आढळत नाहीं. याविषयीं माहिती आमच्या एतद्देशीय विद्वानांससुद्धां फारशी नसते. असो. यादवांच्या मागून दक्षिणहिंदुस्थानांत मुसलमानांचें बाहामिनी राज्य आणि हिंदूंचें विजया नगरचें राज्य अशा दोन राज्यांचा अंमल होता. बाहामिनी राज्य स्थापन झालें तेव्हां विजयानगराशिवाय वरंगूळ, ओरिसा व कोंकणपट्टी यांत कित्येक स्वतंत्र हिंदुराजे होते. त्या सर्वांस बाहामिनी राजां-

नीं जिंकून नर्मदेपासून तहत तुंगभद्रेपर्यंत एकसाहा अंमल बसविला होता. गुजराथ व माळवा या देशांवर स्वतंत्र मुसलमानराजे होते. परंतु त्यांचीं राज्यें व अधिकार फार लहान होते. त्या काळीं साऱ्या हिंदुस्थानांत जीं तीन बलिष्ठ राज्यें होतीं, त्यांपैकीं बाहामिनीराज्य एक असून अधिकाराने व संपत्तीनें दिल्लीच्या राज्याच्या बरोबरीचें होतें. या राज्याकडे दिल्लीच्या राजांस करड्या नजरेनें ढुंकूनसुद्धां पाहण्याचें सामर्थ्य नव्हतें. या राज्याचा पसारा हळू हळू इतका वाढत गेला कीं, तो शेवटीं आवरेना. जिंकिलेल्या मुलखाचा बंदोबस्त करून त्यांत व्यवस्था झाल्यावर नवीन देशावर स्वारी करावी, हा नियम मुळींच न ठेवितां कांहीं क्षुल्लक कारण उत्पन्न झालें, किंवा यःकश्चित् प्रसंग आला कीं, करा स्वारी, जिंका प्रांत आणि कोणत्या तरी तरफदारींत करा सामील, असा क्रम चालला. अल्लानें मूळारंभीं आपल्या राज्याचे जे चार विभाग केले होते, तेवढेच विभाग थेट गवानाच्या कारकीर्दीपर्यंत होते. त्याच्या वेळेपर्यंत राज्य दुप्पट तिप्पट वाढलें होतें. त्यानें सर्व राज्याच्या आठ तर्फा केल्या, व राज्याच्या बळकटीस पुष्टिकारक अशाही कांहीं सुधारणा केल्या. जे तरफदार नेमिले जात, ते केवळ आपापल्या तरफांचे मूर्तिमंत राजे असत. त्यांजकडे त्या तरफा जाहागिरी दाखल चालत असत. त्यांजकडे दिवाणी, मुलकी, फौजदारी वगैरे अधिकारांशिवाय सर्व किल्ले व सैन्य असे. कुराणाशिवाय दुसरे कायदेकानू कांहीं नसत. मुख्यस्थानीं दाद तितपतच. यामुळें तरफदार मन मानेल त्याप्रमाणें अधिकार चालवीत. तरफदारांस नक्त पगार नसून त्यांच्या वेतनाकडे जाहागिरी दिल्या होत्या. या प्रमाणेंच बहुतेक कामगारांस मुलूख व जमिनी तोडून दिल्या होत्या, व त्यांवरील बहुतेक अधिकार त्यांजकडे असत. राज्याचा पसारा अफाट वाढून जेव्हां तर्फेचीं मुख्य ठिकाणें राजधानीपासून लांब झालीं, तेव्हांपासून तर तरफदारांस स्वतंत्रपणें अधिकार चालविण्याची हळूहळू अधिकाधीकच चट लागूं लागली. तरफदारांस दरसाल आपल्या तर्फेचा हिशेब अर्धवटच द्यावा लागे. शाहाची कधीं कधीं अवज्ञा करावी, हुकुमाशिवाय जास्त फौज ठेवावी, हुजूरून नेमलेल्या कामगारांस दूर करावें, हुजूर आज्ञेशिवाय एखाद्या प्रांतावर स्वारी करून लूट सुलतानाकडे पाठवावी. अशा गोष्टी जशा हळूहळू पचत चालल्या तसा त्यांस अधिकाधिक धीर येऊं लागला. जोंपर्यंत राजा खंबीर व शहाणा असून त्याजवळ सैन्य व द्रव्य मुबलक असे तोंपर्यंत यांची लटपट चालत नसे.

परंतु दरबारीं फव्वा झाल्या किंवा व्यवस्था दिली पडली कीं आपले मनोरथ पूर्ण होण्याची त्यांस आशा येई. तरफदार स्वतंत्राधिकारी होण्याचीं चिन्हें निजामशाहा अल्पवयांत सन १४६२ सालीं गादीवर बसला तेव्हांच ढळढळीत दिसूं लागली होतीं. तशांत वंशपरंपरोपभोग्य राज्यक्रमांत कधीं कधीं दुर्बळ राजेही निपजावयाचे, व त्यावेळीं अशांस फावावयाचें. निजाम व महंमद हे दोन राजे जरी अल्पवयीच गादीवर बसले तरी त्यांस ख्वाजेखान महंमद गवानासारखा मंत्री मिळाल्यानें तो प्रसंग त्याणें आणूं दिला नाहीं. इतकेंच नाहीं तर त्यानें आपल्या कारकीर्दींत आणखीं राज्य वाढवून जीं दुश्चिन्हें दिसूं लागलीं होतीं तीं टाळण्याकरितां राज्यव्यवस्थेंत पुष्कळ फेरफार करून अशा अफाट राज्यांत देखील बंदोबस्त ठेवण्याची त्यानें योजना केली. तेव्हां स्वाभाविकच आपली मनोरथसिद्धि लांबत जाऊन दुरापस्त होण्याची धास्ती त्यांस पडली. तेव्हां त्यांनीं अनेक युक्त्या लढवून तो कंटकच नाहींसा केला; आणि नंतर त्याणीं एकामागून एक असे स्वतंत्र अधिकार धारण केले. याप्रमाणें जी इमारत बांधण्यास १५० वर्षें सतत यत्न करावा लागला, व लक्षावधी प्राणी बळी द्यावे लागले, त्या इमारतीचे २०।२५ वर्षांत तुकडे तुकडे झाले. ज्या सालीं ब्राह्मिनी राज्याची अगदीं अखेर समाप्ति झाली, त्याच सालीं **बाबरानें** हिंदुस्थानांत मोंगलांचें राज्य स्थापन केलें. हें राज्यही वाढत वाढत **अवरंगजेबाच्या** वेळीं अतिशय वाढलें. अफाट राज्याचा साहचारी ढिलेपणाच-हूंकडे होऊन अवरंगजेबाच्या मागून दक्षणेंत **निजाम**, **अयोध्येंत** व **बंगाल्यांत** तेथचे सुभेदार याप्रमाणें एकामागून एक स्वतंत्र होऊन सर्व इमारत ढांसळली. मोंगलांमागून मराठी राज्य भरभराटलें. ज्या राज्याचा पाया **शिवाजीनें** घातला, त्याचे वंशज एकीकडे राहून त्यांचे पेशवे पुढें सरसावले. आणि **बाळाजी बाजीरावाच्या** कारकीर्दींत मराठी राज्य इतकें अफाट वाढलें, व त्यानें इतक्यांस जाहागिरी दिल्या कीं, ते जाहागीरदारच तेथचे तेथें राजे बनून पेशव्यांस जुमानीनातसे झाले. मराठेशाही **माधवराव बल्लाळाच्या** अखेरीसच बुडावयाची; पण पेशव्यांचे दरबारीं गवानासारखा **नाना फडणवीस** हा दिवाण होता म्हणून आणखीं कांहीं वर्षें राहिली. परंतु अखेर मराठी राज्याचा शेवट बहुतेक ब्राह्मिनी राज्यासारखाच झाला, व इंग्रजांस आयतेंच फावलें. हीच पूर्वीं चालुक्यांच्या रा-

ज्याची अवस्था झाली. याचीं कारणें काय असावीं व राज्याच्या शाश्वतीस काय गोष्टी अवश्य आहेत; याचा विचार करूं लागलें म्हणजे बाहामिनीराज्याच्या ऱ्हासांचीं कारणें पुढील असावींत असें दिसतें.

(१ लें.) मुख्यकारण मोठमोठे जाहागीरदार होत. मोठ्या जाहागिरी देऊन त्यांवरील सर्व प्रकारचे अंमल जाहागीरदारांस देणें म्हणजे केवळ त्यांस स्वातंत्र्याची आपणहोऊन गोडी लावण्यासारखी आहे. सर्व वसूल त्यांच्या हातीं, सर्व सैन्य त्यांच्या आज्ञेंत, सर्व किल्ले त्यांच्या ताब्यांत, दिवाणी, फौजदारी वगैरे अंमल, धर्मशास्त्राप्रमाणें मनमानेल तसा चालविण्यास मोकळीक. इतकी सामुग्री ही केवळ वेड्याच्या हातीं जळकें कोलीत दिल्यासारखें होय. असे कायम कामगार पदरीं आले कीं, राज्यास त्यांपासून अपाय व्हावयाचाच, असें प्राचीन व अर्वाचीन इतिहासांवरून सिद्ध होतें. केवळ यःकश्चित नोकरासुद्धां वंशपरंपरागत असले, म्हणजे त्यांपासून उपद्रव होतो. मग मुलखांचे मुलूख तोडून ज्यांस कायम दिले आहेत असे नोकर त्रास देतील हें उघडच आहे. तर बाहामिनीराज्यास नाशकारक मुख्य जाहागीरदार झाले.

(२ रें.) मोठमोठ्या तरफांवर कायम नोकर नेमणें हेंही राज्यास अनिष्टकारक आहे. मोठ्या मुलखावरच्या अधिकाराचा उपभोग आपणास कायम राहणार हाच विचार मनांत दुष्टबुद्धि उत्पन्न करणारा आहे. दूरदर्शी राजा कोणास कायमचा अधिकार मोठ्या प्रांतावर कधीं सहसा देणार नाहीं, व त्यानें देऊंनये. जशा वेतनाबद्दल जाहागिरी देऊंनयेत, त्याचप्रमाणें मोठा अधिकार कायमचा देऊंनये. मोठे अधिकारी नियमितकालपर्यंत नेमणें यांतच शाहाणपण आहे.

(३ रें.) यःकश्चित नोकरापासून तें थेट मुख्य दिवाणापर्यंत सर्व कामगारांची वहिवाट एकसारखी राहण्याकरितां व त्यांवर निर्बंध व भीति राहण्याकरितां राज्यास ठरीव कायदे कानू असले पाहिजेत. धर्मशास्त्रें ईश्वरप्रणीत म्हणून पूर्ण आहेत अशी ज्यांची समजूत असेल, त्यांची असो. परंतु अनुभवास त्यांची पूर्णता कांहीं येत नाहीं; व त्याचा अर्थ शास्त्रवेत्ते हवा तसा करितात. मोठे कामगार कांहीं करोत. त्यांस शास्त्री व काजी धर्मशास्त्राचा आधार दाखविण्यास तयार आहेत. यास्तव विद्यमान स्थितीस योग्य असे कायदे कानू व नियम राज्यांत चालू असणें ही एक राज्याच्या शाश्वतीस व बळकटीस अवश्य गोष्ट आहे.

असें वाटतें. हे कायदे राज्यांतील शाहाण्या व समंजस लोकांच्या विचारानें व सत्यानें होणें इष्ट आहे.

(४ थें.) कामगार लोकांत कांहीं पायऱ्या असून त्यांस पायरीपायरीनें दरबारांत चढण्यास मार्ग असणें ही गोष्ट फार अवश्य आहे. अशा पायऱ्या असल्या म्हणजे नोकर लोकांस आस्था लागून वरच्या पायरीस चढण्याची योग्यता आपल्या आंगीं आणण्याविषयीं ते यत्न करितात. या योगानें दरबारहें केवळ निरनिराळ्या मतीचे नोकर लोक तयार करण्याची शाळा बनते. कोणी अन्यायानें विशेष कारणाशिवाय चढत नाहीं, व कोणास आपल्या हुषारीबद्दल आपणास बक्षीस मिळालें नाहीं, असें वाटण्यास जागा रहात नाहीं, इतकेंच नाहीं तर येणेंकरून योग्य कामगाराची कमताई पडत नाहीं. दिवाण मेला तर त्याच्या खालच्या पायरीचा अंमलदार त्याचें काम करण्यास योग्य असतो. आतां ही गोष्ट लहानशा संस्थानीं असंभाव्य आहे. परंतु बाहामिनी अगर मराठी राज्यासारख्या मोठ्या राज्यांत होण्यासारखी आहे. अशा स्थितीच्या अभावीं काय होतें, तें पहा. गवान मेला तर त्याच्यामागून त्याची जागा घेण्यास योग्य मनुष्य सांपडला नाहीं. तसेंच नानाफडणविसाच्या मागें त्याच्या तोडीचे अगर त्याच्या खालोखाल देखील असे मनुष्य फारसे मराठ्यांचे दरबारीं नव्हते.

(५ वें.) राज्याच्या शाश्वतीस लष्करी व मुलकी हे दोन अधिकार वेगळे असुन त्यांवर वेगळाले अधिकारी असणें अवश्य आहे. तसेंच सुभे, परगणे वगैरे पोटविभागावरील अधिकाऱ्यांच्या हातीं केवळ लोकांच्या बंदोबस्तास व देशांत शांतता ठेवण्यास जेवढी अवश्य त्याहून जास्ती फौज देणें हें अनिष्टकारक आहे. तसेंच बळकट व लढाऊ किल्ले व त्यांवरील फौज त्यांच्या अधिकारांत ठेवूंनये. राज्यांतील सर्व फौजेवर मुख्य अधिकारी हुजूर असून हुजुरून नेमिलेलेच अधिकारी चोहोंकडे असावे. बंडें करणें स्वतंत्र होणें, वगैरे सर्व खेळ फौजेच्या जोरावर होतात. या करितां मुळीं फौजेवरचा अधिकार मुलकी कामगारांकडे नसला म्हणजे त्यांची बहुतेक लटपट नाहींशी होते. राज्याच्या बळकटीस निवडक धट्टेकट्टे व शूर अशा लोकांनीं भरलेलें कायमचें मोठें सैन्य असणें अवश्य आहे. पण त्याचें सूत्र एकाचे हातीं असून त्याच्याशीं मुलकी अधिकाऱ्यांस अगदीं गडबड करितां येऊंनये अशी व्यवस्था पाहिजे.

असो, याविषयीं विशेष पाल्हाळ न करितां बाहामिनीराज्याच्या कारकीर्दींत लोकस्थिति व देशस्थिति कशी होती याविषयीं कांहीं सांगतों. या काळाविषयीं मुसलमानांचे अनेक इतिहास आहेत. परंतु हिंदूंनीं लिहिलेला एकही इतिहास नाहीं. या करितां या काळाविषयीं केवळ एकतर्फी माहिती मिळते. मुसलमान इतिहासकारांनीं लढाया व राज्यक्रांति यांच्या पलीकडे कशाचें फारसें वर्णन केलेलें नाहीं. म्हणून कोणत्याही कालाचें हुबेहुब चित्र पुढें राहण्यास जी माहिती अवश्य पाहिजे, ती माहिती तर या कालाविषयीं मिळत नाहीं. इतर वर्णनावरून त्या कालची लोकस्थिति, राज्यस्थिति, आणि धर्मस्थिति यांचें जें कांहींसें स्वरूप मनांत येतें तें पुढें सादर केलें आहे.

एकंदरींत बाहामिनी राजे प्रजेस सुख देत व हिंदूंस विनाकारण त्रास देत नसत. परंतु हिंदूंस दरबारीं मोठ्या जागा तर मुळींच मिळत नव्हत्या. सरदार, कामदार वगैरेचीं हजारों नांवें इतिहासांत आहेत, परंतु त्यांत एकही हिंदूचें आढळत नाहीं. फौजेंत सुद्धां हबशी, तुर्की, इराणी, मोंगल यांची संख्या फार असे. व यांचेंच वर्चस्व असे. हिंदूंस केवळ हलक्या नोकऱ्या मिळत. बाकीचे लोक शेतीभाती करीत. त्यावेळीं वैदीक, शास्त्री, भिक्षुकांचा वर्ग मोठा होता असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. हिंदूंस आपल्या धर्मप्रमाणें यथेच्छ चालण्यास प्रतिबंध होत नसून आपली शेतीभाती व हलकी नोकरी करून ते स्वस्थ असत. राजांस त्यांपासून कोणताही उपद्रव पोंहोंचत नसे. बाहामिनी राज्यांत इतकीं बंडें झालीं, इतक्या लढाया झाल्या, व इतक्या राज्यक्रांती झाल्या, परंतु कोणत्याही खटपटींत हिंदू अग्रेसर होते असें आढळत नाहीं. त्यांनीं बंडें केलीं नाहींत. कोणत्याही दुष्टकृत्यास त्यांनीं सहाय्य केलें नाहीं. जरी बाहामिनी राज्यांत हिंदूंची संख्या मोठी असून मुख्य वस्ति त्यांची होती, तरी मुसलमानी अंमल स्थापन झाल्यापासून हबशी, तुर्की, इराणी, मोंगल लोक पुष्कळ येत. परदेशचे मुसलमान गुलामांस येथें आणून विकीत. त्यांस राजाश्रय असे. त्यांसच मोठीं कामें मिळत. त्यांसच जमिनी इनाम मिळत. यामुळें हल्लीं जी मुसलमानांचीं घराणीं दक्षणेंत दृष्टीस पडतात. त्यांची मूळ उत्पत्ति बाहामिनीराज्याच्या कारकीर्दींतच झाली. अशीं घराणीं वाढत गेल्यानें व त्यांस राजाश्रय असल्यानें हिंदूंचें मान त्या काळीं कमी कमी होत गेलें. जर विजयान-

गरास हिंदूंचें बलिष्ट राज्य नसतें आणि बाहामिनी राज्य मोडून पां-
चपृथक राज्यें झालीं नसतीं व त्यांत वैमनस्यें व परस्पर लढाया नसून
एक वाक्यतेनें त्यांनीं राज्य चालविलें असतें, आणि पुढें मराठ्यांस वर मा-
न काढण्यास मिळाली नसती, तर हिंदूंचीं संख्या या त्यांच्या जन्मभूमींत
याहूनही कमी झाली असती. परंतु तसा प्रकार घडला नाहीं. जरी विजया-
नगरच्या राजांचा बाहामिनी राजांनीं अनेक वेळ पराभव केला, तरी त्यां-
स जिंकण्याचें यांच्या आंगीं सामर्थ्य नसून हिंदूंच्या पूर्वींच्या वर्चस्वाचें
स्मरण ठेवण्यास सरहद्दीवर तें एक प्रचंड राज्य होतें. कसेंही असो. बा-
हामिनी राजांनीं हिंदूवर कोणत्याही प्रकारचा जुलूम केला नाहीं, व त्यां-
स त्रास दिला नाहीं. या कालांत देश सुधारत गेला असावा. व्यापार
व दळणवळण पूर्वीपेक्षां पुष्कळ वाढलें. इराण, हबशी देश. अर्बस्थान वगैरे
देशांतून हजारों मुसलमान नोकरीस दक्षिणहिंदुस्थानांत येऊं लागले, व येथ-
चे तिकडे जाऊं लागले. ही गोष्ट दळणवळण वाढण्यास मोठी साह्यकारी
झाली. व्यापार बहुतेक कारवान लोकांच्या हातीं होता. ते लोक युरोपांतील
आणि उत्तर व पश्चिम एशियांतील हरएक माल दक्षणेंत आणीत. त्या का-
ळीं या प्रदेशीं मारवाडी लोक आले होते, किंवा त्यानंतर आले हें बरोब-
र कळत नाहीं. देशांत शांतता असतां ज्या सुधारणा व्हावयाच्या तसल्या कां-
हीं फार सुधारणा झाल्याचें आढळत नाहीं. केवळ राजाश्रयानें ज्या कला
उदयास येणाऱ्या तशा प्रकारच्या गायननृत्यादी कांहीं कला मात्र सुधारल्या.
राज्यरीतीविषयीं उल्लेख मुसलमान इतिहासकारांनीं करावा तसा केला नाहीं. दि-
वाणी, फौजदारी, जमाबंदी, पोलीस वगैरेविषयीं काय व्यवस्था होती, हें क-
ळत नाहीं. अपराध सिद्ध करण्यास दिव्य करण्याची चाल होती किंवा ना-
हीं तें समजत नाहीं. गवानाच्या कारकीर्दीपर्यंत जें पीक जमिनींत येत असे.
त्याचाच हिस्सा सरकारदस्ताबद्दल घेत होते असें दिसतें. खेड्यांत पाटीलकु-
ळकर्णी व शेतसनदी असत, व त्यांजकडे गांवची सर्व व्यवस्था असे. हे मा-
त्र सर्व हिंदू असत. मुसलमानांस सैन्यांत व दरबारीं नोकऱ्या मिळत अस-
त्यामुळें त्यांचें लक्ष याकडे नसे. त्यांत कांहीं फेरफार केला नव्हता. लागवड
करण्याजोग्या सर्व जमिनीची लागवड झाली असून सर्व प्रदेशांत भरवस्ती
होती. कोसाकोसावर खेडीं असून जमिनीचे तुकडे पाडले होते. रस्त्यांवर चो-
रांचें बिलकुल भय नसे, व प्रवास करणाऱ्यांस उपद्रव होत नसे. सैन्याची

सर्वदा कडेकोट तयारी असे. तोफांचा उपयोग केल्याविषयीं क्वचित् लेख आहेत. पायदळांची विशेष मातबरी नसून हत्ती, घोडे स्वार व तिरंदाज यांवरच मुख्य बळकटी असे. इमारती बांधण्याची कलाही बऱ्याच पूर्णदशेस येत चालली होती. जरी बाहामिनी राजांच्या वर्णनीय अशा इमारती फार नाहींत, तरी त्यांच्या कित्येक मशिदी, घुमट, किल्ले हीं पाहण्यासारखीं आहेत. कलबुर्गी व बेदर या शहरीं राजवाडे व इतर इमारती फार चांगल्या होत्या. गवानानें बेदर येथें जी मोठी पाठशाळा बांधिली, ती फार वर्णनीय होती. विद्याभ्यासाच्या सोयी करण्याकडेही बाहामिनी राजांनीं बरेंच लक्ष दिलें होतें. सर्व जातीच्या व मतीच्या लोकांस विद्या शिकविण्याच्या सोयी जरी त्यांनीं केल्या नव्हत्या, तरी आपल्या जातभाईस शिक्षण मिळण्याच्या सोयी सर्व मुख्य खेड्यांत केल्या होत्या. बहुतेक मोठ्या खेड्यांनीं व बाजाराच्या ठिकाणीं मशिदी बांधून त्यांकडे सरकारांतून नेमणुका चालत होत्या. प्रत्येक मशिदीवर एक मुल्ला असे. तो शिकविण्याचें व धर्मशास्त्र सांगण्याचें अशीं दोन्हीं कामें करी. यांवर देखरेख करण्यास काजी असत. मोठमोठ्या शहरीं थोरल्या पाठशाळा असत. ज्यांस फारसी व आरबी भाषा शिकणें असतील, त्यांस कांहीं खर्च न करितां शिकण्याच्या सोयी होत्या. तसेंच महान विद्वान्, कवि, पंडित वगैरे यांस मुसलमानांच्या दरबारीं चांगली संभावना होऊन त्यांस आश्रय मिळे.

